

## उज्वल भवितव्यासाठी

# ओंकार ट्रस्ट

स्थापना २६ जुलै १९९१


'विसावा' अनिकेत सोसायटी नं. १,
बिबवेवाडी, पुणे - ४११ ०३७.
दूरध्वनी क्रमांक : २४२१ ००४७


## विश्वस्त मंडळ : ओंकार ट्रस्ट



॥ श्रीराम ॥

सप्रेम नमस्कार

श्री समर्थ रामदास स्वामी व स्वामी विवेकानंद आदि थोर सत्पुरुषांच्या शिकवणी व तत्वज्ञानापासून प्रेरित होऊन 'ओंकार ट्रस्ट' या संस्थेची स्थापना गुरुपौर्णिमा या शुभदिनी - दिनांक २६ जुलै १९९१ रोजी करण्यात आली. (रजि. क्र. इ. १५०५, दि. १०-१०-१९९१)

देणगीदारांना ८० ग अन्वये प्राप्तीकरांत सूट मिळते.

आमच्या न्यासाच्या उद्दिष्टाप्रमाणे - सामाजिक बांधिलकीस्तव विविध उपक्रम ''विनामूल्य'' राबविले जातात, त्यापैकी महत्वाचे काही उपक्रम पुढील प्रमाणे -

१) गुजरवाडी - निंबाळकरवाडी (कात्रजपासून पुढे ५ कि.मी. अंतरावर ग्रामीण भागात) येथे न्यासातर्फे मुले-मुलींसाठी संस्कार वर्ग घेण्यात येतो.

२) मांगडेवाडी ( कात्रजपासून सुमारे ३ कि.मी.) येथे जिल्हा परिषद शाळेतील मुला-मुलींसाठी संस्कार वर्ग आयोजित केला जातो.

३) कर्वे स्त्री शिक्षण संस्था येथील इयत्ता आठवीतील निवासी मुलींसाठी (सुमारे १८० मुली) संस्कार वर्ग घेतला जातो.

४) डॉ. पारस शहा यांचे नेतृत्वाखाली आतापर्यंत निरनिराळ्या वर्षी आठ नेत्र चिकित्सा शिबिरे गरीब व गरजू व्यक्तींसाठी घेण्यात येवून गरजूंना औषधे व चष्मे मोफत देण्यात आली.

५) तसेच न्यासाने कॅन्सर चिकित्सा शिबीर - मांगडेवाडी येथे, मधुमेह चिकित्सा शिबीर - बिबवेवाडी पुणे येथे व सर्वसाधारण रोगनिदान शिबीर - गुजरवाडी-निंबाळकरवाडी येथे आयोजित केली आहेत.

६) उत्कृष्ट सामाजिक कार्य करणाऱ्या व्यक्तिला अथवा संस्थेला ''वसुंधरा कृतज्ञता'' (न्यासाच्या संस्थापिकेच्या नांवाने) पुरस्कार गेली १२ वर्षे देण्यात येत आहे. या पुरस्काराचे स्वरुप मानपत्र, स्मृतिचिन्ह व रोख रक्कम रु.५०००/- असे आहे. पुरस्कार देण्यात आलेल्या व्यक्ति-संस्था - १) डॉ. स्वर्णलता भिशीकर-सोलापूर २) प्रा. डॉ. अशोक कामत-पुणे ३) समर्थ भक्त सुनीलजी चिंचोलकर-पुणे ४) द्वा. वा. केळकर - पुणे ५) डॉ. सुनीलकुमार लवटे - कोल्हापूर ६) सौ. सिंधूताई सपकाळ - ता. पुरंधर (जि. पुणे) ७) डॉ. पारस शहा - पुणे ८) श्री. श्रीकांत मुंदडा - पुणे ९) श्री. गिरीष यशवंत प्रभुणे - चिंचवड १०) मानव्य संस्था - (संस्थापिका - कै. विजयाताई लवाटे) पुणे ११) डॉ. राजा व सौ. वेणूताई दांडेकर - ता. दापोली (जि. रत्नागिरी) १२) आपल घर (संस्थापक - श्री. विजयजी व सौ. साधनाताई फळणिकर)

७) न्यासाने मराठी व इंग्रजी हस्ताक्षर सुधार प्रकल्प श्री. नानासाहेब लाभे, नागपूर यांचे मार्गदर्शनाखाली ६ वर्षांच्या कालावधीत सुमारे ३५ शाळांमधून

घेतला व त्याचा फायदा सुमारे १०,००० पेक्षा जास्त विद्यार्थ्यांना झाला.

८) न्यास वेळोवेळी आध्यात्म, संतविचार इ. करिता थोरामोठ्यांची प्रवचने / व्याख्याने आयोजित करते. समर्थ भक्त श्री. सुनीलजी चिंचोलकर यांची श्री. एकनाथ महाराज यांचे चिरंजीव काव्य या विषयावर ३ प्रवचने आयोजित करण्यात आली होती.

तसेच यावर्षी "यांनी घडविला महाराष्ट्र" या विषयांवर अधिकारी व्यक्तिंची व्याख्याने आयोजित केली होती.

क्रांतीकारक - श्री. निनाद बेडेकर

समाजसुधारक - डॉ. सदानंद मोरे

संतांचे कार्य - डॉ. यशवंत पाठक

याशिवाय डॉ. यशवंत पाठक, प्रमुख - ज्ञानदेव अध्यासन, पुणे विद्यापीठ, पुणे यांनी १) येणे वाग्यज्ञे तोषावे - श्री ज्ञानेश्वर महाराज २) एका जनार्दनी शरण - श्री एकनाथ महाराज ३) उत्कट भव्य तेचि घ्यावे - श्री समर्थ रामदास स्वामी या विषयांवर ३ दिवसांची प्रवचन माला गुंफली.

९) न्यास दरवर्षी खालील शिष्यवृत्या - पारितोषिके देत आहे -

१) हुशार व गरीब विद्यार्थीनीला उच्च शिक्षणासाठी रु. ५०००/- ची शिष्यवृत्ती कै. नलिनी विष्णू जोगळेकर यांचे नावाने, त्यांचे बंधु श्री. गजानन विष्णू जोगळेकर यांनी दिलेल्या देणगीतून देण्यांत येते.

२) श्रीमती मृणालिनी अशोक जोगळेकर यांनी त्यांचे पती कै. श्री. अशोक विष्णू जोगळेकर यांचे स्मरणार्थ दिलेल्या देणगीतून गुजरवाडी - निंबाळकरवाडी येथील एक विद्यार्थी व एक विद्यार्थीनीस प्रत्येकी रु. ७००/- ची शिष्यवृत्ती देण्यांत येते.

३) श्री. विष्णू काशिनाथ आठल्ये यांनी दिलेल्या देणगीतून शालांत परिक्षा, पुणे विभागांत संस्कृत व मराठी विषयांत प्रथम येणाऱ्या विद्यार्थ्यांना कै. श्री. काशिनाथ लक्ष्मण आठल्ये व कै. सौ. विजया काशिनाथ आठल्ये या नावांने पारितोषिके देण्यांत येतात.

१०) ओंकार न्यास गेली १० वर्षे गरीब मुले-मुली दत्तक घेत असून त्यांचा पालन-पोषण, शिक्षण इ. खर्च करत आहे. त्यांचे निवासासाठी गुजरवाडी - निंबाळकरवाडी येथे रु. ६,००,०००/- खर्च करून १६०० चौरस फूट इमारत बांधकाम केले आहे. सध्या ६ मुले-मुली दत्तक घेतली आहेत. त्यांच्या व वाडीतील मुलांच्या विकासासाठी खालील कार्यक्रम राबविले जातात.

दररोज २ तास इंग्रजी व हिंदीचा वर्ग घेतला जातो व त्यालाही मुलांची उपस्थिती चांगली असते आणि त्यांना त्याचा छान उपयोग होत आहे.

संस्कार वर्गात नेहमीच्या उपक्रमाशिवाय गीतापाठ चालू केला आहे. गीता शिकविण्यास कसबा पेठ, पुणे येथून श्री. किशोर वैद्य सर विना मानधन नियमीत येतात. त्यांनी स्वत: मुलांसाठी पुस्तके, सीडी इ. सर्व साहित्य आणले आहे. त्यांच्या सुलभ रीतीने शिकविण्याच्या पद्धतीमुळे मुलांना सुद्धा गीतापाठाची गोडी लागली आहे.

याशिवाय विश्वस्त श्रीमती मालती निमोणकर यांनी यावर्षी नवीन उपक्रम चालू केला आहे. वाडीतील इयत्ता १०वी मध्ये असणाऱ्या काही मुलींना घरी अडचणी असतात, अभ्यासाचे वातावरण नसते, मार्गदर्शन करणारे कोणी नसते. श्रीमती निमोणकर अशा मुलींना न्यासाच्या वाडीतील जागेत अभ्यासाला बोलावून त्यांचेकडून योग्य रीतीने अभ्यास करून घेतात, त्यांच्या अडचणी समजावून घेऊन त्यांना आर्थिक व मानसिक आधार देतात. खरेतर मुलींना मनापासून शिकायचे असते परंतु घरातील वातावरण, अडचणी इ. मुळे त्या नापास होतात व नंतर शिक्षण बंद होते ह्यावर मात करण्याच्या दृष्टीने श्रीमती निमोणकर हा प्रयत्न करत आहेत.

१२) ओंकार न्यास दरवर्षी कल्याणी विशेषांक वेगवेगळ्या संतांवर प्रकाशित करत असते. आतापावेतो न्यासाने एकूण १७ अंक प्रकाशित केले आहेत. त्यातील काही संतांची नांवे अशी - श्री ज्ञानेश्वर महाराज, श्री गुरुदेव रानडे, श्री टेंबे स्वामी, श्री स्वरुपानंद, पावस, श्री स्वामी चिन्मयानंद, श्री गोंदवलेकर महाराज, श्री समर्थ रामदास स्वामी इ. यापैकी कल्याणींच्या २००० साली प्रकाशित झालेल्या स्वामी श्री स्वरुपानंद विशेषांकास मराठी वृत्तपत्र लेखक संघाचा उत्कृष्ट आध्यात्मिक अंक म्हणून पांडुरंग भाटकर स्मृति पुरस्कार मिळाला आहे.

न्यासाने प्रकाशित केलेल्या सर्व कल्याणी विशेषांकास साधक / वाचक यांचेकडून फारच उत्तम प्रतिसाद मिळाला आहे. मागील कल्याणी विशेषांक एप्रिल २००८ मध्ये समर्थ रामदास स्वामी यांचेवर श्री. चंद्रशेखर महाराज आठवले (पंढरपूर) यांचे शुभहस्ते प्रकाशित करण्यांत आला असून पुढील कल्याणी विशेषांक आद्य श्री शंकराचार्य यांचेवर एप्रिल २००९ मध्ये प्रकाशित करण्यात येत आहे. तसेच समाजासाठी अतुलनीय कार्य केल्याबद्दल वसुंधरा पुरस्कार देण्यांत येणार आहे.

सुसंस्कृत समाज बनण्यासाठी बालांचे मन सुसंस्कृत होणे आवश्यक आहे. ट्रस्टच्या या कार्यात समाजातील विविध स्तरांतून सक्रिय पाठिंबा व सहभाग मिळत आहे.

आपण आमच्या कार्यास

१) देणगी रुपाने २) वस्तु रुपाने

३) न्यासात कार्यरुपाने भाग घेऊन

मदत करु शकता.




इंद्रायणीच्या तीरावरती देहू ग्रामात । परमार्थाचा अर्थ लावूनी गेला वैकुंठात ॥
देवत्वाच्या स्पर्शाने ती पूनीत झाली गाथा । त्या तुकयाच्या अढळत्वाला टेकविला माथा ॥



उज्वल भवितव्यासाठी

# ओंकार ट्रस्ट

(स्थापना २६ जुलै १९९१)

'विसावा' अनिकेत सोसायटी नं. १, बिबवेवाडी,

पुणे ४११ ०३७.

टेलिफोन क्रमांक : ४१००४७

मुंबई सार्वजनिक विश्वस्त कायदा १९५० अन्वये

नोंदणीकृत संस्था नोंदणी क्रमांक -

ई १५०५ दिनांक १० ऑक्टोबर १९९१

कलम ८०ग खाली आयकर सवलत क्रमांक :

पी एन् / १६५ / ०२० / १९९३-९४ दिनांक १३-९-९३

१-४-९३ ते ३१-३-९६ पर्यंत. (पुढील तीन वर्षासाठी प्रस्ताव सादर)






ओंकार ट्रस्ट १९९६ च्या **"श्री संत तुकाराम महाराज"** विशेषांक, संपादक सौ. रजनी गोपाळ काळे, ट्रस्टी यांनी गणेश प्रिंटर्स, पुणे ३० येथे छापून, श्री. भालचंद्र वा. सातवळेकर, ट्रस्टी, यांनी 'विसावा' अनिकेत सोसायटी क्र. १, बिबवेवाडी, पुणे ४११ ०३७ येथे प्रकाशित केला.

टीप : (१) सदरचा विशेषांक **फक्त खाजगी वितरणासाठी** असून तो विनामूल्य आहे.

(२) या अंकात प्रसिद्ध झालेल्या लेखनाशी संपादक सहमत असतीलच असे नाही.




## "द्वैताद्वैत"

खऱ्या कर्तया ओळखू कसे? निर्गुण ब्रह्म पाहू कसे?
दासांचा श्रीराम तोच अन् विठू तुक्याचा एक कसे?
कावड नाथाघरी वाहतो, धाशी चंदन सेवा करितो.
जनाबाईची कामे करितो, कबिराचेही शेले विणतो.
या 'सगुणाचे' गुण विसरोनी 'निर्गुण' त्याला मानू कसे?
दासांचा श्रीराम तोच अन् विठू तुक्याचा एक कसे?
या प्रश्नाने मना ग्रासता हाती ये तुकयाची गाथा.
अद्वैताच्या शत्तीमधुनी द्वैताची मज ओढ लागता.
तुका सांगतो अभंगातुनी "बालक मी अन् तू माता"
माझे मीपण अलग ठेविता मिळे पूर्तता मिलनसुखा.
बीज़ामधुनी तरू जसे ये वेगळेपणे भूमितुनी
अंती त्यामधे बीज सापडे, अनुसंधाना प्रगटवुनी.
तसाच तुकया जरी वेगळा आत बाहरी विठू सावळा.
वात्सल्याच्या प्रेमरसाने चिंब भिजोनी सुखावलेला.
मायरूपाने स्त्रीच वावरे जगामाजी या इथे तिथे.
दासांचा श्रीराम तोच अन् विठू तुक्याचा एक असे.

**सौ. मंजिरी कुलकर्णी**



# संपादकीय

*संतकृपा झाली । इमारत फळा आली ॥१॥*
*ज्ञानदेवे रचिला पाया । उभारिले देवालया ॥२॥*
*नामा तयांचा किंकर । तेणे रचिले आवार ॥३॥*
*जनार्दन एकनाथ । खांब दिल्हा भागवत ॥४॥*
*तुका झालासे कळस । भजन करा सावकाश ॥५॥*
*बहेणि फडकति ध्वजा । निरोपण केले वोजा ॥६॥*

ज्ञानियांचा राजा, संत शिरोमणी श्रीज्ञानेश्वरमहाराज यांच्यासाठी निर्माण केलेल्या साहित्यपुष्पापाठोपाठ त्यांनीच उभारलेल्या देवालयाचा सुवर्ण कळस झालेले आणि ज्यांचा अभंग येत नाही अगर माहीत नाही अशी एकही व्यक्ती महाराष्ट्रामध्ये आढळणार नाही असे लोकप्रिय संत श्री तुकाराममहाराज यांचेसाठी लिहिलेले हे भावपुष्प वाचकांच्या हातात ठेवताना होणारा आनंद शब्दांत मांडता येणे अवघड आहे.

वैज्ञानिक प्रगतीमुळे मिळणारी भौतिक सुखाची उब ओसरली की माणसाला त्याच सुखाचा, माध्यान्हीच्या उन्हाप्रमाणे चटका जाणवू लागतो. या प्रखर धगीच्या झळीने होणारी मनाची तगमग संत साहित्यातील विचारधारांची गार झुळूकच शांत करू शकते. परंतु संत साहित्याचा अभ्यास माणसाच्या हातून सहज घडत नाही. संत साहित्याच्या गाढ्या अभ्यासकांनी व विद्वान साहित्यिकांनी संतांच्या विचारांचे मऊ घास आपल्या स्वतःच्या लेखनशैलीने भरवले की ते पचायला आणि आचरणात आणायला सोपे जातात. म्हणून कल्याणीच्या या कुंभातून संत विचारांचा हा गोरस सर्वांना देण्याचा प्रयत्न आहे.

गेल्या अंकाप्रमाणेच या वेळी पण मोठमोठ्या विचारवंत लेखकांनी (आमच्याकडून कोणतीही अपेक्षा न ठेवता) आपले लेख देऊन कल्याणीचा कुंभ अवीट अशा गोड रसांनी भरला आहे व आम्हांला उपकृत केले आहे. त्यांचे आभार मानावेत तेवढे थोडेच आहेत.

*छायामन्यस्य कुर्वन्ति । तिष्ठुनी स्वयमातपे ।*
*फलान्यपि परार्थाय । वृक्षाः सत्पुरूषी इव ॥*

वरील सुभाषितामध्ये सुभाषितकाराने म्हटल्याप्रमाणे **ओंकार ट्रस्टच्या** रोपाचा मोठा वृक्ष बनून सत्पुरुषाप्रमाणे त्याची छाया, फुले व फळे हे सर्वांच्या उपयोगी पडावीत ही ईश्वरचरणी प्रार्थना.

ज्यांच्या सहकार्याने हा अंक निघू शकतो अशा सर्व जाहिरातदारांचे, लेखकांचे आणि अंक काढण्यासाठी हस्ते, परहस्ते मदत करणाऱ्या सर्व हितचिंतकांचे आभार मानणे म्हणजे पुन्हा पुन्हा तेच म्हटले जाते असे असले तरी आभार मानल्याशिवाय राहावत नाही. वाचकांचा प्रतिसाद व हितचिंतकांच्या सदिच्छा हेच आमच्या उत्साहाचे गमक आहे.

"॥ जयजय रघुवीर समर्थ ॥"

**सौ. रजनी काळे**


| | |
|---|---|
| **मुखपृष्ठ व चित्रे**<br>भरत केतकर | **व्यवस्थापकीय सहकार्य**<br>शाम देऊळकर<br>अनंत सर्व्हीसेस, पुणे ३८. |
| **अक्षरजुळणी**<br>प्रतिमा ऑफसेट, पुणे ४. | **छपाई**<br>गणेश प्रिंटर्स, पुणे ३०. |

## १९९१-९२

■ २१ जुलै १९९१ गुरुपौर्णिमा ओंकार ट्रस्टची स्थापना आद्यसंस्थापक कै. सौ. वसुंधरा सातवळेकर



■ गुजरवाडी, निंबाळकरवाडी, मांगडेवाडी येथे शाळेमध्ये संस्कारवर्गास सुरवात.

## १९९२-९३



■ प्रथम वर्धापन दिन गुरुपौर्णिमा 'कल्याणी' प्रथम विशेषांकाचे प्रकाशन

■ मांगडेवाडी येथे शिवणवर्ग.

■ गुजरवाडी, निंबाळकरवाडी येथे दवाखान्याची सुरवात. मोफत वाचनालय सुरू.

■ गुलबर्गा कर्नाटक राज्य येथे वर्षातून दोनदा वर्ग घेतला जातो.

## १९९३-९४

■ नियोजित प्रकल्पासाठी ४२ गुंठे जागेची खरेदी.

■ सुनील चिंचोलकर, सौ. सोमण, के.एन. बिसबुड, चिं. ग. काशिकर, चं.यां. भिशीकर आदींची व्याख्याने.

■ शिवणवर्गाचे रूपांतर दासबोध वर्गात.

■ रामनवमी विशेषांकाचे प्रकाशन.

■ सौ. अलका देव मारुलकर यांचे गायनाचा कार्यक्रम

■ कीर्तन - सौ. मोने

# ओंकार ट्रस्टची उज्वल वाटचाल



## १९९४-९५

■ 'स्वामी विवेकानंद' विशेषांकाचे प्रकाशन.

■ मोफत नेत्रचिकीत्सा शिबीर. २०८ लोकांची तपासणी. १०५ जणांना मोफत चष्मे. ४ जणांवर मोफत शस्त्रक्रिया.



■ युवा संघटनेमार्फत आयोजित गरबानृत्य स्पर्धेत भाग.

■ कात्रजच्या हस्तकला प्रदर्शनात संस्कारवर्गाचा सहभाग. मार्केटयार्ड (भटक्या मुलांसाठी), हिंगणे स्त्री-शिक्षण संस्था, धनकवडी शाळा.

## १९९५-९६

■ ह.भ.प. कृष्णकांत नाईक यांचे प्रवचन.

■ कीर्तन - सौ. सईताई मोने.

■ श्री. दा. वा. केळकर यांचा सज्जनगडच्या 'स्वामी समर्थ पुरस्कार' मिळाल्याबद्दल सत्कार.

■ गुजरवाडी जि.प. शाळेतील १९ मुलं शिवथर घळ समर्थ विद्यापीठाच्या भारतीय संस्कृती दर्शन प्रथम परिक्षेला बसली.

■ सर्वसाधारण चिकित्सा व कर्करोग निदान, डोळे तपासणी व मोफत चष्मेवाटप, कर्करोगावर स्लाईडसह माहिती ही शिबीरे मांगडेवाडी येथे.

■ गुजरवाडी-मांगडेवाडी जि.प. शाळेत विविध स्पर्धा.

H. H. Swami Swaroopananda Saraswati

Shruti Sagar Ashram
Phulgaon 412 207
Dist. : Pune. Maharashtra - INDIA
Phone No. 474 (S.T.D. 021175) (struck through)

२५-२-९६

भारतभूमि ही संतांची भूमि आहे. सर्व संतांनी प्रत्येक कालामध्ये त्या त्या समाजाला प्रबोधन केले. योग्य दिशा दाखविली. स्वतःच्या जीवनामधून मार्गदर्शन केले. त्यांनीच सर्व समाजाला निरतिशय शांतीचा मार्ग दाखविला. तो संदेश श्री शंकराचार्यांनी भाष्यामधून, श्री समर्थांनी दासबोधामधून, ज्ञानियांच्या राजाने ज्ञानेश्वरीमधून, स्वामी विवेकानंदांनी आपल्या प्रखर वक्तृत्वामधून तर श्री संत तुकाराम महाराजांनी कधीही न भंगणाऱ्या अभंगांच्यामधून दिला.

'ओंकार' ट्रस्टतर्फे' यावर्षी आपण श्री संत तुकाराम महाराज विशेषांक काढीत आहात. मला अत्यंत आनंद वाटला. तसेच, आपण वैद्यकीय, आध्यात्मिक आणि बालसंस्कारकेंद्रामधून अत्यंत श्रद्धेने निष्काम सेवा करीत आहात हे पाहून मनाला समाधान वाटले. आपले कार्य सतत वृद्धिंगत व्हावे ही इच्छा आणि शुभाशीर्वाद!

प्रेमाने

॥ श्रीहरि: ॥

किशोर म. व्यास
☎: (०२१२) ३६२५८७

"धर्मश्री" मानसर अपार्टमेंटस्,
सूर्यमुखी दत्तमंदिर के समीप,
पुणे विद्यापीठ मार्ग, पुणे (४११०१६)

दिनांक १८/२/१९९६

॥ स्वस्तिवाचन ॥

ओंकार ट्रस्टच्या संस्थापक कार्यवाह आदरणीया कै. सौ. वसुंधराताई सातवळेकर यांचा त्यांच्या नगरच्या वास्तव्यात परिचय झाल्यापासून एक सात्त्विक, क्रियाशील, सेवाभावी ईश्वरैकपरायण व्यक्ति म्हणून मला त्यांच्याबद्दल नितांत आदर होता. अचिंत्य घटनाचक्राने मंगलमय प्रभुने त्यांना एकाएकी बोलावले हे कळून अपार दुःख झाले तरी त्या श्रेष्ठ साधिके-बद्दलचा आदर दुणावला.

त्यांच्या पश्चात ही त्यांचे सेवा-संस्कार-साधनेचे कार्य ओंकार ट्रस्टच्या माध्यमाने सतत वर्धिष्णु आहे हे पाहून परम समाधान वाटते. कार्य-निष्ठा हीच खरी श्रद्धांजलि आहे.

ट्रस्टच्या वतीने यंदा "कल्याणी" चा संत श्रीतुकाराम महाराज विशेषांक निघत आहे ही विशेष अभिनंदनीय गोष्ट आहे. कुणाही साधकाला श्री तुकाराम महाराज साधनेच्या पहिल्या पायरी पासून सिद्धीच्या शिखरापर्यंत आपले सांगाती वाटावेत असे त्यांचे दिव्य चरित्र व उपदेश आहे. याचा सर्वांनाच नितांत उपयोग होईल असा विश्वास वाटतो.

भगवान श्री ज्ञानेश्वर माऊलींच्या कृपेने ट्रस्टला त्यांच्या सर्व उपक्रमात सुयश लाभून लोककल्याण साधो ही शुभकामना. इति.

किशोरव्यास

# "तुका न उरला...."

तुकाराम .... इंद्रायणीचा दुसरा मानस पुत्र, एक संसारी जीव, प्रपंच करता करता परमार्थ जोडण्यात पूर्णपणे यशस्वी झालेला एक संत. आपल्या आगळ्या वेगळ्या व्यक्तीमत्वाने त्यांनी जनमानसावर एक वेगळा ठसा उमटवला. निर्मळ शुद्ध भक्ती, दयाळू मन, शुद्ध आचरण, उच्च विचार ह्या साऱ्या मुळेच उभ्या देहूकरांना वंदनीय झालेले. साऱ्या देहूकरांना हवे हवेसे वाटत असतानाच...

फाल्गुन वद्य द्वितीया... हा दिवस उगवला आणि महाराज महानिर्वाणाला बाहेर पडले. इंद्रायणी काठावर त्यांची पावलं पडू लागली. निरोपाचा अभंग मुखातून बाहेर पडला... "आम्ही जातो अमुच्या गावा... अमुचा रामराम घ्यावा..."

बुवांच्या टाळकरांनी टाळ सरसावले, नादब्रह्मांत रंगलेले असतानाच, बुवांच्या दिव्य दृष्टीला गरूड विमान दिसले, पितांबर झळकला...

आणि तो भगवत् भक्त, विठ्ठल भेटीस पुढे सरसावला; मुहूर्तवेळ जवळ येताच बुवांनी कुंभक केला आणि कापसा सारखा हल्का फुल्का झालेला देह हां हां म्हणता पंचतत्वांत विलीन झाला.

सारं देहू गांव शोक सागरांत बुडालं. भरल्या डोळ्यांनी त्या भगवत् भक्ताला निरोप दिला, आणि काही जण घराकडे परतले –

तेरा टाळकऱ्यांनी मात्र तिथंच ठाण मांडलं, अभंग वाणी आळवीत ते प्रसादाची वाट पहात असतानाच...

तीन दिवसानंतर बुवांचे टाळ अन् घोंगडीचा प्रसाद त्यांच्या हाती पडला. तो प्रसाद हृदयाशी घट्ट कवटाळून, त्यांनी एकच जय जयकार केला. विष्णुदासाचं गुण वर्णन करताना ते म्हणाले

*तुका न उरला, तुका शेवटी, गेला अवघाची ।*
*पडे घोंगडी वीणा आणिक टाळखुण त्याची ।।धृ.।।*
*इंद्रायणीच्या काठावरती वाळवंटी देहू*
*निज भक्ताला घेण्या आला पंढरीचा रावू*
*विमान आले नेण्या तुक्याला, इच्छा देवाची ।।१।।*
*तुका जातसे तुका जातसे कळले गावांत*
*दाही दिशांतून भक्तवृंद तो आला धावत*
*माथी लावती धूळ वंदूनी, प्रेमे चरणाची ।।२।।*
*भवती जमले जनते अवघे नामघोष चाले*
*रामकृष्ण हरि नाद पथावर हरिदास चाले*
*गरूड विमानी बसला जाऊन, संगत देवाची ।।३।।*
*नेत्री पाहती संतश्रेष्ठ तो देहरूप जातो*
*हरिनामाचा बोध जीवाशी प्रेमाने देतो*
*रामराम करता ती पडली, फुलें आसवांची ।।४।।*
*विलिन झाला देह तुक्याचा पंचभूतामाजी*
*सहज लाभली श्रेष्ठ अवस्था योगाची आजी*
*कुंभक करता ज्योत चालते, वाट अनंताची ।।५।।*
*तिथी निवडली वद्य द्वितीया फाल्गुन मासाची*
*अवताराची होय पूर्तता, पूर्ती कार्याची*
*जीवा जीवीचा सखा भेटता तृप्ती इच्छेची ।।६।।*
*भागवताचे मंदिर पाया ज्ञानाने घातला*
*तुकाराम तो कळस त्यावरी सोन्याचा शोभला*
*खूण मागूता जनी देतसे अभंगवाणीची ।।७।।*
*राम जाणला म्हणून झाला तुका तुकाराम*
*अभंग त्याची अभंगवाणी मंत्र हरिनाम*
*निघून गेला तुका जनांतून, अभंग परि तोची ।।८।।*

**श्री. अरुण गोखले.**
४७/३७० लक्ष्मीनगर, पुणे ९.

# अनुक्रमणिका

# सुंदर तें ध्यान उभें विटेवरी

डॉ. व. दि. कुलकर्णी

*सुंदर तें ध्यान उभें विटेवरी । कर कटावरी ठेवूनियां ।*
*तुळसीहार गळां कासे पीतांबर । आवडे निरंतर हेंचि ध्यान ।*
*मकर कुंडलें तळपतीं श्रवणीं । कंठीं कौस्तुभमणी विराजित ।*
*तुका म्हणे माझें हेंचि सर्व सुख । पाहीन श्रीमुख आवडीनें ॥*

पंढरीचा विठ्ठल हे पुंडलीकाच्या भेटीसाठी आलेलं परब्रह्म! आज ते अठ्ठावीस युगं, तिथं चंद्रभागेच्या तीरी, विटेवर उभं आहे. ते 'समपद' सगुण ब्रह्म आहे. 'समपद' म्हणजे दोन्ही पावलं एकमेकांस समांतर जोडून उभं आहे. एका जागी स्थिर निश्चल उभं आहे. आता पाऊल उचलून ते कुठं जाणार नाही, याची ग्वाही देणारं हे 'समपद' उभं ध्यान आहे. भक्तासाठी ते दृढपणे, एका ठिकाणी, भक्तांची वाट पाहत रात्रंदिवस, बारा महिने, चोवीस तास निरंतर उभं आहे; आणि असंच अखंडपणे अनंतकाळ उभं राहणार आहे. भक्त येतात; त्या चरणांवर मस्तक टेकवतात; त्याचं 'श्रीमुख' डोळेभरून पाहतात आणि डोळ्यांत - मनांत - अंतःकरणात श्रीविठ्ठलाचं 'सुंदर ध्यान' भरून घेतात आणि घरी परततात. भक्त आपल्याबरोबर 'विठ्ठल' घेऊन जातात; प्रत्येकाच्या बरोबर 'विठ्ठल' जातो; त्यांचा सांगाती होतो; त्यांच्या घरी जाऊन राहतोः आणि तरीही तो पुन्हा आपल्या जागी, पंढरीला भिवरेच्या तीरी, विटेवरी उभा तो उभाच असतो. विठ्ठल पंढरीत असतो; विठ्ठल यात्रेत असतो, विठ्ठल घरी-दारी असतो; विठ्ठल सर्वत्र - सर्वदा - सर्वकाल असतो. विठ्ठल नाही अशी जागाच नसते; अणू-रेणूत विठ्ठल असतो. अवघ्या गगनाचा गाभा होऊन तो ब्रह्मांड व्यापून राहिलेला असतो. तो निर्गुण - निराकार असा ब्रह्मांडभर कोंडून - दाटून राहिलेला असतो, आणि दशांगुळं वर उरलेला असतो. अशा या विठ्ठलाचं सुंदर 'ध्यान' सगुण, साजरं, मोहक रूप घेऊन पंढरीला विटेवर उभं असतं.

या पंढरीच्या विठ्ठलाचे हात कटीवर आहेत; कमरेवर आहेत. विठ्ठलाचे हात कटीवर स्थिरावले आहेत. विठ्ठल निश्चल आहे. विठ्ठलमूर्तीचे हस्त-पाद 'सम' आहेत. विठ्ठल 'समपाद' आणि 'समहस्त' आहे. विठ्ठल चतुर्भुज नाही. शंख-चक्र-गदा-पद्मधारी तो नाही. विठ्ठल षड्भुज नाही. इथं अभयकर आणि आशीर्वादकर असं काही नाही; की प्रसाद - मोदक या करांमध्ये नाही. दोन हस्त कटीवर समरूपात, समदर्शनरूपात दृढ स्थिरावले आहेत. हे हात सर्व काही करून-देऊन आता शांतविश्रांत झाले आहेत. परिपूर्ण दातृत्वाचं हे स्थिर शांत ब्रह्मरूप आहे. इथं भक्तानं या मूर्तीकडं केवळ पाहायचं आहे; टक लावून पाहायचं आहे; आणि हे 'पाहणं'च इथं 'सर्वस्व' आहे. इथं वेगळं असं काही ध्यायचं नसतं; विठ्ठलाचं ते 'ध्यान', ते 'स्वरूप' पाहायचं म्हणजेच त्यालाच ध्यायचं असतं. हात उचलून, इथं विठ्ठलानं काही द्यायचं नसतंच. द्यायचं असं काही त्यानं शिल्लक ठेवलेलंच नसतं म्हणून केवळ 'दर्शनमात्रे' सर्वस्व देणाऱ्या या विठ्ठलाचे हात कटीवर स्थिर झाले आहेत. सर्वांना अभय देऊन विठ्ठल निवान्त उभा आहे. विठ्ठल समपद आणि समहस्त असा अखंड निश्चल उभा आहे.

विठ्ठलाची दृष्टीही 'समचरण दृष्टी' आहे. विठ्ठलमूर्तीचे डोळे उघडे नाहीत; म्हणजे ते पार मिटलेले आहेत, असं नाही. विठ्ठलाची दृष्टी आपल्या समचरणांवर स्थिरावली आहे. विठ्ठल आपणांस पाहत नाही; आपण विठ्ठलाला पाहायचं आहे; पाहायचं असतं. विठ्ठलाची मुद्रा 'अगोचरी' मुद्रा आहे.

*कांहींचि न देखणें । न देखतांचि पाहणें'*

असं अगोचरी मुद्रेचं वर्णन प.पू. बाबा महाराज आर्वीकर (माचणूर क्षेत्र) यांनी केलं आहे. 'डोळे नसता दृश्य रोखे' 'डोळे मिटून दृश्य पाहणे' ही ती विठ्ठलाची अगोचरी मुद्रा आहे. 'गो' म्हणजे इंद्रिय. 'गो-चर' म्हणजे इंद्रियांनी जाणणं. 'अ-गो-चर' म्हणजे इंद्रियाविना जाणणं; म्हणजे इथं नेत्रेंद्रिय मिटवूनही पाहणं! श्रीविठ्ठल आपल्या समचरणांवर दृष्टी ठेवूनही अखिल विश्व पाहतो. तो विश्व पाहतो, पण पाहणाऱ्या त्याच्या नेत्रांची पाती मिटलेली दिसतात. ती दृष्टी खरं तर मिटलेली नसते. श्रीविठ्ठल म्हणजे समग्र 'ज्ञानचक्षू' होय! डोळियांचा तो डोळा आहे. तो आपल्यास पाहत नाही असं दिसतं; पण तो आपणांस अंतर्बाह्य पाहत असतो. जसं कटीवर ठेवलेल्या स्थिर हातानं तो ओंजळी भरभरून देतो, तसंच कटीवर स्थिरावलेल्या निश्चल हातांनी तो आभाळ भरभरून देतो. आणि विटेवरील अविचल समपदांनी तो आपली संगत करतो. विठ्ठल हे शांतिब्रह्माचं 'शांताकार' स्वरूप आहे. अशी देवमूर्ती केवळ अपवादात्मकच!

तुकारामादी भागवत-संतांनी हा विठ्ठल मनोमनी जाणला आहे. श्रीविठ्ठल हेच त्यांचं सर्व सुख आहे आणि म्हणून ते हे 'श्रीमुख' आवडीनं पाहत राहतात.

*तुका म्हणे माझें हेंचि सर्व सुख ।*
*पाहीन श्रीमुख आवडीनें ॥*

विठ्ठलाची मूर्ती 'साजिरी' आहे. विठ्ठलाचं रूप गोड आहे. त्या श्रीमूर्तीवर तुकारामांचे डोळे खिळून राहिले आहेत.

*सदा माझे डोळे जडो तुझी मूर्ती ।*

*रखुमाईच्या पती सोयरिया ॥*

या श्रीविठ्ठलाला तुकाराम महाराज आणखी काही मागत नाहीत.

*तुका म्हणे कांहीं न मागें आणीक ।*
*तुझे पायीं सुख सर्व आहे ॥*

'विठ्ठल' ही 'विठो माऊली' आहे. या 'विठो माऊली'नं माझ्या हृदयात संचरून तिथंच राहावं, ही श्रीतुकारामांची 'आळुकी' (म्हणजे प्रेमळ हट्ट) आहे.

*विठो माउलीये हाचि वर देईं ।*
*संचरोनि राही हृदयामाजीं ॥*

या विठ्ठलाच्या गळ्यात अतिशुभ्र, धवल, निर्मल असा कौस्तुभ मणी आहे. परब्रह्म हे निर्मळ, विशुद्ध, निरुपाधिक असतं. त्याची ही अतिविशुद्ध प्रभा कौस्तुभ रत्नांतून प्रकाशात - प्रसरत आहे. समुद्र मंथनातून निघालेलं हे अपूर्व रत्न श्रीविठ्ठलाच्या मूळ निर्लेप प्रकाशरूपाचा विलास प्रकट करतं. श्रीविठ्ठलाच्या गळ्यात 'वैजयंती' माला आहे. वैजयंती ही पंचरत्नांची माळ आहे. हिरा, माणिक, पाचू, नीळ आणि मोती या पंचरत्नांची ही माळ आत्मप्रभा दिगन्तात पसरवीत विराजत आहे. ही माळ पंचमहाभूतांची द्योतक होय. म्हणून ती पृथ्वी-आप-तेज-वायु-आकाशरूपांतून निर्माण झालेल्या सृष्टीला आपल्या अंगावर धारण करणाऱ्या श्रीविठ्ठलाचं 'विश्वंभर' रूप दर्शविते. विठ्ठल म्हणजे

*"गुणां आला विटेवरी,*
*पीतांबरधारी, सुंदर तो"*

असे श्रीतुकाराम महाराजांचे उद्गार आहेत. निर्गुण ब्रह्म असं 'गुणा आलं', म्हणजे सगुण झालं, पंचमहाभूतांतून प्रकट झालं, अनंत रूपांनी विलसलं आणि विटेवर स्थिर ठेलं; स्थिर झालं!

पंढरीला भिवरेच्या तीरी विटेवर उभा असलेला पांडुरंग म्हणजे ॐकाराचं रूप होय! पांडुरंग म्हणजे 'वेदाचं मूळ' होय!

*हरिः ओम् तत्सदिति सूत्राचें जे सार ।*
*कृपेचा सागर, पांडुरंग ॥*
*हरिः ओम दत्त उदात्त अनुदात्त ।*
*प्रचुररहित, पांडुरंग ॥*
*सर्वस्व व्यापिलें, सर्वांही निराळें ।*
*वेदाचें जें मूळ, तुका म्हणे ॥*

दगडाची खोळ घालून, विटेवर उभा ठाकलेला हा पांडुरंगकान्ती असलेला, दिव्य तेजधारी विठ्ठल हा असा परेहून परता ओंकाररूप आहे. हा पांडुरंग-विठ्ठल 'सकळ मंगळांचं सार' आहे. त्याचं मुख पाहत राहता सुखाला अंतपार राहत नाही. अंती भक्त विठ्ठलमय होतो. तुकाराम महाराज विठ्ठलमय झाले. ते स्वतःच 'विठ्ठल' झाले. आणि विठ्ठल होऊनही विठ्ठलाचे भक्त म्हणून पुन्हा उरले. देव आणि भक्त यांमध्ये भेद नाही; अद्वैतच आहे; पण या अद्वैतातही देव आणि भक्त द्वैताभासात भक्तिसुख अनुभवत असतात. तुकाराम महाराज श्रीविठ्ठलाची प्रार्थना करतात

*राहो आतां हेंचि ध्यान । डोळा मन लंपट ॥१॥*
*कोंडकोंडुनि धरोन जीवें । देहभावें पूजीन ॥२॥*
*होईल येणें कळसा आलें । स्थिरावलें अंतरीं ॥३॥*
*तुका म्हणे गोजिरीया । विठोबा पायां पडों द्या ॥४॥*

कुळीचं कुळदैवत श्रीविठ्ठल श्रीतुकाराम महाराजांनी जीवाप्राणांनिशी असं आराधिलं; असं पूजिलं ॥ असा अनन्यसाधारण भक्त आपल्या उपास्य दैवताचीच पदवी प्राप्त करतो. तुकाराम महाराजांनी हे स्पष्ट सांगितलं आहे...

*विठ्ठल गीतीं, विठ्ठल चित्तीं । विठ्ठल विश्रांति भोग जया ॥*
*विठ्ठल आसनीं, विठ्ठल शयनीं । विठ्ठल भोजनीं ग्रासोग्रासीं ॥*
*विठ्ठल जागृति, स्वप्नसुषुप्ती । आन दुजें नेणती विठ्ठलाविण ॥*
*भूषण अळंकार, सुखाचे प्रकार । विठ्ठल निर्धार, जयां नरां ॥*
*तुका म्हणे तेही विठ्ठलचि झाले । संकल्प मुराले दुजेपणें ॥*

म्हणून विटेवरचं ते सुंदर ध्यान सदासर्वदा मनीमुखी ठेवायचं! नामदेव - तुकाराम हे नामभक्तीचे, प्रेमभक्तीचे सर्वश्रेष्ठ आदर्श होत ॥

*पांडुरंग हरी, वासुदेव हरी ।*
*पुंडलीक वरदा, हरिविठ्ठल ॥* [१]

(१) टीप : ज्यांना श्रीविठ्ठलमूर्तीचे आध्यात्मिक रूप समजून घ्यायचं असेल आणि वेगवेगळ्या संतांनी श्रीविठ्ठलमूर्तीचं दर्शन कसं घेतलं हे पाहायचं असेल त्यांनी 'संत-सारस्वत : आकलन आणि आस्वाद' लेखक - व. दि. कुलकर्णी, या पुस्तकातील 'विटेवरचा विठ्ठल' हा लेख पाहावा.

**डॉ. व. दि. कुलकर्णी**
१५, वृंदावन सोसायटी ('सुंदरबन'च्या मागे)
७५९/१२६ बी, प्रभात रोड,
पुणे - ४११ ००४.

याचि नावें दोष । राहे अंतरी किल्मिष ॥१॥
मना अंगी पुण्य पाप ॥ शुभ उत्तम संकल्प ॥२॥
बीजा ऐशीं फळे । उत्तम कां अ-मंगळें ॥३॥
तुका म्हणे चित । शुद्ध करावें हे हित ॥४॥

●

दुर्बुद्धि ते मना । कदा नुपजो नारायणा ॥१॥
आतां ऐसें करी । तुझे पाय चित्तीं धरी ॥२॥
उपजला भावो ॥ तुझे कृपे सिद्धी जावो ॥३॥
तुका म्हणे आतां । लाभ नाहीं यापरता ॥४॥

# ॥ इंद्रायणीकाठचे श्रेष्ठ संतकवी ॥ (संत तुकाराम)

डॉ. हे. वि. इनामदार.

"मित्रहो, 'पाहुणे घरासि आले. हृषिकेशी'" म्हणून तुकोबांची झालेली धांदल आणि त्यांच्या मनाची उंचावलेली अवस्था तुमच्या मनापुढे उभी करा. गड्यांनो, तुकोबांच्या अभंगवाणीसारखी एक जरी ओळ लिहिता आली, तरी या कवीच्या पायांवर मी सर्वस्व अर्पण करीन. केवढ्या उंच अशा भावविश्वात तुकोबा रंगून गेले आहेत! 'भावकाव्य' म्हणतात ते हेच. गीतांजलीसारख्या भावकाव्यासाठी बंगालच्या रविंद्रनाथांना नोबेल पारितोषिक मिळाले होते, नाही का? अशी शंभर नोबेल पारितोषिके देहूच्या या वाण्याच्या पायांवर टाकायला हवीत!" - प्रा. श्रीपाद महादेव माटे यांनी या समर्पक शद्बांत संत तुकारामांच्या थोरवीचे वर्णन केले आहे. ज्ञानदेवांच्या भक्तिमंदिराचे तुकोबा हे कळस झाले, असे संत बहिणाबाईंनी आपल्या एका अभंगात म्हटले आहे. तुकोबांना हा असाधारण आध्यात्मिक अधिकार कसा प्राप्त झाला, याचा मागोवा घेणे उद्‌बोधक ठरेल.

**लौकिक जीवन** : संत तुकारामांना इसवी सन १५९८ ते १६४९ असे एक्कावन्न वर्षाचे आयुष्य लाभले. पुण्याजवळच्या देहू या गावची महाजनकी त्यांच्या घराण्याकडे चालत आलेली होती. त्यांचे आठवे पूर्वज विश्वंभरबाबा यांच्यापासून कुळामध्ये विठ्ठलभक्ती आणि पंढरीची वारी चालू होती. तुकोबांची आई कनकाई हिची संत नामदेवांच्या ठिकाणी श्रद्धा होती. तेच भक्तिप्रेम पुढे तुकोबांमध्ये उतरले. प्रत्यक्ष पांडुरंगासह नामदेव आपल्या स्वप्नात आले, त्यांनी आपल्याला जागे केले, *'सांगितले काम करावे कवित्व । वाउगें निमित्त बोलूं नये ।'* असा आपल्याला स्वप्नदृष्टान्त झाल्याचे तुकोबांनी म्हटले आहे.

तुकोबांच्या विठ्ठलभक्तिला कौटुंबिक विरोध झाला. त्यांची संसार-कथा अवघड होती. यथाकाल त्यांची दोन लग्ने झाली. पुढे मात्र ते संकटात भाजून निघाले. तुकोबांच्या वयाच्या सतराव्या वर्षी त्यांचे आईबाप वारले. सावजी हे थोरले बंधू तीर्थाटनाला निघून गेले. पुढे चारच वर्षांनी तुकोबांचे दिवाळे निघाले. दुष्काळ पडला. पहिली बायको रखमाबाई व लाडका लेक संतू ही दोघे अन्न अन्न करीत मेली. दुसरी बायको जिजाई कर्कशा होती. तुकोबांना प्रपंचाचा उबग आला. ते विरक्त झाले. आपली चित्तवृत्ती त्यांनी विठ्ठलाच्या पायी वाहिली. देहूजवळच्या भामनाथाच्या डोंगरावर जाऊन ते 'एकांतीचे सुख' अनुभवू लागले. *'वृक्षवल्ली आम्हां सोयरीं वनचरें'* असा अनुभव त्यांना आला.

**तुकयाची अभंगवाणी** : सकलसंतगाथेतील तुकोबांची अभंगसंख्या पाच हजारांच्या घरात आहे. ईशस्तुती, पौराणिक कथानके, पंढरीमहिमा, विठ्ठल भेटीचा आनंद, स्वजनास उपदेश असे विषय त्यात आले आहेत. त्यांचे काव्य हे सुभाषितरत्नांचे भांडार आहे. काही उदाहरणे अशी :-

*१) महापुरें झाडें जाती । तेथ लव्हाळे वाचती ॥*
*२) तुका म्हणे तोचि संत । सोसी जगाचे आघात ॥*
*३) सुख पाहता जवापाडें । दुःख पर्वताएवढें ॥*
*४) जन हे सुखाचे दिल्या - घेतल्याचे ।*
*बा अंतकाळींचें कोणी नाही ॥*
*५) शुद्ध बीजापोटीं । फळे रसाळ गोमटी ॥*
*६) दया तिचें नांव भूतांचे पालन ।*
*आणिक निर्दालन कंटकांचें ॥*
*७) कळवळ्याची जाती । लाभाविण करी प्रीती ॥*
*८) आलें देवाजीच्या मना । तेथे कोणाचें चालेना ॥*
*९)मनाच्या तळमळे । चंदनेंही अंग पोळे ॥*
*१०) बैसोनी निवान्त । शुद्ध करी चित्त ।*
*तया सुखा अंतपार नाही ॥*

तुकोबांची ही अभंग कविता सरस - समृद्ध आहे. त्यांचा अभंग हे जसे वृत्त आहे, तशीच ती एक वृत्तीही आहे. 'भावनाशील मनाचा उचंबळून आलेला उद्‌गार' हे वर्णन तुकोबांच्या काव्याला लागू पडते. त्यांची कविता ही महाराष्ट्र सारस्वताची एक 'अभंग' ठेव आहे.

**पारमार्थिक प्रवास** : तुकोबांच्या जीवनात त्यांच्या आत्मिक विकासाच्या चार अवस्था दिसून येतात. साधक, वंचित, सिद्ध व जीवन्मुक्त अशा त्या अवस्था होत. साधक दशेत तुकोबा संसारातून मनाने बाहेर पडतात व परमार्थाकडे वळतात. त्यानंतर निराशेची अवस्था येते. आपल्या साधनेला फळ येत नाही, हे पाहून त्यांच्या मनाची तगमग होते. विफलतेची ती अवस्था अकस्मात दूर होते. काळोख संपतो. देवदर्शनाचा सूर्योदय होतो.

*आजि आनंदु रे, एक परमानंदु रे ।*
*ज्यासि श्रुति नेति म्हणति तो गोविंदु रे ॥*

असे साफल्य त्यांना लाभते, *'घोकाया अक्षर, मज नाही अधिकार'* मानणाऱ्या एका सामान्य प्रापंचिकाने, 'अंतरीं निवालों ब्रह्मरसें' ही आत्मानंदाची अपूर्व अवस्था कशी प्राप्त करून घेतली, याचा चेतोहर चित्रपट तुकोबांच्या अभंगगाथेत पाहायला मिळतो. कवितेमागचा कवी ज्याला बघायचा असेल, त्याने 'अभंगवाणी प्रसिद्ध तुकयाची' ऐकावी. तुकोबांना परमेश्वराचा साक्षात्कार घडतो. सुखाचे ओतलेले श्रीमुख पाहिल्यावर त्यांचा अवघा शीण संपतो. *'अणूरेणूया थोकडा । तुका आकाशाएवढा ।'* अशी दिव्य प्रचीति त्यांना येते.

या सिद्धावस्थेनंतर तृप्त होऊन तुकोबा थांबत नाहीत. या

जीवन्मुक्तीची अवस्था त्यांनी अनुभवली आहे. *'तुका म्हणे आता । उरलों उपकारापुरता ।'* अशी लोकोद्धाराची भूमिका त्यांनी घेतली आहे. *'आम्ही वैकुंठवासी । आलों याचि कारणासी ।'* असे ते सांगतात. संतांचे मार्ग झाडावे व आडरानाने भरलेले जग आपल्या परीने स्वच्छ करावे, अशी तळमळ त्यांच्या मनात आहे. खऱ्या - खोट्याचा निवाडा करावा, व लहानथोरांना भक्तिच्या वाटेला लावावे, या जाणीवेने त्यांनी *'या रे या रे अवघे जन'* असा पुकारा केला आहे. तुकोबा म्हणतात,

*"आता तरी पुढे हाचि उपदेश ।*
*नका करूं नाश आयुष्याचा ।।*
*सकळांच्या पाया माझें दंडवत ।*
*आपुलालें चित्त शुद्ध करा ।।*
*हित तें करावें देवाचें चिंतन ।*
*करूनिया मन एकविध ।।*
*तुका म्हणे लाभ होय तो व्यापार ।*
*करा, फार काय शिकवावें ।।*

**संप्रदाय - संवर्धन :** तुकोबांनी शुद्ध भक्तिभावनेचा पुरस्कार केला आहे. 'भावें गावें गीत । शुद्ध करोनिया चित्त ।' असे ते सांगतात. त्यांनी भक्तीचा डांगोरा पिटला आहे. तुकोबांच्या विवेचनाचा भर ज्ञानेश्वरप्रणीत चिद्विलासवादावर आहे. *'जगासि गवसणी ब्रह्मरूपें देखिली । ते मी अंतरीं पांगुरलों अंतरामाजी ।'* अशी दिव्य अनुभूती ज्ञानेश्वरांनी व्यक्त केली आहे. *'तुका म्हणे नाद । अवघा जाला गोविंद ।'* या तुकोबांच्या निवेदनात तोच भाव आहे.

तुकोबा हे समाजमनस्क संत आहेत. त्यांना स्वजनांचा उद्धार अपेक्षित आहे. *'एक एका सहाय्य करूं । अवघें धरू सुपंथ ।'* असे आवाहन ते करतात. *'बुडती हे जन न देखवें डोळा । म्हणवुनी कळवळा आम्हा लागी ।'* अशी सहृदयता त्यांच्या ठिकाणी आहे. *'धर्मचें पाळण। करणें पाखंड खंडण ।'* यासाठी ते बद्धपरिकर आहेत. मेणाहून मऊ असलेला हा विष्णुदास प्रसंगी वज्रासही भेदिल असा कठोर आहे. *'तीक्ष्ण शब्दांचीं उत्तरें । हातीं घेऊनि बाण फिरे ।* हे तुकोबांचे प्रतिज्ञोत्तर आहे.

**कळस झालेले तुकोबा :**

*संतकृपा झाली । इमारत फळा आली ।*

या अभंगात 'तुका झालासे कळस' असे बहिणाबाईनी म्हटले आहे. ज्ञानेश्वरांनी भक्तिमंदिराची पायाभरणी केली, नामदेवांनी त्याचा विस्तार केला, नाथांनी त्याला आधार दिला, व तुकोबा या मंदिराचे कळस म्हणून शोभून दिसले, असे सांगरूपक त्या अभंगात साधलेले आहे. 'कळस' या संज्ञेतून तुकोबांच्या अभंगवाणीची वैचारिक उंची जशी स्पष्ट होते, तसाच त्यांचा अभंग- संभार हा वारकरी पंथाचा जणू 'कलशाध्याय' आहे, हेही लक्षात येते. यात्रेच्या प्रचंड गर्दीत मंदिरात जाता आले नाही, आणि देवळाच्या कळसाचे जरी दर्शन झाले, तरी प्रत्यक्ष देवदर्शन झाले असे वारकरी मानतात. समग्र संतसाहित्य जरी वाचायचे घडले नाही, तरी चालू शकेल. केवळ तुकोबांची गाथा जरी वाचली, किंवा त्यांच्या निवडक अभंगांचे स्मरण केले, तरी सर्व वारकरी वाङ्मय वाचल्याचे समाधान लाभते, असाही याचा अर्थ होतो.

**मेघवृष्टीने उपदेश :** तुकोबांनी प्रवृत्तिप्रधान धर्मविचाराचा पुरस्कार केला. निवृत्तीच्या वैराण वाळवंटातील बिकट वाट त्यांनी टाळली. *'अर्जुना देऊनि निजसमाधी । सवेंचि घातला महायुद्धीं ।'* असे ज्ञानेश्वर सांगतात. वैराग्य म्हणजे वैताग नव्हे. तुकोबांचेही ध्येय सिद्धावस्थेनंतरची कर्मशीलता आहे. *'न लगे सायास जाणें वनान्तरा । सुखें येतो घरा नारायण ।।'* किंवा, *'जोडोनिया धन उत्तम वेव्हारें । उदास विचारें वेच करी ।।'* ही तुकोबांची वचने त्यांच्या संसारविषयक वास्तववादी दृष्टिकोनाचे पुरावे आहेत.

नामदेवांची कीर्तनसंस्था तुकोबांनी अधिक लोकप्रिय केली. देहूच्या इंद्रायणी काठी जमलेल्या बांधवांनी तुकोबांचे कीर्तन डोक्यावर घेतले. त्यातूनच पुढे अनेक टाळकरी, वीणेकरी व कीर्तनकार निर्माण झाले, *'नाचूं कीर्तनाचे रंगीं । ज्ञानदीप लावू जगीं ।* ही नामदेवांची प्रतिज्ञा तुकोबांनी सिद्धीस नेली.

**डॉ. हेमंत बि. इनामदार.**
'संतोष' भारती निवास कॉलनी
६०/१५ एरंडवणे. पुणे ४११ ००४.

# संत तुकारामांची हिन्दी कविता

डॉ. मो. दि. पराडकर

भारतवर्ष ही संतांची भूमी आहे; त्यांच्या वाणी आणि लेखणीतून भारतीय एकात्मतेचे निर्झर वाहात असतात. तसे पाहिले तर हा खण्डप्राय देश बहुभाषी आहे व प्रत्येक भाषेत उच्च दर्जाचे साहित्यही आहे. तथापि संतांच्या दृष्टीने 'जो हरि को भजै सो हरि का होई' हाच सिद्धांत, जाती - पातीला, सामाजिक दर्जाना किंवा भाषेला महत्व देण्याचे त्यांना कारण नव्हते. जी भाषा, सर्व लोकांना म्हणजे सर्व भारतीयांना समजेल, त्याच भाषेत भगवन्ताबद्दलची भावना भक्ताने व्यक्त करावी हीच भागवत धर्माची अपेक्षा. म्हणून संतांची भाषा ही त्यांच्याकडे येणाऱ्या मुमुक्षू जनांची भाषा; ती त्यांची जन्मभाषाच असण्याची आवश्यकता नाही. म्हणूनच मराठी संतांनी हिन्दीत रचना केली. उत्तरेतल्या गोरक्षनाथांनी आणि दादू दयाल यांनी मराठीत केलेली रचनाही उपलब्ध आहे. किंबहुना संतांच्या कवितेत मराठी, सिंधी, पंजाबी, राजस्थानी अशा कितीतरी भाषांची उदाहरणे सापडतात.

महाराष्ट्रीय संतांबद्दल प्राधान्याने बोलायचे झाले तर ईसवी सनाच्या १३ व्या शतकाच्या अखेरीपासून म्हणजे अलाउद्दीन खिलजीच्या आक्रमण काळापासूनच आक्रमक, राज्यकर्ते, सैनिक, मुत्सद्दी, अधिकारी, व्यापारी यांसारख्या अनेक रूपांनी मुसलमान महाराष्ट्रात आले. त्या जेत्यांबरोबर जित हिंदूही स्थायिक झाले. साहजिकच त्यांचा पेहराव, त्यांचे खानपान व त्यांची भाषा या सर्वांचा प्रभाव महाराष्ट्रातील सामान्य जनांवरही पडावा हे स्वाभाविक आहे. हिंदूंच्या भाषेलाही हिंदवीचे, हिंदुस्थानीचे, स्वरूप आले. या भाषेला वर्तमान काळात 'खडी बोली' म्हणतात. या भाषेत हिन्दी, अरबी, फारसीचे अनेक शब्द रूढ झाले. त्या काळी सगुण भक्तीच्या क्षेत्रात उत्तरेत 'व्रज' भाषेचा बोलबाला असल्यामुळे भक्त असलेल्या मराठी संतांनी 'व्रज' भाषेचाही वापर केलेला दिसतो. थोडक्यात इंग्रजांच्या प्रभावामुळे आज इंग्रजीला जे स्थान आमच्या जीवनात आहे, (ते अधिकाधिक वाढते आहे ही अर्थातच दुर्दैवाची गोष्ट) तेच ज्ञानेश्वरांपासून रामदास व त्यांचे अनुयायी यांच्या काळात 'हिंदवी' किंवा 'हिन्दी'ला होते. कारण त्यावेळी ती 'राष्ट्रभाषा' नसली तरी संपर्क भाषा बनली होती. म्हणूनच देहूसारख्या शहरापासून दूर असलेल्या खेडेगावांत आयुष्य घालवलेल्या संत तुकारामासारख्या भागवत धर्माच्या पुरस्कर्त्यालाही हिन्दीत रचना करावीशी वाटली. तुकारामांच्या अभंगांच्या बाडात किंवा स्वामी रामनंदांच्या संपादण्यात (पहा - संपादक - यू. म. पठाण) कबीर, सूर किंवा मीराबाई यांची पदे आणि दोहे मिळतात. हेही भागवतधर्माच्या मूलभूत एकत्वाचेच प्रमाण यात शंका नाही.

संत तुकाराम म्हणजे ज्या वारकरी पंथाचा, धर्मपुरस्काराचा पाया सन्त ज्ञानदेवांनी रचला त्याचा कळस असेच म्हणावे लागेल. त्यांच्या कवितेचा मूळ उगम अर्थात् अद्वैताचा पाठपुरावा करणाऱ्या निरतिशय भक्तीत. तुकारामांच्या दृष्टीनेही 'उत्कृष्ट काव्य' या शब्दाचा अर्थ 'भक्तिभावना'. *'हरि बिन मुख मो धूल परी रे'* हेच तुकारामाचे आग्रहाचे सांगणे. भक्त कसा असावा हे सांगताना तुकाराम म्हणतात,

*लोभी के चित वित बैठे, कामिन चित काम ।*
*माताके चित पुत बैठे तूका के मन राम ॥*

म्हणजे ज्याप्रमाणे लोभी माणासाच्या मनात वित्त (द्रव्य), कामीच्या मनात काम, मातेच्या मनात पुत्र तसा तुकारामाच्या मनात राम वसलेला आहे.

भक्तिच्या अनन्यतेला व्यवहारातले दृष्टांत देणारे हे तुकाराम त्यांच्या संतप्रवृत्तीला आणि मराठीतील काव्याला शोभणारेच आहेत. कबीराप्रमाणे तुकारामांनीही दोहे लिहिले आणि भावपूर्ण भाषेचा वापर शुद्धतेवर कटाक्ष न ठेवता केला. ते म्हणतात

*तुका बेस्तर बिचारा क्या करे रे, अंतर भगवान न होय ।*
*भीतर मैला कब मिटे रे, मरे उपर धोय॥*

नुसत्या वस्त्राने काय होणार; मनांत राम असला पाहिजे; मनात पाप किंवा मळ असेल तर वरून स्नान करून काय उपयोग. यात तुकारामांनी संन्यासाच्या भगव्या वस्त्रावर म्हणजे ढोंगावर कोरडे ओढले आणि कबीराप्रमाणेच *'चित मिले तो सब मिले, नहीं तो फूकट संग'* असे स्पष्टपणे सांगितले. त्या काळी समाजात दरवेश, फकीर, मलंग, संन्यासी विविध वेषात फिरून जनतेला फसवीत असत. त्यांच्यावरचे तुकारामांचे वाक्प्रहार त्यांच्या परखडपणावर प्रकाश टाकणारे आहेत. दिव्यावर ज्याप्रमाणे पतंग झेप घेतो आणि स्वतःला जाळून घेतो *(पतंग जाय दीपक जरै, करै तनकी राख)* त्याप्रमाणे रामावर प्रेम केले पाहिजे म्हणजेच त्यात समर्पणाची प्रवृत्ती असली पाहिजे. *'न मिटती मनकी आस'* अशी अवस्था असेल तर राम कसा भेटणार? तुकारामांच्या काळात महाराष्ट्रात संत कबीराचे दोहे आणि साक्या फार प्रचलित होत्या आणि त्यांची प्रवृत्तीही कबीराप्रमाणेच खरे ते निधडकपणाने सांगण्याची होती हे उघड आहे. पाखंड्यांवर प्रहार करतांना नाठाळाचे माथी काठी हाणणारे तुकाराम हिन्दी रचनांतही *'कुटुम्ब छोरे वडके. जोरू'* म्हणजे या सर्वांचा त्याग करून, मुंडन करूनही (सीर मुडाये) जर मनातली 'उपभोगांची इच्छा' नाहीशी होत नसेल तर मग तू हे सगळे कशासाठी केलेस' असे प्रश्न विचारणारे तुकाराम भेटतात.

पाखण्ड खण्डनाप्रमाणे तुकारामांनीही नीतिपर पदे लिहिली आणि उपदेश केला. *'दुर्जन का मुह काला'* हे लक्षात घेऊन ज्यांचे चित्त 'रामरंगी रंगले' अशा सज्जनांचीच संगती करावी असे सांगताना तुकाराम संतांबद्दलच्या श्रद्धेने

*जाका चित लागत मेरा राम के नाम ।*

*कहे तुका मेरा चीत लागा त्या के पाऊं ।*

म्हणजे त्यांच्या पायांवर डोके ठेवण्याचा सल्ला देतात. परोपकार हे जीवनाचे व्रत झाले पाहिले हे सुचवितांना *'बरसत मेघ फलत है बीरख, कोण काम आपणी उन्होती रीषा'* म्हणजे मेघ किंवा वृक्ष स्वतःसाठी कांही करत नाहीत आणि सूर्य व चंद्र हे विश्रांती न घेता प्रकाश देण्यासाठीच अवतीर्ण होतात याचा आवर्जून उल्लेख करतात. म्हणूनच *'आपतरे त्याकी कोण बराई'* म्हणजे स्वतःचाच विचार करून तरून जाणाऱ्यांचे कसले मोठेपण असा प्रश्न ते विचारतात; कारण 'जीवनप्यारे ठाकुर' प्राप्त करून घेण्यासाठी *'कब मरूं पाऊं चरण तुम्हारे'* असे म्हणून लोक ज्या मृत्यूला घाबरतात त्यालाही आनंदाने अलिंगन देण्याची साधकाची तळमळही व्यक्त करण्यास ते कमी करीत नाहीत.

तुकारामांनी दोह्यांप्रमाणे अभंग या खास मराठी छंदाचाही हिन्दीत उपयोग केला हे जसे खरे तसेच त्यांनी मराठीतली 'गौळण' ही हिन्दीत आणली. या गौळणीत कृष्ण आणि गोपी यांच्यामधील मधुर संबंधाचे वर्णन करतांना मात्र तुकाराम तत्कालीन हिन्दी काव्यातल्या सर्वमान्य व्रज भाषेचा उपयोग करतात हे उल्लेखनीय आहे. किंबहुना महाराष्ट्रीय संतांनी निर्गुणाबद्दलची ओढ व्यक्त करतांना 'खडी बोली'चा उपयोग केला आणि सगुण परमात्म्याबद्दलच्या भक्तीला शब्दरूप देतांना 'व्रज' भाषेचा वापर केलेला दिसतो. म्हणूनच संत तुकारामही

*"मैं भूली घर जानी बाट, गोरस बेचन आयी हाट ।*

*कान्हर रे मन मोहनलाल, सब ही बिसरू देखें गोपाल ॥*

या शब्दात बाजारात लोणी विकण्यासाठी आलेली परंतु 'मोहन' कृष्णाच्या नादात घरी जाण्याची वाट हरवून बसलेली गोपी वाचकांपुढे उभी करतात. इतकेच नव्हे तर

*'चुरा चुराकर माखन खाया, गौलनी का नंदकुमार कन्हैया'*

*'फिरत बनबन गाऊ धरावत'*

या शब्दात कृष्णाचे चित्र काढून हिन्दीतल्या कृष्णभक्तिपर कवितेची आठवण करून देतात.

उत्तर भारतात विशेषतः हिन्दीभाषी क्षेत्रात आणि हिन्दी भक्ति साहित्यात ज्ञानाश्रयी शाखेच्या कबीरासारख्या कवींनी निर्गुणाची उपासना केली तर भक्तीचा आश्रय घेऊन सूरदास आणि तुलसीदास यांनी सगुणभक्तीवरच भर दिला. महाराष्ट्रीय संतांनी मात्र *'निर्गुण सगुण एकु गोविंद रे'* हे परमेश्वराचे उभयविध स्वरूप मान्य करून समन्वयाची भूमिका घेतली. ह्यातच तुकारामांचा अन्तर्भाव व्हावा यात नवल नाही. यांच्या हिन्दी कवितेत *'कवण की काया, कवणकी माया । येक राम बिन सब ही जाया'* म्हणजे संसार हे मायाजाळ किंवा मृगजळ आहे ही अद्वैत तत्वज्ञानात चपखल बसणारी कल्पना जशी येते तसेच सगुण कृष्णोपासनेच्या रचनांत एका कृष्णाशिवाय गोपींच्या दृष्टीने *'प्रेमरसकी बांधी गेले ऐंच च्यले उधर'* या सारखे अद्वैती परंतु सगुणभक्तीवर आधारलेले रूपकही येते. अर्थात, तुकारामांच्या मराठी अभंगातील तळमळ आणि व्याकुलता त्यांच्या हिन्दी रचनांत तुलनेने कमी आढळते हे मान्य केले पाहिजे. नामदेवांसारखा तुकारामांचा संबंध हिन्दीशी जवळचा नव्हता हे अर्थात स्वाभाविकच मानायला हवे. आणखी एक वैशिष्ट्यही ध्यानात ठेवण्यासारखे आहे. तुकाराम महाराष्ट्रांतल्या वारकरी संप्रदायाचे पाईक म्हणजे मराठीत पंढरपूरच्या विठोबाचे परमभक्त, त्यांनी स्वतःच्या हिन्दी पदात, दोह्यात किंवा अभंगात गोपाळ, रघुराज, गोविन्द किंवा हरी यांचा जागोजाग उल्लेख केला परंतु त्यांच्या 'अस्सल गाथेत' (मराठीत विनायक लक्ष्मण भावे यांनी संपादित व प्रकाशित केली.) किंवा 'निर्मल प्रसाद' मधल्या हिन्दी पदात 'विठोबा'चा उल्लेख आढळत नाही यांचे कारणही समजण्यासारखे आहे. हिन्दी पदे हिन्दीभाषी जनतेला उद्देशून तुकारामांनी लिहिली आणि 'विठ्ठल' या नावाशी ती जनता एकरूप होणारी नाही याचे भान तुकारामांनी राखलेले दिसते.

संत तुकारामांच्या हिन्दीवर मराठीचा प्रभाव असावा आणि त्यांनी भाषेच्या शुद्धतेपेक्षा भाव व्यक्त करण्यावर जोर द्यावा यात नवल वाटण्यासारखे कांहीच नाही. वस्तुतः त्यांची हिन्दी कविता मराठी काव्याप्रमाणे आत्मनिवेदनात्मक आहे. साधकाच्या निरनिराळ्या अवस्थांचे वर्णन करतांना ती फुलाप्रमाणे कोमल होते व पाखण्डांवर प्रहार करतांना त्या वाणीला वज्राची कठोरता प्राप्त होते. मग 'मुझे' चे 'मुजे', 'भूख' चे 'भुक', 'शिर' चे 'सीर' झाले किंवा सरळ मराठी 'कोण' सारखे शब्द आले; 'वस्त्र' चे ,बस्तर' आणि 'सफेद' चे 'सोपेत' होऊन गेले तरी त्याची तुकारामांनी तमा बाळगली नाही; अरबी जिक्र, ऐवजी 'जीकिर' 'हुजूर' ऐवजी 'हजुर' आणि फारसी 'बाजार' ऐवजी 'बाज्यार' असे काहीसे कटु वाटणारे शब्द निःसंकोचपणे वापरण्यास त्यांनी कमी केले नाही. उपमा, रूपक सारख्या अलंकारांचा सोस त्यांना नव्हता. परंतु विषय सोपा आणि प्रभावी करण्याच्या निमित्ताने 'धेनु बछरा छीर ज्याव प्रेम न छुटे सात' सारखी उपमा आणि *"चीत मिले सो तब मीले नहीं तो फोकट संग । पाणी पत्थर येक ही ठोर को रण भीजे अंग"* सारखा अर्थान्तरन्यास सहज त्यांच्या कवितांत येऊन जातो हे विचक्षण वाचकांना जाणवल्याशिवाय रहात नाही.

तात्पर्य, भागवत धर्माच्या हजारो वर्षांच्या विकासाचे परिणत रूप सन्त तुकारामांच्या मराठी कवितेत आढळते. सामाजिक व्यवहारात तत्कालीन जनतेत रूळलेल्या वर्गभेद आणि जातिभेद यांच्या भिंती ओलांडून भक्तीच्या क्षेत्रात समतेच्या पार्श्वभूमीवर स्थिर होतांना 'जीवनप्यारे ठाकुर' यांची भेट होत असेल तर *'कब मरूं पाऊं चरन तुम्हारे'* चा आनंद लुटणारे तुकाराम मृत्यूचेही भय न बाळगणारे आणि निरामय भक्तीचा डांगोरा पिटणारे भक्तश्रेष्ठ आहेत व त्यांनीही भारताच्या मूलभूत एकात्मतेला आपल्या भावपूर्ण हिन्दी कवितांचा अर्घ्य अर्पण

हे मान्य करणेच योग्य ठरेल.

काही संदर्भग्रंथ


१) हिन्दी को मराठी संतोंकी देन - आचार्य विनयमोहन - १९५७

२) मराठी संतोंकी हिन्दी वाणी - संपादक - डॉ.यू.म. पठाण व श्री. ग. सा. मुळे - १९६७

३) मराठी संतांची हिन्दी कविता - डॉ. शं. गो. राजवाडे - १९७६



डॉ. मो.दि.पराडकर

४/११ शाहबिल्डिंग,

भगतपथ, माहीम, मुंबई १६.


---

## नाम घेता . . .

ज्ञानदेव ज्ञानदेव म्हणता । ज्ञान-देव - देतो
नामदेव नामदेव म्हणता । नामचि-देव - होतो
नरहरि नरहरि म्हणता । नराचे हरि होतो
चोखोबा चोखोबा म्हणता । परमार्थही चोख होतो
जनी जनी म्हणता । नामयाची जनी जनार्दन होते
एकनाथ एकनाथ म्हणता । अनाथ नाथ सनाथ होतो
रामदास रामदास म्हणता । दास राम श्री समर्थ होतो
तुकाराम - तुकाराम म्हणता । तूचि श्रीराम होतो
केशव केशव म्हणता । शवहि केशव होतो.

**श्री. केशवराव लक्ष्मणराव पवार**

---

# संत तुकाराम महाराज आणि त्यांचे समकालीन

डॉ. अशोक प्रभाकर कामत

**आरंभिक**

संत तुकाराम, समर्थ रामदास आणि शिवाजी महाराज हे सतराव्या शतकातील महाराष्ट्राचे तीन महापुरुष. एक थोर वारकरी विठ्ठल भक्त साक्षात्कारी संत. दुसरे समर्थ विचारवंत सत्पुरुष. तिसरे राजकारण धुरंधर सेनानी आणि नीतिमान राजपुरुष तिघेही एकमेकांना पूरक ठरले. संत श्रेष्ठ ज्ञानदेव, नामदेव आणि महात्मा एकनाथ यांनी घडविलेल्या महाराष्ट्र धर्माला या तीन विभूतींनी पूर्णता आणली. त्यांचे ऐतिहासिक कार्यकर्तृत्व अत्यंत सुस्पष्ट आहे इतकेच नव्हे तर इतिहासात अशा प्रकारचा त्रिवेणी संगम त्याकाळीं वा नंतर; इथें वा अन्यत्र दाखवतां येत नाहीं. तुकोबांचे अनुयायी आणि समर्थांचे अनुयायी यांच्यात कमी जवळीक दिसली तरी मुळात त्या दोन महामानवांनी एकाच काळात प्रत्यक्ष कार्यरत राहूनही कधी एकमेकाचा संघर्ष होऊ दिला नाही. शिवाजी राजांनी दोघांशी आपल्यापरीने विनम्र संबंध जोपासले.

तुकोबांचे अन्यही अनेक समकालीन होते काही पूर्वकालीन थोर संतांचेही सहचर्य त्यांनी अनुभवले. काही उत्तरकालीन भक्तभागवत त्यांचे शिष्य ठरले या सर्वांचा एकत्रित विचार केला की, संतशिरोमणी तुकाराम महाराजांचे एक वेगळेच दर्शन घडते. हे दर्शन त्यांच्या निखळ संतत्वावर एकाग्र भक्तिसाधनेवर उत्तमप्रकारे प्रकाश टाकते.

**संत तुकारामांचा काळ**

सन १६०८ ते १६५० (काहींच्या मते १६०६ ते १६५१) हा तुकाराम महाराजांचा जीवन काळ. या काळात महाराष्ट्रात पाच मुसलमानी राजवटी नांदत होत्या. चंद्रराव मोरे, मोहिते, घोरपडे, जाधव, जेधे, खोपडे, बांदरे, शिर्के, निंबाळकर, भोसले अशी अनेक मान्यवर मराठे सरदार, इनामदार, जहागिरदार मंडळी मुसलमानांच्या जवळ सेवाचाकरी करीत होती. रयतेला कुणी आपला राजा नव्हता.

तुकोबा देहूच्या मोरे घराण्यातील. ही मंडळी भक्तभाविक. नित्य पंढरीची वारी करणारी. तुकोबांचे वडील मोठे व्यापारी. महाजनकीही करणारे. घरची स्थिती एकूण उत्तम. पुढे दुष्काळ पडला. व्यापार बुडाला घरपरिवारावरही अनेक आपत्ती आल्या. आप्तस्वकीय सोडून गेले. साधारण सतराव्या वर्षी / १६२५ च्या सुमाराला तुकोबा पूर्ण विरक्त झाले संतवाणीचे मनन चिंतन, श्री विठोबाची उत्कट भक्ती, भजनकीर्तन आणि ईश्वराचा धावा यातच तल्लीन होऊन गेले आपली हीच त्यांनी इष्टापत्ती मानली. 'बरे झाले देवा निघाले दिवाळे। बरे झाले जगी पावलो अपमान। बरे झाले नाही धरली बेईमान। तुझे पाय माझें राहियेले चित्तीं। ते मज दाविती वर्ण देवा' असे त्यांचे अनेक उद्गार हेच दर्शवितात. प्रपंच संसाराकडे आणि जगव्यवहाराकडे पाठ फिरवून तुकोबा श्रीविठ्ठलाशी - ईश्वरतत्त्वाशी एकरूप झाले साक्षात्कारी संतपुरुष म्हणून लोकमान्य झाले.

१६४५ च्या सुमारास शिवाजीराजांचे हिंदवी राज्याचे प्रयत्न सुरू झाले होते. तुकोबांच्या निर्वाणापर्यंत या स्वतंत्र राज्यस्थापनाकार्यात शिवरायांना यशाही मिळून गेले. एक प्रसंग सांगतात : राजे तुकोबांच्या कीर्तनाला गेले होते. त्यावेळी मौगलांची धाड आली. महाराज आणि त्यांच्या टाळक्यांनी राजांना अशा रीतीने श्रोत्यांत सामावून घेतले की, ते वेगळे ओळखणे अशक्य व्हावे, सर्वदिखत त्यांना पकडण्याचीही प्राज्ञा होवू नये!

जसे शिवाजीराजांवर माता जिजाबाई, अध्यापक दादोजी कोंडदेव यांचे संस्कार झाले तसेच तुकोबासारख्या संत-सत्पुरूषांच्या वाणी-विचारांचे, प्रवचन-कीर्तनांचेही संस्कार घडले. तुकोबांनी आपल्या काळातील नैसर्गिक आणि राजकीय आपत्तींची जराही स्वतः पर्वा केली नाही. तशीच इतर समाजानेही गलितगात्र होऊ नये यासाठी आपल्या परीने भक्तीचे तत्त्वज्ञान सांगितले : दंभ, ढोंग, कर्मकांड यात अडकून न राहता देवाची निर्मळ मनानं प्रार्थना करावी. देवावर सारा भार घालून नित्य भक्तिसुखाने असावे पण मुक्तीसाठी धडपड करू नये. आपापले कार्यकर्तव्य देवाला स्मरून करावे. प्रसन्न मन ठेवावे आणि शुद्ध भावाने कर्म करावे. अनंताच्या या जगाला एवढ्यातेवढ्याने विचलित झालं तर दुःख आणि उद्वेगच केवळ हाती येतात. म्हणून चित्ती सदैव समाधान बाळगून जे जे वास्तव आहे त्याचा स्वीकार करावा, असे तुकोबांनी आपल्या कालातील समस्यांचे उत्तर दिलेले आहे.

तुकोबारायांना जे केशवचैतन्य आदरणीय वाटले ते पुण्याचे. त्यांचे मूळ नाव विश्वनाथ. ते सन १५२४ ते १५७२ या काळात म्हणजे तुकोबांच्या बरेच आधी होऊन गेले अशी सर्वसाधारण समजूत आहे केशवचैतन्यांच्या भेटीसाठी तुकोबा दरवर्षी देहूहून मीना इंदूर मार्गे ओतूरला जात असत. त्यांच्या या यात्रेत गुरूंनी दिलेली पांडुरंगाची सोन्याची मूर्ती त्यांच्याकडे असायची. एकदा सायगावी बुवांचे कीर्तन सुरू असता मुसळधार पाऊस झाला. पण बुवा आणि श्रोतेही कीर्तनरंगात दंग राहिले. मंडपात काही पाऊस आला नाही. लोक भक्त झाले. बुवांना आग्रह करू लागले : त्यांनी देहूला परतू नये, सायगावीच रहावे. बुवांनी मध्यममार्ग काढला. आपले लेखनिक टाळकरी गंगाजीबुवा यांना त्यांनी सायगावात राहा, म्हणून सांगितले. आपल्याकडील सोन्याची मूर्ती सायगावाशेजारी कडूसला ठेवली. तेव्हापासून कडूस येथे माघ शुद्ध दशमी ते पौर्णिमा पांडुरंगोत्सव होतो. गंगाजीबुवांच्या हस्तलिखिताची

पूजा चालते. साडेतीनशे वर्षांपासून ही परम्परा टिकून आहे असे सांगतात.

ज्ञानदेव - सच्चिदानंद - विश्वंभर - राघवचैतन्य -बाळाजी - तुकाराम अशी तुकोबांची गुरूपरंपरा संत बहिणाबाई देतात. संत महिपति बोवा आणि दास पंचायतनातील रंगनाथस्वामी निगडीकर या म्हणण्याला पुष्टी देतात.

बंगालचे श्रीकृष्णभक्त चैतन्य महाप्रभू काही काळ पंढरपूरकडे आले होते. त्यांचा तुकोबांशी संबंध आला असावा, असे गाथेचे साक्षेपी संपादक श्री. पु. मं. लाड यांनी अनुमान केले आहे.

श्री. वा. सी. बेंद्रे यांनी तुकारामांच्या गुरूशिष्य परंपरेचा बराच धांडोळा घेऊन असे प्रमाणित केले आहे. राघवचैतन्य ऊर्फ लाडले प्रज्ञामख यांची समाधी गुलबर्गाजवळ आळंद येथे दाखवितात. केशवचैतन्य हे त्यांचे शिष्य. ते जुन्नरनजिक ओतूर येथे राहत. त्यांचे शिष्य बाबाजी हे तुकोबांना उपदेश देतात. हा प्रसंग ओतुरास नदीवाटेवर घडला. या बाबाजींची समाधी आज शेख शहाबुद्दीन दर्गा म्हणून मान्यहळ (जि. गुलबर्गा) इथे आहे. श्री. बेंद्रे यांचे हे म्हणणे विवाद्य असले तरी ते अद्यापि खोडून काढण्यात आलेले नाही.

तुकोबांच्या गाथेचा / हिंदी काव्याचा विचार केला की, वरील मतासंबंधी अनेक प्रश्नचिन्हे निर्माण होतात. एकतर वरील गुरुपरंपरेशी संबंधित प्रभावखुणा, प्रसिद्ध स्थाने, तेथील आजची परंपरा पाहिली की याचा वारकरी संप्रदायाचे कुतूहल ठरलेल्या तुकोबारायांचाही कसा अनुबंध पोहोचतो, याचा नीटसा उलगडा होत नाही. या ज्येष्ठांच्या वा चैतन्यमहाप्रभूंच्या काव्याशी / कार्याशी देखील तुकोबांचे नाते जोडणे अवघड होते.

**'नामाचा तुका'**

'ज्ञानाचा एका, नामाचा तुका आणि कबिराचा शेखा' अशी एक म्हण वारकरी संप्रदायात प्रचलित आहे. आम्हाला ही पारंपारिक समजूत फार अर्थपूर्ण वाटते. ज्ञानदेवांचा नि एकनाथ महाराजांचा अनुबंध अनेक भागांनी सुस्पष्ट आहे : नाथांनी ज्ञानदेवी प्रतिशुद्ध केली, संपादित केली. तीच वारकरी श्रद्धापूर्वक वाचतात. त्यांनी लिहिलेली भागवत टीका ही ज्ञानदेवीची एक प्रकारे टीका होय. अलंकापुरीच्या ज्ञानदेवसंजीवन समाधीचा जीर्णोद्धारही नाथांनी केला. याविषयी दुमतही नाही.

महात्मा कबीरदासांच्या काव्याचा प्रभाव शेखमहंमदांच्या मराठी रचनेवर दिसतो. तुकोबांच्या काव्यवृत्तीवरही जाणवतो. नामदेव - कबीर - नानक अशी उत्तरेतील 'संतमता'ची समाजमनस्क विचारी कवींची परंपरा आहे.

'नामाचा तुका' हे म्हणणे वरील दोन उक्तींपेक्षा अधिक उत्कृष्टपणे प्रभावित करता येईल. नामदेव तुकाराम हे दोघेही बहुजनांचे नायक. दोहोंची पंढरीक्षेत्र / श्री विठ्ठल यांच्याविषयींची प्रीती अत्यंत प्रसिद्ध. दोघेही समाजाशी समरस झालेले अभंग गायन / वारकरी कीर्तनकार. दोघांनी आपल्या अलौकिक अनुभवांची अभंगकविता विपुल लिहिली. या दोहोंच्या अभंगात कितीतरी साम्यस्थळेही आहेत. आपल्याला कवित्वाची प्रेरणाच मुळी नामदेवरायांनी दिली, असे तुकोबा स्पष्टपणे सांगतात.

नामदेवें केले स्वप्नामाजीं जागे ।<br>
सवें पांडुरंगे येऊनियां ॥<br>
सांगितले काम करावें कवित्व ।<br>
वाउगें निमित्य बोलों नको ॥<br>
प्रमाणाची संख्या सांगे शतकोटी ।<br>
उरले शेवटी बाकी तुका ॥

नामदेवांनी शतकोटी अभंगरचनेचा आपला संकल्प पुरा करण्याची आज्ञा आपल्याला दिली असेही तुकोबा म्हणतात.

नामदेवांची शब्दरचना ९४ कोटी ४१ लाख तर तुकोबांची त्यात भर ५ कोटी ५९ लाख अशी एक गणती आपल्या भक्तलीलामृतात (दूर) महीपतिबोवा ताहराबादकरांनी केली आहे. तुकारामगाथेचे एक आद्य आणि श्रेष्ठ समाइक पंडित यांनीही 'वेदाचे अभंग केले श्रुतिपर' या अभंगाद्वारे तुकोबांच्या रचनेची गणना केलेली आहे. फरक पन्नास लाखाचा आहे. हे सारे ध्यानी घेतले की, या दोन्ही कवींनी विपुल रचना केली आणि तुकोबा नामदेवांचा आदर्श आपल्यापुढे अनेक प्रकारे ठेवतात, याला परम्परेची कशी साक्ष आहे, हे स्पष्ट होते.

**दासपंचायतन**

१५९९ ते १६७२ हा जयरामस्वामी वडगावकरांचा काळ. सातारा खटाव तालुक्यातील मौजे वडगावात यांचा मठ आहे. माधुकरी मागून यांनी विद्याध्ययन केले. वीरशैव परम्परेतील इष्णोप्पांकडून उपदेश घेऊन यांनी वैष्णव-शैवांचे झगडे मिटविण्याचा प्रयत्न केला. भागवत दशमस्कंध , अपरोक्षानुभव, प्रबोधसुधाकर इत्यादी टीकाग्रंथ, ज्ञानीभक्तसंवादाचे आध्यात्मिक प्रकरण, सीतास्वयंवर, रूक्मिणीहरण ही काव्ये; आणि बरीच अभंगपदे यांच्या नावावर मिळतात.

जयरामस्वामी तुकोबांची महती जाणून होते. समर्थ रामदासांचेही महत्त्व त्यांना समजत होते. दासपंचायतनात त्यांचा गौरवपूर्वक अंतर्भाव केलेला दिसतो. आनंदमूर्ती ब्रह्मनाळकर (१६२२ - १६९६). केशव स्वामी भागानगरकर (१६०८ - १६८२) रंगनाथस्वामी निगडीकर (१६१२ - १६८४) हे दासपंचायतनातील अन्य प्रसिद्ध कवी. हेही तुकोबांचे समकालीन. पण त्यांचा नि तुकोबांचा फारसा संबंध आल्याचे दिसून येत नाही.

**जयराम स्वामी आणि बहिणाबाई**

जयराम स्वामींची कीर्तने कोल्हापूरला होत होती. ती ऐकण्यासाठी लहानशी बहिणाबाई आपल्या आवडत्या वासराला घेऊन जात. या प्रकाराचे कौतुक वाटून स्वामींनी मुलीची चौकशी केली. तिच्या पतीला काही समजाविले. पण उपयोग झाला नाही. उलट पतीकडून बेदम मार मिळाला. त्या बेशुद्ध झाल्या. शुद्धीवर आल्या तेव्हा पांडुरंगाचे आणि स्वामींचे दर्शन घडले. स्वामी तुकोबांची पदे गातात, हे जाणवले. ही साक्ष फार महत्त्वाची आहे.

जयरामस्वामींसारखा अन्य परंपरेतील एक अधिकारी सत्पुरुष आपल्या एका समकालीन / वयाने लहान अशा सत्कवीची पदे गातो यात तुकोबांच्या जनप्रियतेबरोबरच जयरामस्वामींचेही औदार्य दिसून येते.

पुढे जयराममेटीसाठी तुकोबा आले तेव्हा बहिणाबाईही भेटते. अशी एक स्वप्नाभासकथा त्यांनी आत्मचरित्रात दिली आहे.

मजवरी दृष्टी कृपेची वोतली । प्रेमाची गुंतली माय जैसी ।।
अंतरीची पूजा घेऊनी जयराम । गेला तो सप्रेम स्वस्थानासी ।।
उगाचि बैसला आसनीं नेमस्त । करूनिया स्वस्थ चित्तवृत्ती ।।
तर काही एक अपूर्व वर्तले । तुकारामे दिल्हे दर्शनासी ।।
करी नमस्कार भेटुनी आनंदे । अत्यंत आल्हादें स्वामीसखा ।।
मजही दरूषण दिधले आळुमाळ । घातला कवळ मुखामाजी ।।
मज म्हणे आलो जयराममेटीसी । तुजही मानसी वोळखिले ।।

'झळकती पताका कळस दिसतो नेटका' असे नामदेवरायांनी पंढरीक्षेत्राचे वर्णन केले आहे. तुकोबा - बहिणाबाईचे स्मरण झाले की, या चरणाचा एक वेगळाच आशय ध्यानी येतो. तुकोबाराय मेघवृष्टीने जनांना उपदेश देतात. त्यांचा आत्मविश्वास वाढवितात. नाठाळांचे माथा काठी उगारण्याची आणि सुजनांना अभय देण्याची त्यांची तयारी असते. पण त्यांनी प्रत्यक्षात कोणाला शिष्यत्व दिलेले नाही. त्यांचा वारसा बहिणाबाईच्या वाट्याला आला. बहिणाबाईच्या काव्य-स्पर्शाने त्या वारकरी भागवत धर्ममंदिराच्या कळसावरील ध्वजा होऊन फडकू लागल्या. त्यांच्या सद्गुरूचे भागवत धर्ममंदिराचे कळशकार्यही यांनी अभिमानाने कथन केले!

तुकाविप्र (१७२९ - १७९३) उर्फ तुकाराम भगवंत विपट हे तुकोबांच्या पुढील काळात झालेले एक प्रसिद्ध भागवत संप्रदायी कवी. त्यांच्या मातृवंशाकडून एकनाथांशी संबंधित. याना सातारकर भोसले, नानासाहेब - भाऊसाहेब पेशवे बरेच मानीत. हे शीघ्रकवी. तौच कीर्तनाचा नियम. त्यासाठी गावोगाव संचार. यांना राजकृपेने बरीच इनामे मिळाली असे सांगतात.

तुकाविप्र यांची बरीच अभंगपद रचना, अन्य कीर्तनापयोगी सामग्री उपलब्ध झाली आहे. ज्ञानेश्वर - चरित्राख्यान, सुदामचरित्र, भानुदासचरित्र, कालियामर्दन, आत्मसिंधु अशीही काही प्रकरणग्रंथ रचना आहे.

आपल्या नावाचा आणि तुकोबांच्या नावाचा घोटाळा होऊ नये यासाठी त्यांनी 'तुकाविप्र' म्हणवून घेतले असे लिहिले गेले. आहे वस्तुतः नाथांच्या वंशातील विप्रनाथ हे त्यांचे सद्गुरू म्हणून त्यांनी स्वतः 'तुकाविप्र' म्हणवून घेतले.

तुकाविप्र हे तुकोबांचे साक्षात अवतार होते. आणि नामदेव तुकोबांचे शतकोटी अभंगरचनेचे उर्वरित कार्य तुकाविप्रांनी पूर्ण केले असे त्यांचे वंशज म्हणतात. तुकाविप्र मठ पंढरपूर येथे असून अलिकडेच त्यांनी यासंदर्भात एक ग्रंथही प्रसारित केला आहे.

समर्थ रामदास :-

संत तुकाराम आणि समर्थ रामदास हे एकाच काळातील सत्पुरुष. पण त्यांचे उपासनासंप्रदाय भिन्न. आराध्य निराळे. आचारविचार अन् कवित्व भावांतही पुष्कळ अंतर.

भागवत धर्ममंदिराचे कळश म्हणून तुकोबांचा बहुमान. अभंग कीर्तनाद्वारे सामाजिक दंभढोंगावर कोरडे ओढीत त्यांनी बहुजनांना परोपरीने जागविले. ते म्हणत : ज्यांना गुणांची पारख नसते, अंतरंगाची ओळख नसते, खऱ्याखोट्याची चाड नसते -- अशा मंडळींचे मोठेपण काय कामाचे? म्हणून अशा मंडळींची तमा न बाळगता समताप्रेमी भक्तिपंथाची कास धरून डोळसपणाने आपले कर्तव्यकर्म करीत जीवनाचे सार्थक करावे. दुष्टदुर्जनांना दयामाया न दाखविता, प्रसंगी नाठाळांच्या माथी काठी हाणणे आणि भेदाभेद अमंगळ मानून सच्च्या वैष्णवधर्माचा आत्मविचार करणे आवश्यक.

तुकोबा वारकरी संप्रदायाचे एक मातब्बर नेते आणि साक्षात्कारी संत. प्रतिभासंपन्न कवी. प्रभावी कीर्तनकार. कष्टकरी बहुजनांनी हर प्रकारे केविलवाण्या जिण्यापासून परावृत्त व्हावे आणि दारिद्र - अज्ञान यांवर मात करीत उच्च विचारसरणीही स्वीकारावी यासाठी ते आजीवन झटत राहिले.

समर्थ उच्चकुलीन ब्राह्मण सहज मिळालेल्या जन्मजात प्रतिष्ठेच्या आधारे राहून पोटापुरते पुजारीपण वा पौरोहित्य करणाऱ्यांचे वारसदार व्हावे, असे त्यांना वाटले नाही. त्यांनी द्रष्टेपणाने स्वकीयपरकीय व्यक्तींचा वेध घेऊन आपल्या समाजाचे संघटन आपल्यापरीने आरंभिले. मठस्थापना करून, त्यासाठी महंत निर्माण करून, प्रतिष्ठित वर्गातील नैराश्य दूर करून, त्यांना शिवाजीराजांच्या स्वातंत्र्यचळवळीशी निगडित करण्याचा हेतूपुरसर प्रयत्न हे समर्थकार्याचे सर्वाधिक महत्त्वाचे वैशिष्ट्य ठरते.

समर्थपूर्व तुकारामांपर्यंतच्या मराठी संतपरंपरेने प्रपंच परमार्थमय करावा, मानवी जीवनाचा सदुपयोग करावा, हे सातत्याने सांगितले. पण समर्थांनी हरिकथानिरूपणाला रामकथेची जोड देऊन प्रपंच कसा नेटका करावा ते बारीकसारीक तपशीलवार सांगितले. त्याचबरोबर निवृत्तिपरता आणि सक्रियता, विरक्ती आणि विजिगीषुवृत्ती, साधना आणि सावधानता, प्रयत्न आणि विवेक अशा विविध गुणांची विधायकपणे सांगड यालीत समर्थांनी एक तेजस्वी तत्त्वज्ञान स्वबांधवांसमोर ठेवले. वीरवृत्तीने जे परकीयांचा प्रतिकार करीत होते, त्यांना प्रोत्साहन दिले. शास्त्रीपंडित विद्याविभूषित जनांना त्यांनी स्वकर्तव्यांची जाणीव करून देऊन त्यांनी विधायक चळवळीचे बळ ओळखावे, अशी हाक दिली. अशाप्रकारे परिस्थितीनुरूप हरीकथा निरूपणा करणारे समर्थ रामदास हे अपवादात्मक संत ठरतात.

वैयक्तिक जीवनातील दुःखांतून विरक्ती आणि नंतर भक्तीकडे वळून ती भक्ती-मुक्तीसाठी नव्हेतर सामाजिक शक्ती म्हणून कशी समर्थ ठरेल, असा प्रयत्न करणारे तुकोबाराय हे बहुजन वारकऱ्यांना संतश्रेष्ठ

वाटतात. ते भागवत धर्ममंदिराची पूर्ती करणारे / त्यांचा मंदिरकलश शोभणारे, पथदर्शी दीपस्तंभ ठरतात.

तुकोबारायांच्या पाठोपाठ मराठी भक्तिपरंपरेला एक वेगळे वळण देण्यास प्रवृत्त झालेले रामदास आपल्या यशस्वी तपःसाधनेनंतर उर्वरित जीवन योजनापूर्वक देशकार्यासाठी वेचतात. स्वकीयांचे सुसंघटन उभारीत त्यांना रामभक्तीबरोबरच रावणवधासाठी कटिबद्ध झालेल्या वीरांबरोबर जाण्यासाठी प्रवृत्त करतात. आपल्या महाग्रंथाच्या माध्यमातून समाजासमोर प्रपंचविज्ञानाचा ज्ञानकोश ठेवतात. शिवछत्रपतींच्या देशकार्यास पूरक ठरतील, असे विविध प्रयत्न करतात. हे विधायक राजकारण करीत असतांना हरिकथानिरूपण न सोडून भक्तिपंथानेच सज्जन-महंतांनी जायला हवे असे ते सांगतात.

**शिवाजी राजे :-**

तुकोबांचे समकालीन म्हणून बाळशिवाजी राजांचा विचार करायलाच हवा. तुकोबा अहो रात्र पंढरीच्या पांडुरंगाच्या भजनकीर्तनात रंगलेले तर शिवाजी राजे बाळपणापासूनच देवाधिदेव शंभु महादेव आणि शक्तिदेवता भवानी माता यांच्या अर्चनेत आनंद मानणारे. स्वतंत्र हिंदवी स्वराज्याच्या स्थापनसाठी देवदेवतांचे आणि सज्जनांचे आशीर्वाद असावेत, असे त्यांचे प्रयत्न.

देहू - पुणे - लोहोगावी तुकोबांची कीर्तनें व्हायची. त्याकाळी बाळशिवाजी राजे पुण्याच्या कसब्यातील लाल महालात राहत. पंचक्रोशीतील बारामावळात बहुजनांचे संघटन करीत.

तुकोबा - शिवराय यांनी स्वराज्यस्थापना कार्यासाठी एकत्र येऊन कार्य केले, याबद्दलच्या काही दंतकथा महीपती देतात. गाथेतही त्या विषयी थोडा निर्देश येतो. कीर्तनाचे वेळी परचक्र आले आणि श्रीविठ्ठल भक्तांचा निर्धार पाहून भगवंतानेच रक्षिले, असा महीपतींच्या कथांचा सूर आहे. दादोजी कोंडदेव, शिवबा आणि तुकोबा यांच्या भेटी झाल्याच्या काही कथा सांगतात. पाईकीच्या अभंगांतून गनिमी काव्याची सूचना आहे, असेही मांडले गेले आहे.

तुकोबा - शिवबा संबंधावर प्रकाश टाकणारा सर्वात बोलका प्रसंग असा सांगितला जातो.

एकदा राजांनी तुकोबांचा सन्मान करायचे ठरविले. पालखी, घोडे, छत्री, अब्दागीर आणि ताट भरून सोन्याची नाणी असा नजराणा घेऊन राजांचे सेवक, शिपाई देहूला दाखल झाले. सारा गाव चकित झाला. पत्नी जिजाबाई हरखून गेली. पण तुकोबांच सारं वेगळंच होतं. ते राजदरबारच्या मंडळींना हात जोडून म्हणाले. 'तुमच्या राजेसाहेबांचे स्वराज्याचे प्रयत्न मला ठाऊक आहेत. हे सारें जे तुम्ही आणले आहे, ते माझ्यापेक्षा त्यांनाच अधिक उपयोगी आहे. मला याचा काहीच उपयोग नाही. त्यांना माझा नमस्कार सांगा आणि हे धनही तुमच्या चांगल्या कामासाठी खर्च करावे असा सांगावा सांगा.' यावर त्यांनी एक अभंगही रचल्याचे प्रसिद्ध आहे.

दिवट्या छत्री घोडे, हें तो बऱ्यांत न पडे ।
आता येथें पंढरीराया, मज गोविसी कासया ॥
मानदंभ चेष्टा, हे तो शूकराची विष्ठा ।
तुका म्हणे देवा, माझे सोडवणें धावा ॥

यातून साऱ्यांनाच तुकोबांचा स्वभाव समजला. त्यांना पैशाचा अजिबात मोह नव्हता. मानसन्मानाची हौस नव्हती. त्यांचा सगळा भर साधी राहाणी आणि उदात्त विचारसरणी यांवर होता. त्यांनी पुढे अभंगांतूनच शिवबांना एक पत्र पाठविले. ते वाचण्यासारखे आहे त्यातूनही तुकोबा-शिवबांचे खरे दर्शन घडू शकते :

शिव तुझे नाम ठेविलें पवित्र । छत्रपति सूत्र विश्वाचे की ॥
व्रतनेमतप ध्यान योग कळा । करूनि मोकळा जालासि तू ॥
...तुका म्हणे माझी विनंती सलगीची । वार्ता हे भेटीची करूं नका ॥
तुम्हांपाशी आम्ही येऊनियां काय । वृथा सीण आहे चालण्याचा ॥
...निद्रेसी आसन उत्तम पाषाण । दरी आवरण आकाशाचे ॥
तेणें काय करणें कवणाची आस । वायां होतो नाश आयुष्याचा ॥

असे गोड शब्दात सारे लिहून तुकोबांनी शिवबांना काही हिताच्या गोष्टीही सांगितल्या - 'भल्याचा वीट मानू नये! निंदक दुर्जन यांना जवळ थारा देऊ नये. राज्याचे रक्षक कोण आणि स्वार्थसाधू कोण, यांची कडक परीक्षा घेत असावे. अनाथांना साहाय्य करण्यात कुसूर करू नये.

आपण पाठविलेला नजराणा परत आला आणि वर असे पत्र आले म्हणून शिवबा तुकोबांवर रागावले नाहीत. उलट त्यांच्या मनात आधीच असलेला आदर वाढला.

तुकोबांनी आपल्या अभंगांनी जनमन जागविले. शेतकरी, कामकरी यांना ज्ञान दिले. मावळे शिपाई साऱ्यांमध्ये एक जोम निर्माण केला. भक्ती म्हणजे केवळ भजन गायन नव्हे, केवळ टाळमृदुंग वाजवणे नव्हे, हे परखडपणे सांगितले. वाईटाला कडाडून विरोध करावा, नाठाळांना हाणावे, दुष्टदुर्जनांना अद्दल घडवावी, हे देखिल बजावले. याचा शिवाजी राजांच्या स्वराज्यप्रयत्नांना खचितच उपयोग झाला असावा.

तुकोबांनी नजराणा नाकारून आपली निःस्पृहता राखली आणि शिवकार्याबद्दलची प्रीतीही प्रकट केली असे म्हटले पाहिजे. तुकोबांच्या निर्याणानंतर त्याचा संसार उघडा पडला. परिवाराचा योगक्षेम नीट चालावा यासाठी तुकोबांचे पुत्र नारायणबोवा यांना त्यांचे गेलेले वतन परत मिळवून देण्यात आले. शिवाजीराजांचे तुकोबांविषयींचे प्रेम आणि आदर यातूनही दिसतो.

**शेखमहंमद**

नगरनजीकच्या श्रीगोंद्याचे शेखमहंमद हे तुकोबांच्या काळातील एक ज्येष्ठ आणि श्रेष्ठ मुसलमान मराठी संतकवी. त्यांची कबीराचा अवतार म्हणून प्रसिद्धी आहे. 'शेख महंमद अविंध । त्यांचे हृदयी गोविंद' अशीही ख्याती सांगतात.

नाथगुरु जनार्दन स्वामींचे गुरु चांदबोधले हेच शेख महंमदांचे गुरु असे काही संशोधकांचे मत आहे. यावरून त्यांची सूफी कादरी परम्परा

निश्चित होते.

मालेजीराजे भोसले यांनी शेखमहंमदांना गुरु मानून इ.स. १५९५ मध्ये त्यांना श्रीगोंदाला मठ बांधून दिला. ह्या मठात शेखमहंमद सुमारें पासष्ट वर्षे राहिले असे म्हणतात.

शेखमहंमदाची रचना मुख्यतः मराठीत असली तरी हिंदी, उर्दू, फारसीतही थोडी आहे 'योगसंग्राम' हा त्यांचा स्वतंत्र आध्यात्मिक ग्रंथ. तो ज्ञानेश्वरी-भागवतानंतरचा मराठीतील ठळक प्रबंध. यात आत्मारूपी योद्धा मनाच्या वारूवर स्वार होऊन अहंकारादि रिपूंवर स्वारी करतो, असे वैशिष्ट्यपूर्ण रूपक करून ब्रह्माण्डशिखर गाठलेले आहे.

शिवकार्तिक-संवादात्मक संस्कृत शिवस्वरोदय ग्रंथाचा पवनविजय, नामक एक अनुवाद ही त्यांनी रचला. 'निकलंकप्रबोध' हा त्यांचा तिसरा मोठा ग्रंथ. याशिवाय त्यांनी भरपूर पदरचना केली. ती तुकोबांप्रमाणेच लोकजीवनातील दुष्ट चालीरीती विरूद्ध आहे. धर्माच्या नावावर जे आंधळे आचारविचार रूढ होते, क्षुद्रदेवोपासना चालू होते, हिंदूमुसलमानांचा दांभिकपणा चालायचा, त्यावर शेख महंमदांनी घणाघाती प्रहार केले. त्यांची रूपके, भारूडे, अभंग, तत्कालीन समाजाचे विदारक चित्रण करतात.

वस्तुतः तुकोबांच्या समकालीन कवीत शेखमहंमद हा सर्वार्थाने थोर कवी. त्याची आणि तुकोबांची प्रत्यक्ष गाठभेट झाली कशी नाही याचे आश्चर्य वाटते. वस्तुतः दोघेही श्रीविठ्ठलाचे भक्त. वारकऱ्यांशी निगडित. पंढरी आळंदी देहू पासून शेखमहंमद लांब नव्हते. दोघांची कविप्रकृती बरीचशी सारखी. जसा तुकोबांवर महात्मा कबीरदासांचा प्रभाव तसाच शेखमहंमद यांच्यावरही दिसतो. 'कबिराचा शेखा' प्रमाणेच 'कबिराचा तुका' ही म्हटले जाते.

तुकोबा आणि शेखमहंमद हे एकत्र आले असते तर वारकरी संप्रदायाचे सामर्थ्य अधिक वाढलें असतें असें म्हणावेंसें वाटतें.

**शिष्य परंपरा :**

तुकोबांचे सांगाती म्हणून सुमारे पंचवीस व्यक्तींचा विचार केला गेला आहे. पण ज्यांचा शिष्यपरंपरा म्हणून उल्लेख होतो, असे सोळाजण दिसतात : महादजीपंत कुलकर्णी, गंगाराम मवाळ कडूसकर, संताजी तेली जगनाडे, गवरशेट वाणी सदुंब्रेकर, मालजी गाडे, येलवाडीकर, मल्हार पंत कुलकर्णी, मिखळीकर, कोंडोपंत लोहकरे, शिवबा कासार, नावजी माळी, अंबाजीपंत, लोहगावकर, कोंडपाटील खांदवे, बहिणाबाई, रामेश्वर भट वाघोलीकर, तुकया बंधू, कान्होबा, कचेश्वर ब्रह्मे चाकणकर, निळोबाराय पिंपळनेकर. यापैकी बहुतेक टाळकरी आहेत. त्यांची काव्यरचना नाही. जगनाडे आणि कडूसकर हे दोघेच साक्षर होते तुकोबांचे अभंग गंगाजी लिहून ठेवीत. त्यांच्या हस्ताक्षरातील दोनहजार पृष्ठांची साडेचार हजार अभंगांची एक गाथा उपलब्ध आहे. जुन्नरी कागदावर सुबक अक्षरात लिहिलेली ही पोथी राजगुरुनगर नजीकच्या कडूस या गावी आज आहे.

संताजीही तुकोबांचे लेखक. अगदी लहानपणापासून अखेरपर्यंत त्यांनी बोवांना साथसोबत केली. त्यांच्या हस्तलिखित वह्यावरूनच पारंपारिक गाथा सिद्ध होऊ शकली. संताजी तुकाराम संवादाचे अभंग 'घोण्याचे' म्हणून प्रसिद्ध आहेत. त्यात तेली व्यवसायाची रंजक भाषा आली आहे.

रामेश्वरभट, कान्होबा, भागूबाई, बहिणाबाई आणि संताजी हे समकालीन. त्यांची काही रचनाही मिळते. निळोबा, कचेश्वर हे समकालीन. यांचीही रचना आहे.

तुकोबारायांच्या वाणी-विचारांचा प्रभाव जनमानसावर लगोलग पडला. त्यातून प्रेरणा घेऊन अनेकांनी आपले भावविश्व फुलविण्याचा प्रयत्न केला. काहींना तुकोबाप्रमाणेच स्वप्नसाक्षात्कार घडला. निळोबाराय हे तुकोबांचे सर्वप्रमुख शिष्य. त्यांना तुकोबांनी स्वप्नातच बोध दिल्याचे ते सांगतात. संतचरित्रकार महिपतीबोवा ताहराबादकर यांनाही असाच स्वप्नबोध घडल्याचे ते लिहितात. कचेश्वर ब्रह्मे यांनीही आपल्याला तुकोबांकडून प्रेरणा मिळाल्याची नोंद केली आहे.

तुकारामशिष्यात सर्वात भाग्यवान बहिणाबाई. (जन्म १६२९) त्यांना तुकोबांचे कीर्तन श्रवण करण्याचा आणि त्यांचेकडून प्रत्यक्ष बोध मिळाल्याचे भाग्य लाभले. त्यांनीच लिहिल्याप्रमाणे 'बहिणी वारकरी संप्रदायाचा कळस ठरलेल्या तुकोबांची साक्षात फडकती ध्वजा' बनली.

बहिणाबाईनी आपले आत्मचरित्र लिहिले आहे. त्यांची जीवनकहाणी करुण आहे. वयाच्या तिसऱ्या वर्षीच तीस वर्षाच्या एका बिजवराशी विवाह झाला. आठव्या वर्षी पित्याबरोबर देशाटनाला निघावे लागले. परागंदा व्हावे लागले. प्रवासात दूरवर क्षेत्री जयराम स्वामींच्या कीर्तनाचा लाभ घडला. त्यांनी तुकोबांची महती सांगितली. म्हणून त्या तुकोबांच्या वाणीकडे वळल्या. १६४७ मध्ये जीवनाच्या अगदी अखेरच्या दिवसात तुकोबांनी बहिणाबाईवर कृपा केली. त्यांचे चारशे अभंग प्रसिद्ध आहेत. *'संतकृपा झाली । इमारत फळा आली'* हा वारकरी संप्रदायाचा संक्षिप्त इतिहास सांगणारा प्रत्येक श्रेष्ठ वारकरी कवीचे महत्त्व नेमकेपणाने कथन करणारा अभंग बहिणाबाईचाच.

**कान्होबा आणि भागूबाई**

हे तुकोबांचे धाकटे भाऊ. ते बुवांच्या कीर्तनात ध्रुपद धरीत. त्यांनी नाटाचे अभंग तुकयाबंधु अशा मुद्रेने रचले आहेत. आत्मनिवेदन, विठ्ठलभक्ती, सांकेतिक, आरत्या असे सारे मिळून ९५ अभंग त्यांच्या नावांवर मिळतात. त्यावर तुकोबांचा सहज स्वाभाविक असा प्रभाव दिसून येतो.

तुकोबांच्या निर्वाणानंतर दुःखीकष्टी होऊन त्यांनी श्रीविठ्ठलाशी भक्ति, मुक्ति तुझें जळो ब्रह्मज्ञान । दे माझ्या आणोन भावा वेगी' असे कठोर शब्दात संभाषण केले. त्यातून स्फुरलेले ४३ अभंग विशेष प्रसिद्ध आहेत.

तुकोबांची मुलगी भागूबाई कविता करीत असे. तुकाराम तात्यांनी संपादिलेल्या गाथेच्या शीर्षकात भागूबाईचे नाव आहे. प्रत्यक्षात दोन अभंग मिळतात. यात तिची उत्कट विठ्ठल भक्ती आणि संतसंगाची ओढ

भावपूर्ण शद्बात प्रकटली आहे.

**कचेश्वर ब्रह्मे**

कचेश्वर सिद्धेश्वर ब्रह्मे पुण्यानजीकच्या चाकणचे एक वेद विद्यासंपन्न कर्मठ ब्राह्मण, १६४० ते १७२१ असा त्यांचा काळ. त्यांचे आजोबा मेघनाथ हे शिवाजीराजांकडे पौरोहित्य करीत. पुढे शाहू महाराज आणि त्यांची दासीपत्नी विरूबाई यांनी कचेश्वरांकडून अनुग्रह घेतला, म्हणून त्यांना राजगुरू असे उपनाव मिळाले.

तुकोबांचे भक्त अंबाजी यांच्या सहवासामुळे कचेश्वर त्यांना मानू लागले. पुढे त्यांना तुकोबांकडून स्वप्नोपदेश मिळाला असे त्यांनी आपल्या आत्मचरित्रात लिहिले आहे. त्यांनी तुकोबांच्या देहयष्ठीचेही 'वर्तुळ दोंद पोट, नेत्र नासिका नीट दंतपंक्ती लघु आरक्त ओठ' इत्यादी लिहून ठेवलेले वर्णन महत्वाचे मानले जाते. त्यांनी विविध वृत्तांत नादमधुर आख्यानपर रचना केली. त्यांनी तुकोबांवर भक्तिभावाने आरत्या रचल्या आहेत.

कचेश्वर हे वैदिक घराण्यातील पाठशाळेत शिक्षण घेतलेले, उपाध्येपण करणारे ब्राह्मण, त्यांनी तुकोबांचे स्वप्नात शिष्यत्व स्वीकारून ते उघडपणे सांगितले ही लक्षणीय बाब ठरते. यातून तुकोबांचा अधिकार प्रकट होतो. कचेश्वरांचीही निर्मळ वृत्ती दिसून येते.

**निळोबाराय**

निळोबा मकासरे, पिंपळनेरकर यांच्या घराण्यात परंपरेने जोसकुलकर्णीपण होते पण बालपणापासूनच परमार्थाची आवड उत्पन्न झाल्याने निळोबांनी आपली कुलकर्ण्याची वृत्ती दुसऱ्याला देऊन जीवनमार्ग बदलला. संतवाणीचे वाचन मनन - गायन यात ते रमले. तुकोबारायांची कीर्ती ऐकून त्यांचेच नित्य चिंतन करू लागले. देहूला येऊन त्यांचे दर्शन घडावे, म्हणून प्रार्थना करीत बसले. त्यावेळी तुकोबांच्या निर्वाणाला पंचवीस वर्षे झाली होती. पण विठोबांच्या उत्कट भक्तिप्रेमामुळे त्यांना

*येऊनियां कृपावंते । तुकयास्वामी सद्गुरुनार्थे ।*
*हात ठेविला मस्तकीं । देऊनि प्रसाद केलें सुखी ॥*

असे साक्षात दर्शन घडले. पुढे

*'मन विश्रांति पावलें ।गुरूचरणी स्थिरावले.॥'*

अशी स्थिती होऊन गेली.

निळोबांनी तुकोबांचा भजनसंप्रदाय आणि कीर्तनपरम्परा निष्ठापूर्वक पुढे नेली. त्यांचे सुमारे तेराशे अभंग मिळतात. या वाणीवर तुकोबांचा सुस्पष्ट ठसा आहे.

वारकरी परम्परा ज्ञानोबा ते तुकोबा अशी मानली जाते. वारकरी कीर्तनात तुकोबांच्या पुढील संतांचे अभंग स्वीकारायचे नाहीत, असा दंडक असला तरी निळोबा हे त्याला अपवाद आहेत.

**रामेश्वर भट**

हे वाघोलीचे भट. यांनाही तुकोबांबद्दल मत्सर वाटायचा. गावकऱ्यांच्या नादी लागून त्यांनी तुकोबांना बरेच छळले असे सांगतात. त्याबद्दलच्या कितीतरी दंतकथाही आहेत.

केवळ तुकोबांना नामोहरम करायचे म्हणून हे देहूला येऊन राहिले. त्यांची प्रतिष्ठित ब्रह्मवृंदांशी मैत्री होती. त्यांनीच तुकोबांचे अभंग पाखण्ड प्रचार करणारे ठरवून अभंगांच्या वह्या इंद्रायणीच्या डोहात बुडवायला लावल्याची कथा आहे. पण तेरा दिवस अन्नपाणी वर्ज्य करून तुकोबांनी देवाचा धावा केला. श्रीविठ्ठलाला सांकडे घातले. विरोधकांवर आपल्या प्रत्यक्ष आचारसंयमाने मातच केली. पुढे तुकोबांचा अधिकार ध्यानी आल्यावर रामेश्वर भट बदलले. त्यांनी सरळ त्यांचे शिष्यत्व स्वीकारले एकनिष्ठ भक्त बनले. त्यांचे पाच अभंग मिळतात. त्यात तुकोबांविषयींचा आत्यंतिक प्रेमभाव प्रकट झाला आहे.

*'तुका विणा नाही दुजा', 'तुकया परब्रह्म अवतरला', 'पांडुरंग त्याचे देही बैसला'*, असे अनेक चरण रामेश्वर भट्टांचे उत्कट प्रेम प्रकट करणारे आहेत.

*'आरती तुकारामा । स्वामी सद्गुरू धामा ।*
*सच्चिदानंद मूर्ती । पाय दाखवी आम्हा ।'*

असा अत्यंत विरक्त भाव आपल्या आरती रचनेतून व्यक्त करणारे रामेश्वर भट तुकोबांपेक्षा सुमारे पंचेचाळीस वर्षांनी मोठे होते, हे ध्यानात घेण्यासारखे आहे.

**मंबाजी**

तुकोबांच्या जीवनचरित्रात मंबाजी बोवांची एक कथा बरीच चर्चिली गेली आहे या मंबाजींचा फारसा ठावठिकाणा कुणाला ठाऊक आहे असे दिसत नाही. ते देहूपुण्यामधल्या चिंचवड गावात राहत. पुढे म्हणे देहूतच राहू लागले. त्यांच्यावर बालंट यावे म्हणूनही अनेक कारस्थाने केली. हे बोवा भोळ्या भाबड्यांना आपल्या नादी लावून त्यांना बरेच लुबाडीत असत. तुकारामांमुळे मंबाजीच्या उद्योगाला मर्यादा पडल्या. त्यांनी तुकोबांचा, त्यांच्या परिवाराचा नाना प्रकारे छळ केला. एकदा तर त्यांना बरीच मारहाण केली. काहींच्या मते केवळ तुकोबांना छळायचे म्हणून बोवा चिंचवड सोडून देहूत येऊन राहिले. देहूच्या पीळशेटी या सावकाराने त्यांना आपली जमीन दान म्हणून दिली. मंबाजी गंडेदोरे मंत्रतंत्र करणारे होते. गुरूपदेश देत. इथपर्यंत कथा मिळतात. तुकोबांच्या आत्मपर अभंगातही त्या कथा डोकावतात. मंबाजी बोवांनीच रामेश्वर भटांकडे गाऱ्हाणे करून तुकोबांच्या अभंगांच्या वह्या बुडवायला लावल्या असे म्हणतात. भटांच्या क्रोधात देहूचे पाटीलही सामील झालेले. त्यांनीही तुकोबांचा यथेच्छ छळ केला. पुढे मंबाजीही निष्प्रभ झाले. रामेश्वर भटही नमले. त्यांना उपरती होऊन ते पुढे तुकोबांचे शिष्यच होऊन गेले. विशेष म्हणजे या साऱ्या लोकांच्या तऱ्हा तुकोबांच्या अभंगगाथेत तपशिलवार नोंदविण्यात आल्या आहेत. अशा प्रकारची आत्मपरता इतर संतकवींच्या काव्यात तुलनेने बरीच कमी आढळते.

**उपसंहार**

संतश्रेष्ठ तुकोबारायांचे धवल जीवनचरित्र, त्या काळातील एकूण परिस्थितीची आव्हाने, त्यांचे प्रत्यक्ष समकालीन आणि अप्रत्यक्ष संबंधित समकालीन पाहिले की, त्यांच्या कार्यकर्तृत्वाचा एक विशेष परिचय घडतो. साक्षात्कारी संत महात्मे किती एकाग्र चित्ताने साधना करतात,

त्यांची विरक्ती आणि समाजाच्या उद्धाराविषयींची उत्कट प्रीती ही किती सहजपणे प्रकट होते याचा प्रत्यय येतो.

आपल्या देशात दीर्घकाळापासून ज्ञानसाधकांची आचार्यपंडित परम्परा आहे. भक्तभागवतांची संत सत्पुरुष परम्पराही आहे. वस्तुतः या दोन परंपरेतील विभूतींनीच आपला इतिहास घडविला. आणि त्यात राजकारणापेक्षा संस्कृतिकारणाला / आध्यात्म विद्येला / जीवनशास्त्राला महत्त्व प्राप्त करून दिले.

संत तुकाराम महाराज हे या इतिहासाने आपल्या प्रदेशातील एक थोर शिल्पकार ठरतात.

**महत्त्वाची साधने**


१ ज. रा. आजगांवकर : 'संतश्रेष्ठ तुकाराम' १९३५

२ ल. वि. परळकर : 'तुकाराम चरित्र' १९४६

३ प्रा. गं. बा. सरदार : 'संत वाङ्मयाची सामाजिक फलश्रुती' पुणे (दु.आ) १९६२

४ डॉ. पुं. म. लाड (संपादक) : शासकीय तुकाराम गाथा / मुंबई, १९७५

५ डॉ. वसंत बोरगांवकर : 'प्राचीन मराठीतील चरित्र' पुणे १९७८

६ डॉ. शं दा. पेंडसे : ' साक्षात्कारी संत तुकाराम' - लेखन - पु॰, १९८२

७ श्री. बा. रं. सुंठणकर : 'मराठी संत वाङ्मयाचे ऐतिहासिक समालोचन' पुणे ( दु.आ.) १९९४

८ डॉ. सदानंद मोरे : 'श्री तुकारामदर्शन', साप्ताहिक सकाळ लेखमाला / १९९४-९५.



**डॉ. अशोक कामत**

'शिवश्री', २५८, सहजीवन सोसायटी,

पर्वती, पुणे ४११ ००९.


## 'आता तरी'

धर्मरक्षणाच्या नांवे, चालूच हिंसाचार,  
प्रबोधनाच्या नांवे, हा, चालूच स्वैराचार...  
आली काळास अवकळा, सारा बीभत्स प्रकार...  
मानव धर्म बुडविला, असा सर्रास आचार...  
कोणी पूजीना देवाला, पैसा पूजनीय झाला,  
नश्वर हाच पैसा, ईश्वर आज झाला...  
बंधुभावाचा आटला, मनामनातला झरा,  
दुभंगली घरे, मने, गेल्या समाजाला चिरा...  
मातापित्यांचा कसा इथे, पुत्रास होई भार?  
इथे प्रत्येक पोरका, नाही कोणास आधार...  
असा कसा विस्कटला, देवा तुझा रे संसार...  
हो आता तरी जागा, ... उघड पापण्यांचे दार...

**नन्दकुमार कृष्णाजी गांधी**

## अपंगाचे अध्यात्म

वृत्त - मंदारमाला (अश्वधाटी)

कोणी असो आंधळा पांगळा वा  
रुसावे न कोणी नसे ही सजा ।  
या हासऱ्या आंगणी ईश्वराच्या  
स्वये हासुनी हासवावे दुजा ॥१॥

टाळू शकेना कुणी संचिताची फळें  
सूख वा दुःख नावें जया ।  
सापेक्ष संज्ञेसी व्हावे उदासी  
पाहावें स्वये साक्षीरूपें तया ॥२॥

या वत्सला माऊलीनें तुम्हांला  
दिली अन्न वस्त्रें पुरी ओसरी ।  
कोणी नसो सर्व सूखी म्हणोनी  
असे ठेविले न्यून कांहीतरी ॥३॥

नाही दिला या तुरा पोपटाला  
न कोकिळ चित्रांगी केला असे ।  
ना आवडे या मयूरासी केका  
परी सर्व आनंद कंदी कसे ॥४॥

जे जे दिले गर्व त्याचा वाहावा  
उपेक्षुनि ते जे मिळेना तुला ।  
ऐसी दिली बोधवाणी नरेंद्रे  
'उठी जाग रे अमृताच्या मुला' ॥५॥

घ्यावे मुखी नाम ध्यावे मनी रूप  
यात्रापदी वाध वाजो करीं ।  
नानाविधा भक्ति सर्वेश्वराच्या  
तुला साधल्या त्या स्वभावे करी ॥६॥

कुणी शिकावे कुणी शीकवावे  
किती अज्ञ सेवा व्रते चालली ।  
रंगेल पंगू तया संगतीनें  
असे जोवरी ज्योत तेजाळली ॥७॥

हास्योपचारे मनाचा निरोगी  
फिरे वीसरें देहिची पंगुता ।  
सेवाव्रती सार्थ सानंद योगी  
जनी मेळवी मान्यता धन्यता ॥८॥

**कवि म.भ. सोमण**

# 'नामाचा गजर सोडू नये'

श्री. घं. प. भिशिकर

आपल्या महाराष्ट्रात असा कोणीही करंटा नसेल की तुकाराम महाराजांचा एखादा तरी अभंग ज्याला ठाऊक नाही. धार्मिक कीर्तनकार आणि प्रवचनकार तर तुकोबांच्या अभंगांवर कीर्तन - प्रवचने करतातच, पण मराठी लेखक, वक्ते, राजकारणी, समाजकारणी सारेच तुकारामांच्या वचनांचा प्रसंगानुसार वापर करतात. 'तुका म्हणे' या नाममुद्रेलाच गेल्या तीनशे वर्षात एक विलक्षण प्रामाण्य प्राप्त झाले आहे. हा अर्थातच तुकारामांच्या जीवनाचा प्रभाव आहे. एक ध्येय त्यांनी दृष्टीपुढे ठेवले आणि त्या ध्येयाच्या प्राप्तीसाठी जीवन झोकून दिले. ध्येयसिद्धीच्या आड येणारी प्रत्येक गोष्ट त्यांनी निर्धाराने बाजूस सारली.

*नारायणी जेणे घडे अंतराय । हो का बापमाय त्यजानी ते ॥*

हे त्यांचे वचन प्रसिद्धच आहे.

*आग लागो तया सुखा । जेणे विफल न ये मुक्ता ॥*

हे त्यांचे एखाद्या स्फोटासारखे भासणारे शद्ब कानी आले की अंग कसे शहारून येते.

**जीवनाचा केन्द्रबिंदू विठ्ठल** - काय ध्येय होते तुकाराम महाराजांचे? काय शिकण्यासाठी झोकून दिले त्यांनी आपले जीवन? त्यांना आपण 'संत' म्हणतो यातच त्यांचे ध्येय व त्यांची ध्येयसिद्धी यांना सर्वांनी दिलेली मान्यता सामावलेली आहे. तुमच्या आमच्या सामान्य जीवनाचा केन्द्रबिन्दू पैसा, प्रतिष्ठा, सत्ता असा काही ना काही असतो. त्या भोवती आपले जीवन फिरते. यापैकी कोणतीही गोष्ट शाश्वत सुख आणि समाधान देण्यास असमर्थ असल्याने अतृप्ती अखेरपर्यंत राहूनच जाते. 'पाहिजे'चा घोषा कधी संपतच नाही! तुकाराम महाराजांच्या जीवनाचा केन्द्रबिन्दू पंढरीचा 'विठ्ठल' हा होता. या विठ्ठलाशी एकरूप होणे आणि तरीही त्याची भक्ती करीत करीत विठ्ठलपण होऊन जाणे हे साऱ्या जीवनाचे एकमात्र आणि अंतिम उद्दिष्ट होते. यापुढे इतर कोणत्याही गोष्टीची मातब्बरी त्यांनी मानली नाही. पैसा नव्हता त्याची खंत नाही. गाढवावरून धिंड निघाली तरी मनाची शांतता कायम, कजाग पत्नीशी गाठ पडली तरी ती विठ्ठलाचीच कृपा, दुष्काळांत पोरे अन्नावाचून तडफडून मेली तरी चित्ताचे समाधान अभंग. सर्व कसोट्यांतून ते उत्तीर्ण झाले आणि संतपदवीचे अधिकारी बनले. तुकाराम महाराजांच्या जीवनचरित्रांत हा फार मोठा बोध सामावलेला आहे. ध्येय निश्चित करावे आणि त्या ध्येयसिद्धीसाठी जीवन झोकून द्यावे.

**सुळावरील पोळी** - ही वाटचाल सोपी नसते, हे प्रवाहाविरूद्ध पोहणे असते. सुळावरील पोळी असते. जबरदस्त निर्धार व निष्ठेचे बळ त्यासाठी आवश्यक असते. तुकाराम महाराजांचा एक अभंग जेव्हा मी प्रथमच वाचला तेव्हा त्यांच्या आवेगाने मी अक्षरशः स्तिमित होऊन गेलो. वाटले की त्यांचे संतत्व सार्थ आहे. या विलक्षण अभंगाची ओळख सर्वांना असावी. महाराज म्हणतात,

*साता दिवसांचा जरी झाला उपवासी । तरी कीर्तनासी टाकू नये॥*
*फुटो हे मस्तक तुटो हे शरीर । नामाचा गजर सोडू नये ॥*
*शरीराचे पोत दोन तेही भाग । परि कीर्तनाचा रंग सोडो नये ॥*
*तुका म्हणे ऐसा स्वामी ज्या निर्धार । तेथे निरंतर देव असे ॥*

आपला देह आपल्याला केवढा प्रिय असतो! देहाला आपण किती जपतो! जणु काही देहाचे सुख हेच आपले सर्वस्व असते. देह म्हणजेच मी असा आपला अज्ञानजन्य भाव असतो. यालाच संतांनी 'देहबुद्धी' असे म्हटले आहे, 'मी म्हणजे देह' असे ज्याला वाटते तो भगवंताशी एकरूप होऊच शकणार नाही. ज्ञानेश्वर महाराज तर म्हणतात की,

*म्हणौनि केवळ देहभरण । ते जाण उघडी नागवण ।*
*यालाशी एथ अंतःकरण । देयावे ना ॥* (अ. ३ - २०९)

जे केवळ देहसुखाच्या मागे लागतात ते सारे आयुष्य व्यर्थ घालवितात. तुकाराम महाराजांनी ती चूक केली नाही. त्यांच्या वरील अभंगावरून स्पष्ट दिसते की एका नामाच्या गजरापुढे त्यांनी शरीराला तुच्छ मानले आहे. उपवास घडोत, मस्तकाचे तुकडे होवोत, शरीर छिन्नविच्छिन्न होवो, – काय वाटेल ते झाले तरी नामाचा गजर सोडायचा नाही, हाच तुकोबांचा वज्रनिर्धार होता. आपला देहच नव्हे तर सर्वस्व त्यांनी एका विठ्ठलाच्या नामासाठी पणाला लावले होते. त्यांच्या शद्बाला जे प्रामाण्य लाभले ते त्यांच्या या अतिकठोर तपश्चर्येमुळे.

**शेवटचा दिस गोड व्हावा** - हे कसे घडते याच्या काही मार्गदर्शक खुणा त्यांच्या अभंगांतून विखुरलेल्या आहेत. ज्ञानेश्वर महाराज जणू काही ज्ञानी म्हणूनच जन्मले. सद्गुरूंनी वरदहस्त मस्तकावर ठेवला आणि ते ब्रह्मरूपच होऊन गेले. त्यांची साधकदशा कुठे जाणवत नाही. तुकाराम महाराजांच्या अभंगांतून मात्र त्यांची भगवतप्राप्तीची वाटचाल कशी झाली याचा मागोवा घेता येतो. पण इथे त्या विषयांत शिरावयाचे नाही. अभंगाद्वारे तुकोबांनी आत्मचरित्रच एकप्रकारे शद्बांकित करून ठेवले आहे. सामान्य जनांसाठी ते खूप उद्‌बोधकही ठरणारे आहे. महाराजांचा एक फार प्रसिद्ध अभंग आहे. स्मरणार्थ उद्धृत करतो.

*याचसाठी केला होता अट्टाहास । शेवटचा दिस गोड व्हावा ॥*
*आता निश्चिंतीने पावलो विश्रांती । खुंटलिया धावा तृष्णेचिया॥*
*कवतुक वाटे झालिया वेचाचे । नाव मंगळाचे तेणें गुणें ॥*
*तुका म्हणे मुक्ती परिणिली नोवरी । आता दिवस चारी खेळीमेळी॥*

यात ध्येयाचा, साधनाचा आणि ध्येयप्राप्तीच्या समाधानाचा असे सारेच उल्लेख आहेत. महाराजांना हवे काय होते? तर शेवटचा दिवस गोड होण्याची शाश्वती! शेवटचा दिवस म्हणजे हा नश्वर देह त्यागण्याचा दिवस. ज्याला आपण सर्वसाधारणपणे मृत्यू म्हणतो, तो मृत्यूचा दिवस. माणसाला सर्वात अधिक भीती वाटते ती मृत्यूची. हा देह जगून राहावा यासाठी माणूस सारखा धडपडत असतो. प्राणभयाने तो पापे करण्यासही तयार होतो. जगांत कोटयावधी लोकांनी पूर्वजांचा धर्म सोडून इस्लामचा स्वीकार केला. या धर्मांतराला मरणभय हेच प्रमुख कारण होते ना? भिंतीत चिणून मरणे ज्यांनी पत्करले पण परंपरागत धर्माचा त्याग ज्यांनी केला नाही, अशी गुरू तेगबहाद्दूरासारखी किंवा गुरू गोविन्दसिंगांच्या वीरपुत्रांसारखी माणसे फार थोडी. तुकाराम महाराज म्हणतात की मरणाचे भय मावळून तो दिवस आनंदाचा ठरावा यासाठी मी जन्मभर प्रयत्न केला. मरणाचा दिवस, देहत्यागाचा क्षण आनंदाचा वाटणे, त्याचे स्वागत करणे म्हणजे मरणभय जिंकणे होय. या शेवटच्या दिवशी अगदी शेवटच्या श्वासापर्यंत भगवंताचे अखंड स्मरण राहाणे व त्याचे नाम मुखांत असतानाच डोळे मिटणे ही परमभाग्याची गोष्ट. त्या क्षणी कोणतीही इच्छा, कोणतीही वासना, कोणतीही आसक्ती उरलेली नसते. मोठ्या समाधानाने चिरविश्रांतीसाठी जगन्मातेच्या कुशीत शिरायचे असते. हा शेवटचा दिवस सहजासहजी गोड होत नाही, त्याला जीवनभराची तयारी लागते.

**खरी विश्रांती** - या शेवटच्या विश्रांतीपूर्वीचे जे जीवन असते ना, तेही जर शांत, तृप्त व समाधानी असेल, तर जगच माणसाचे विश्रांतीस्थान बनून जाते. समर्थ रामदासस्वामी यांनी दासबोधाच्या पहिल्या दशकांत संत सज्जनांना वंदन करणारा एक समास (५ वा) लिहिला आहे. त्यांत ते संतासंबंधी म्हणतात,

*संत विश्रांतीची विश्रांती । संत तृप्तीची निजतृप्ती ।*
*नांतरी भक्तीची फळश्रुती । ते हे संत ॥*

काय सुरेख शब्दयोजना आहे! संत हे विश्रांतीची विश्रांती. म्हणजे प्रत्यक्ष विश्रांतीच जिथे विसावते ते स्थान. अशी संपूर्ण तणावरहित, समाधानी, सुखानुभूती देणारी अवस्था कशामुळे प्राप्त होते, याचे वर्म तुकाराम महाराजांनी आपल्याला सांगितले आहे. ते म्हणतात, विश्रांती लाभली याचे कारण तृष्णेचा धावाच खुंटला!

विश्रांती ही एक आंतरिक अवस्था असते. जसे मौन शारीरिक असते आणि आंतरिक असते. तोंडाने न बोलणे हे मौन समजले जाते, पण ते खरे नव्हे. तोंड बंद असेल आणि चित्त नाना संकल्प-विकल्पांनी अशांत असेल, तर त्याला मौन म्हणता येणार नाही. चित्तांत विचार, विकार, विकल्प यांचा एक छोटासा तरंग देखील न उठणे हे खरे मौन, फार अवघड असते असे मौन साधणे. विश्रांतीचेही तसेच असते. मन पूर्णपणे तणावरहित असणे, भयमुक्त असणे, प्रेमाने ओसंडून जाणे, प्रसन्नतेचा अनुभव प्राप्त होणे ही खरी विश्रांती. केवळ गाद्यागिरद्यांवर हातपाय ताणून आरामांत पहुडणे ही खऱ्या अर्थाने विश्रांती म्हणता येत नाही. तुकाराम महाराजांनी मिळविली ती आंतरिक तणावरहित, प्रसादयुक्त अवस्था. मग बाहेरची परिस्थिती कशीही असो.

**विषयांची तहान** - तृष्णेचा धावा खुंटला, हे विश्रांतीची अभंग अवस्था प्राप्त होण्याचे कारण म्हणून तुकाराम महाराजांनी सांगितले आहे. परंतु हे भलतेच अवघड काम. तृष्णा म्हणजे तहान. ज्याला तहान लागली आहे तो पाण्याच्या शोधासाठी धावतो. मृगजळामागे लागला तर तडफडून मरण्याचीच पाळी. पाण्यासारखे दिसते पण पाणी नसते ते मृगजळ. माणसाला तहान असते सुखांची. ती शमविण्यासाठी तो धावतो विषयांमागे. विषय म्हणजे संसारातील उपभोग्य वस्तु, कांचन, कामिनी, टीव्ही, फ्रीज, सुन्दर साजसामान, देहावर धारण करण्याचे अलंकार, नाटक, सिनेमा, चमचमीत खाद्यपदार्थ हे सारे विषयच. याच गोष्टींत आपण सुख शोधतो ना! पण अबाधित नियम असा आहे की यापैकी एकही गोष्ट टिकाऊ सुख देऊ शकत नाही. तात्पुरते मनाला बरे वाटते, पण मग आणखी काही तरी हवेसे वाटते. म्हणजे तृष्णा वाढतच जाते. ययातीने पुत्राचे तारुण्य मागून घेऊन खूप विषयोपभोग घेतले आणि अखेर सांगितले, "बाबारे, माझी तृप्ती झालीच नाही. उपभोगाची वखवख शमलीच नाही. माझ्या अनुभवाचे सार तुला सांगतो ते ऐक –

*न जातु कामः कामानां उपभोगेन शाम्यते ।*
*हविषा कृष्णवर्त्मेव भूय एवाऽभिवर्धते ॥*

"अग्नीत आहुती टाकल्यानंतर तो अधिकच प्रज्वलित होतो तसे या वासनांचे आहे." आणि ज्या देहाला सुख देण्यासाठी माणूस विषयांच्या मागे लागतो, तो देह तरी कुठे शाश्वत आहे? त्याच्यावर झडप घालण्यासाठी काळ टपूनच बसलेला असतो. म्हणून ज्याला विश्रांती हवी असेल, सुख हवे असेल, त्याने वासना आवरल्या पाहिजेत. लोकांना आनंदाचे रहस्य तुकाराम महाराजांनी वेगवेगळ्या शब्दांत परोपरीने सांगितले आहे. त्याचे सूत्र 'वासनाक्षय' हेच आहे. हाच उपदेश करणारा त्यांचा एक अभंग मननिय आहे. अभंग असा –

*न करी रे संग राहे रे निश्चळ । लागोनेदी मळ ममतेचा ॥*
*या नाव अद्वैत खरे ब्रह्मज्ञान । अनुभवावाचून बडबड ते ॥*
*इंद्रियांचा जय वासनेचा क्षय । संकल्पाहीन ये वरी मन ॥*
*तुका म्हणे नये जाणीव अंतरा । अंतरी या थारा आनंदाचा ॥*

अनासक्त, निर्मम, वासनामुक्त जीवन प्रभुस्मरणांत डुंबून जाते आणि अंतरी आनंदच आनंद भरून राहतो.

**इंद्रियांना वळण** - वासनांच्या मिठीतून सुटण्याचा एकच मार्ग तुकाराम महाराजांनी वारंवार सांगितला आहे. हृदय भगवंताविषयीच्या उत्कट प्रेमाने भरून टाकावयाचे आणि त्याचे नाम क्षणभरही विसंबावयाचे नाही. सर्व विकार आणि वासना नारायणरूप करून टाकावयाच्या. प्रत्येक इंद्रिय नारायणाच्या दिशेनेच वळवावयाचे. आपल्या इंद्रियांना तुकाराम महाराजांनी कशा प्रकारची शिकवण दिली ते पाहाण्यासारखे आहे. वाणी, डोळे, कान, मन आदी साऱ्या इंद्रियांना त्यांनी विठ्ठलांतच रमून जाण्यास सांगितले आहे.

*घेई घेई माझे वाचे । गोड नाम विठोबाचे ॥*
*डोळे तुम्ही घ्यारे सुख । पाहा विठोबाचे मुख ॥*
*तुम्ही आइकारे कान । माझ्या विठोबाचे गुण ॥*
*मना तेथे धाव घेई । राहे विठोबाचे पायी ॥*
*तुका म्हणे जीवा । नको सोडू या केशवा ॥*

अशी वाटचाल करीत तुकाराम महाराज ध्येयसिद्धीच्या मुक्कामापर्यंत येऊन पोचले. तृप्त झाले. सुखरूप झाले.

**ध्येयाचा ध्यास हवा** - याची साक्ष त्यांच्या अनेक अभंगांतून मिळते. *'याचसाठी केला होता अट्टाहास'* हा जो अभंग आहे त्यात ते म्हणतात की आता 'मुक्ती' शी माझे लग्न लागले आहे. एक परिपूर्ण अवस्था मला याच देही लाभली आहे. आता मिळवावयाचे काही राहिले नाही. कोणतीही कामना उरलेली नाही. जे काय आयुष्य परमेश्वराने दिले असेल ते मंगलाचा वर्षाव जगावर करीत आनंदाने घालवायचे आहे. कुरकुर नाही, तडफड नाही. हेच त्यांचे केवळ उपकारापुरते उरलेले धन्य जीवन. तुकाराम महाराजांच्या या जीवनदर्शनाने कोणाही माणसाची आत्मोद्धाराची आशा पल्लवित होऊ शकते. त्याची आत्मश्रद्धा जागृत होऊ शकते. अगदी सामान्य माणूसही ध्येयासाठी सर्वस्वाने उभा ठाकला तर नराचा नारायण कसा होऊ शकतो हे तुकाराम महाराजांच्या गाथेंत कोणीही पाहून घ्यावे. पण हे परिवर्तन जीवनांत घडून यावयाचे असेल तर त्याच्याप्रमाणे 'अट्टाहास' पाहिजे. प्रयत्नांचे सातत्य पाहिजे. ध्येयाचा ध्यास पाहिजे. ध्येयसिद्धीच्या आड येणारी प्रत्येक गोष्ट - मग ती एरवी कितीही प्रिय असो - बाजूस सारण्याचा कठोर निर्धार पाहिजे.

हा संदेश आपण ग्रहण करू या. तेच त्यांचे खरे पुण्यस्मरण.

**श्री. चं. प. भिशिकर**
११७/ १९ , गणेशवाडी,
पुणे ४११ ००४.



# "जावे संताचिया गावा"

**चित्रा जोशी**

भारतभूमी ही धर्मभूमी आहे. मोक्षभूमी आहे. ती एक तेजःपुंज भूमी आहे. पुण्यभूमी आहे.

"Its dust is pure than air, and its air is purer than purity itself. Its delightful plains resemble the gardens of Paradise. If it is Asserted that paradise is in India, be not surprised because Paradise is not comparable to it."

चौदाव्या शतकात प्रवासाला आलेल्या एका प्रवाशानं, अब्दुल्ला बरसाफनं भारताविषयी काढलेले हे उद्‌गार - 'भारत नंदनवनापेक्षाही श्रेष्ठ आहे' - कारण ती मोक्षभूमी आहे. या भूमीला मोक्षभूमी बनवणारे आहेत संत. आपल्याकडे दोन तऱ्हेचे अवतार मानले जातात. एक नैमित्तिक अवतार, भगवंताचा - उदा. श्रीराम, श्रीकृष्ण इत्यादी -

*पुत्रवत्सलता - मातुरगाधा - हरिणा - स्वयम् ।*
*अवतीर्योदरे सोढं गर्भदुःख पुनःपुनः ॥*

भगवंत अवतार घेतात - धर्मसंस्थापना करतात.

दुसरा अवतार नित्य अवतार - हे आहेत संत. उदा. नामदेव, तुकाराम इ.

तुकाराम महाराज म्हणतात -

"अवतार तुम्हां धराया कारण । उध्दरावे जन जडजीव ।
वाढावया सुख भक्तीभाव धर्म । कुळाचार नाम विठोबाचे
तुका म्हणे गुण चंदनाचे अंगी । तैसे तुम्ही जगी संतजन ॥- २२१९

त्रिविध तापांनी पोळलेला, कोऽहं म्हणून भटकत फिरणारा, मीच सर्व कांही, म्हणून अहंकारग्रस्त होऊन दुःख परंपरा ओढवून घेतो. त्यांना बाहेर काढणं संताचं कार्य. नैमित्तिक अवताराची - पृष्ठभूमी वातावरण निर्मिती हे त्यांचं जीवन ध्येय. सोपा सुटसुटीत मार्ग भगवंताचं नाव - तो संतांचा कुळाचार आहे. प्रत्येक कुळाची एक विशेषता असते.

जशी-

*रघुकुल रीती सदा चली आयी ।*
*प्राण जाई पर वचन न जाई ।*

तशी संत कुळाची विशेषता, अखंड भगवत चरणी रमणं - रमवणं. या नामाच्या आधारे ते जगामध्ये भक्तिभाव जागवतात - धर्म वाढवतात. सुखाची मात्रा वृध्दिंगत करतात. त्याकरता ते झिजतात - लोकांचं बरं वाईट सोसतात. रात्रंदिन त्यांना ध्यास असतो कसं वर उचलू या जीवांना? - *'तुका म्हणे तोचि संत । सोसी जगाचे आघात.'* २३०३

स्वतः कणाकणानं झिजायचं अन दुसऱ्यांच्या जीवनात सुगंध पसरायचा. चंदनाचा आणखी एक गुणधर्म आहे शीतलता देणं.

*'तापती चंदन निवविती कुडी । त्रिगुण तो काढी संतसंग'* २३३०

अंगाचा दाह शांत करणं ही किमया चंदनाचा लेप करतो. तसंच संतसहवास त्रिगुण दूर करतात. संत फार रोखठोक असतात. त्यांच्या ठिकाणी उधारीची भाषा नाही. संतसंगाचं फलित फार स्पष्ट जीवनाचं पोत बदलून टाकणारं. त्रिगुणातीत करणारं. जीवन म्हणजे सत्व, रज, तमोगुणांचा खेळ. कधी सत्वगुण डोकं वर काढतो - मनुष्याला शांती मिळते. रजोगुण वाढतो - जीवनात सगळीच खळबळ, अनिश्चितता येते. तमोगुण वाढला की जीव आळसावतो.द्वेष, मत्सर डोकं वर काढतात. संत या तिघांच्या जंजाळातून वर नेतात शुद्धसत्त्वगुणात. तो रोमरोमी मुरवतात. आनंदाचा कल्लोळ उठतो. तिथे विषयांना थारा नाही.

*संतांचे भोजन अमृताचे पान । करिती कीर्तन सर्वकाळ* २२९३

असा आनंदात काळ जातो.

चंदनी स्पर्श ज्यांच्या जीवनात आहे असे संत भारताचं वैभव आहे. त्यांची अखंड, अभंग परंपरा भारताचं अनुपम तेज आहे. स्वतः तुकाराम महाराज संतपुरुष होते. त्यांचा उल्लेख आजही आपण संत तुकाराम असाच करतो. संत दोनच अक्षरं पण प्रचंड ताकद. स्वतः तुकारामांनीच आपल्या अनेकविध अभंगातून संतांचं कार्य, संतांचा महिमा, संत कुणाला म्हणावं, संत सहवासाचे फळ, संत उपेक्षेचे दुष्परिणाम असे कितीतरी पदर सहज सोप्या शद्बातून आपल्यापुढे उलगडलेले आहेत.

**संत कृपावंत**

तुकारामांच्या जीवनातील संतांचं स्थान अत्यंत जवळिकेचे. आई मुलाचं असं लडिवाळ नातं. स्वतःला ते संतांचं अपत्य म्हणवतात. आपला भार त्यांच्यावर टाकतात - जीवन कसं निश्चींत होतं.

'अजि संतजन मायबाप' २२६६
'तुम्ही संतजनी - मायबापी' २२६१
'तुम्ही संत मायबाप कृपावंत?' २२१९

तुम्ही माझे आईवडील - जीवनाचे तारणहार, आकार देणारे - ते कृपावंत आहेत. त्यांनी कृपा केली की नराचा नारायण होतो. बुद्धिमान, श्रीमान, धनवंत लोकांची मोजदाद करणं कठीण पण कृपावंत मात्र विरळाच. अशा कृपावंतांनी तुकारामांना हाताशी धरलं नि प्रत्येक ठिकाणी 'तू का?' असं प्रश्नचिन्ह पडणाऱ्या जीवाला सर्वत्र राम (तुकारामाला दिलेलं एक नाव - तत्व एकच) दिसू लागला. "रिता नाही कोणी ठाव । सर्वांभूती वासुदेव ।" ३८२३. 'विषय तो त्यांचा झाला नारायण' अशी अवस्था. त्याची पावती देताना तुकाराम महाराज म्हणतात -

*'तुम्ही संत सारे कृपेचे सागर'* ... २३८२

*'तुका म्हणे हा तो संताचा प्रसाद । लाधले आनंद प्रेमसुख'* २३८०

*'तुमचे कृपेचे पोसणे । जन्मोजन्मी तुका म्हणे.'* २३८५

*'कृपादान केले संती । कल्पांती ही सरेना'* २३०४

संत कृपा ही अक्षय आहे. पैका, कापड फाटून जातं. परंतु संतकृपा - कल्पांतापर्यंत टिकते. त्यामुळे तुकारामांना 'संतकृपेचे पोसणे' म्हणवून घेताना धन्यता वाटते, भूषण वाटतं. त्यांच्या जीवनात जे आनंद, प्रेम लाभलं ते संतांमुळे. आनंद, सुख - मनुष्याची सारी धडपड याकरताच असते. जाणते नेणतेपणाने त्याची होणारी प्रत्येक क्रिया सुख - आनंदप्राप्ती करता असते. प्रत्येकाची आनंदाची कल्पना निराळी असते. कुणाचं सुख संगीतात असतं, कुणी त्याकरता हसत हसत राखेचे तोबरे सहन करतं, कुणी विठ्ठलाकरता वेडं होतं, कुणी धनाच्या मागे लागतं, अमुक झालं की आनंद, तमुक झालं की आनंद असं त्याच समीकरण असतं. त्या त्या वृत्ती आनंद मिळवून देतातही. आनंद होतो आणि ओसरतो. जवळ दागिने आहेत आणि चोर आला - आनंदाचं रूपांतर भयात होतं. आनंदप्राप्ति हे प्रत्येकाचं लक्ष्य असतं निःसंशय. परंतु सर्वश्रेष्ठ आनंद ब्रह्मानंद - हा संतांच्या कृपेनं प्राप्त होतो. संत सांगतात, 'अरे! मुळात तू आनंदरूपच आहेस. आणि म्हणून तुला आनंदाची ओढ आहे. पाणी उताराकडे धावतं, नदी सागराकडे. सजातीय वस्तूचीच आवड असते. मुळाकडे ओढ असते. त्यामुळे जीव आनंदाकडे धावतो.'

*"आनंदाचे डोही आनंद तरंग । आनंदचि अंग आनंदाचे ।"*

अशी वास्तविकता, पण जीव मायेत गुरफटतो अन स्वतःला दुःखी करतो.

**ममत्व दुःख देतं**

सर्वात दुःख देणारं काय असेल तर ते ममत्व. संस्कृतमध्ये सात विभक्ती आहेत. त्यातील 'संबधेषष्ठी' ही सगळ्यात क्लेशकारक. आपण रस्त्यानं जातो आहोत - एखादा अपघात होतो - एखादा ताशेरा झोडून निघतो, पण सत्त्वगुण जागा असेल, तर मदत करावी म्हणून जाऊन बघतो - अरे! हा तर माझा भाऊ - लगेच भाव पालटतात, चित्र बदलतं, दुःखाची मात्रा वाढते, क्रोध येतो. असं - कितीतरी.

मनुष्य जर या - करणे तृतीया, संप्रदाने चतुर्थी, अपादाने पंचमी, संबंधे षष्ठीपासून विभक्त होऊ शकला तर तो दुःखी होणार नाही. दुःख त्याच्या आनंदावर आवरण आणतं ते आणू शकणार नाही. मनुष्य विभक्तींपासून (विभक्ति - परमेश्वरापासून त्या आपल्याला वेगळं करतात म्हणून विभक्ति) वेगळा झाला की उरतं संबोधन - हे राम - विठ्ठल - तोच तो एकमेव उरतो. या आधारावर संत सांगतात 'जे म्हणून माझं ते सर्व दुःख देणार - हे त्यांचं जीवाच्या दुःख रोगाचं निदान. जीवनात आपण पदोपदी त्याचा अनुभव घेतो. (पण शहाणे होत नाही.)

**मायेविरहित केले**

संतांची भेट होताच जीव पलटी खातो. एरवी दुःखमय वाटणाऱ्या, जीवन संपवावं अशा टोकाच्या पुत्र - पत्नीच्या मृत्यूसारख्या घटना तो तटस्थपणे बघू शकतो. 'जायचं ते जाणार' - ही भूमिका तयार होते. त्याचं दर्शन आपल्याला तुकारामांच्या अभंगातून होतं -

*बाईल मेली मुक्त जाली । देवे माया सोडवली ।*

*पोर मेलें बरे झाले । देवे मायेविरहित केले ।*

भगवंताने पाशातून मोकळे केले - षष्ठी सुटली, माया निरसली. मा म्हणजे नाही, या म्हणजे जी - जे नाशिवंत आहे त्याला कवटाळत होतो. देवाने ते बंध काढून घेतले - नामसंकीर्तनाआड येणारी उपाधी संपली.

धन, पुत्र-पत्नी हे तर फार दूर राहिले. संत जर प्रथमतः काही करत असतील तर ज्याच्याशी हा गोतावळा निगडीत आहे किंवा ज्याच्या आधारे ममत्व स्थापित होतं तो देहभाव काढणे. ते स्वतः देहासक्ति दूर करून जगतात. तोच त्यांचा प्राण आहे. तेच संतउपाधीचं गमक आहे. 'संतत्वाच्या कसोट्या कठीण आहेत.'

*नव्हते ते संत करिता कवित्व । संताचे ते आप्त नव्हती संत ।*

*नव्हती ते संत धरिता भोपळा । करिता बावळा प्रावरणासी ।*

*नव्हती ते संत करिता कीर्तन । सांगता पुराणे नव्हती संत ।*

*तुका म्हणे नाही निरसला देह । तोवरी आघवे सांसारिक ।*

२३०६.

कवित्वशक्ति, कीर्तनकळा, पुराण सांगणं, संतांचे नातेवाईक - असणं यामुळे संतत्व प्राप्त होत नाही. ' देहभाव आहे तो सांसारिक'. कितीही सोंग आणलं तरी तो संत होणार नाही.

स्वदेहालाच 'मी' समजणं हीच जगातील एक अभूतपूर्व गोष्ट आहे. महाभारतातील यक्ष - धर्मराज संवाद प्रसिद्ध आहे. यक्षानं प्रश्न विचारला- जगातील मोठं आश्चर्य कोणतं?

मनुष्य रोज कुणाला तरी निवर्तताना पहातो, पण तरीही मी अमर आहे असं समजतो. धर्मराजानं उत्तर दिलं -

"स्वदेह म्हणजे मी, 'स्व' इतका संकुचित करण्यानं अहंकाराचं अन् त्यातून भ्रम - दुःखाचं आवर्तन सुरु होतं. संत देहभाव काढतात. जीवाची अवस्था मेंढराच्या कळपात वाढलेल्या सिंह छाव्यासारखी असते. आपलं पिल्लू मेंढराच्या कळपात? वनराज अस्वस्थ होतो. नदी किनारी त्याला दाखवतो, 'बघ - आयाळ, शेपटी, रंग ... तू माझ्यासारखाच आहेस. मग मेंढरू का समजतो स्वतःला? चल गर्जना कर माझ्यासारखी.' अन् आदल्या दिवशी वनराजाला घाबरणारा तो गर्जना करतो. अन् वनातील पान न् पान या नव्या दमदार गर्जनेनं थरथरतं. संत सिंहासारखं कार्य करतात. दशलक्षणं शिष्याला दाखवून सांगतात, ही माझ्यात आहेत. तुझ्यात दिसताहेत, होना? मग गर्जना कर - 'चिदानंद रूपः शिवोऽहं शिवोऽहं' त्या अद्वैततत्वाच्या ठायी ठायी अनुभव घे. खरं तर जीवाशिवात अंतरच नाही."

*'उदकावरील तरंग । तरंग उदकाचे अंग'* (३७६९) तरंग जेव्हा 'मी जल' हे विसरून स्वतःला 'तरंग' समजतो तो जीव. तरंग भाव - जीव भाव विसरताच, तो 'शिव.' तुकाराम सरळ सोप्या भाषेत सांगतात-

*तुका म्हणे बीजे बीज दाखविले*

*पत्र पुष्प आले गेले वाया' ।* (३७७०)

जीवन हा आत्मतत्वावर आलेला मोहोर आहे, पत्रपुष्पासारखा आहे. बीजाची ओळख पटताच मोहोर व्यर्थ होतो. पुढे ते सांगतात -

*माया तेचि ब्रह्म ब्रह्म तेचि माया ।*
*अंग आणि छाया जयापरी ॥* ३८६८

जीव - शिव म्हणजे बिंब प्रतिबिंब. संताजवळ गेलं की ते जीवभाव काढतात म्हणून तुकाराम महाराज म्हणतात -

**संतापासी यावा जीव**

'चिदानंद रूपोऽहं' या जाणिवेनं व्यवहार करावा, संतत्वाला प्राप्त व्हावं. ही वाट चोखाळत असताना मनुष्य विसरभोळा - भ्रमाची डुलकी - अहंकाराची झापड त्याला सारखीच येते. त्याची गाडी ट्रॅक (ज्तंबा) सोडून जाऊ नये म्हणून संत जागरूक असतात. कसे ?

काय सांगो आता संतांचे उपकार । मज निरंतर जागविती ॥
सहज बोलणे हित उपदेश । करूनि सायास शिकविती ॥
वत्स धेनुवेचे चित्ती । तैसे मज येती सांभाळीत ॥ २२०१

आईनं लेकराला सांभाळावं तसं ते लक्ष ठेवून असतात. बाबारे! जागा रहा - शिव - भावावर रहा. झोपलास की गेलास. शिष्यांकरता अनंत कष्ट सहन करतात. वास्तविक त्यांना या कशाची आवश्यकता नाही - पण

*अर्भकाचे साठी । पंते हाती धरिली पाटी॥*
*तैसे संत जगी । क्रिया करूनि दाविती अंगी ॥*२४२२

संत आचरणानं धडे देतात. त्यांचं जीवन ही अध्यात्माची पाठशाळा आहे. स्वतः तुकारामाचं जीवन बघू या - इंद्रायणीत गाथा बुडवल्याचा उद्वेग नाही. कुणी मोळी पाठवली तर माझी मुलं खातील असा भाव नाही - वाटून मोकळे झाले. त्यांचा 'मी' दीर्घ होता. विशाल होता.

(मुळात तो - दीर्घच आहे पण आपण ऱ्हस्व करतो.)

'मी' दीर्घ असणं ही सुखाची गुरूकिल्ली आहे. ती संतांनी दिली. वृत्ती शांत करतात ते संत.

*'तुका म्हणे मग नये वृत्तीवरी । सुखाचे शेजारी पहुडीन' ।* २२०६

संत वृत्ती ईश्वराकार करतात. सुखाचं सान्निध्य लाभतं - सुख साक्षी भावानं बघू शकतो. हेच संतांचं जगातलं आगळं वेगळेपण आहे. त्याच आधारावर राजानं पाठविलेला मानसन्मान ते नाकारू शकतात. अशा पद्धतीनं संत - शांत बनवतात. संत बनवतात.

*तुका जडला संतापायी । दुजेपणा ठाव नाही.*
*अग्निमाजी गेले । अग्नि होऊन तेच ठेले ।* २१८९

अग्नित गेलेली वस्तु अग्निरूप होते. तिच्यात व अग्नित वेगळेपण नाही. तसंच संतांच संत बनवणं.

**भूतांची दया हे भांडवल संता**

हा सारा खटाटोप ते करतात - आनंदाची एक पायरी खाली येऊन, कारण त्यांच अंतःकरण मऊ - मृदु आहे. परदुःखानं ते गलबलून जातात.

*जगाच्या कल्याणा संताच्या विभूति । देह कष्टविती ...*
*भूतांची दया हे भांडवल संता । आपुली ममता नाही देही ।*
*दया संता भांडवल । वेची बोल उपकारी।* २२००

२१व्या शतकाच्या उंबरठ्यावर, सगळं विश्व ही माझ्या कह्यातील व्यापारपेठ असावी याकरता प्रयत्नशील असलेले अनेक देश - लाखो लोक आहेत. त्याकरता ते अब्जावधी रुपये भांडवल गुंतवताहेत. अशावेळी हृदयात दया हेच भांडवल घेऊन जीवन जगणारी मंडळी, जीवन लोकांच्या कल्याणाकरता उधळून देणारे हे संत. ... त्यांची शृंखला - हे आमच्या देशाचं भांडवल. त्या आधारावर भारत विश्वगुरू आहे. त्यामुळेच तुकाराम महाराज कळवळून -

*संतसेवेसी अंग चोरी । दृष्टी नं पडो तयावरी ।* (२२८४)
*संतासी क्षोभवी कोण्याही प्रकारे।त्याचे बरे नव्हे उभयलोकी।* (२२८५)
*संताच्या धिक्कारे अमंगल जिणे । विश्वशत्रू तेजे सांडी परि।* (२२९०)

संतांचा धिक्कार करणं - विश्वशत्रुत्व पत्करण्यासारखं आहे. तेव्हा जपून असावं - हे बरं.

**शुद्धचर्या - संतांचे पूजन**

संत निरपेक्ष असतात त्यांना निंदून आपली जीभ विटाळते. त्यांचं पूजन करायला खर्चही नाही. देवतांच्या पूजनाला तरी - (षोडशोपचार) विशिष्ट फुलांची अपेक्षा असते - पण संतांचं -

*शुद्धचर्या हे संतांचे पूजन । लागतचि धन नाही ।* २३९२

संत आचरणातून, कृतीतून शिकवतात त्यामुळे त्यांना उत्तरही कृतीतूनच हवं असतं.

ज्ञानमय, प्रेममय, भक्तिमय जीवन असावं. प्रेम लुटावं, आनंद उधळावं असं - कारण -

*संताचिये गावी प्रेमाचा सुकाळ ।*
*नाही तळमळ दुःखलेश ॥* २२९३

अशा संत गावाला मनुष्यानं जायलाच हवं. जीवनाचं सार्थक करायलाच हवं.

**चित्रा जोशी**
देवी अहल्या मंदिर
धंतोली नागपूर ४४० ०१२.

सोनियाचें ताट क्षीरीने भरिले । भक्षावया दिले श्वानालागी ॥१॥
मुक्ताफळ हार खरासि घातला । कस्तुरी सूकराला चोजाविली ॥२॥
वेद्परायण बधिरा सांगे ज्ञान । तयाची ते खूण काय जाणे ॥३॥
तुका म्हणे ज्याचें तोचि एक जाणे । भक्तीचें महिमान साधु जाणे ॥४॥

●●●

# अहर्निश नामस्मरणानेच ईश्वरप्राप्ती होईल श्रीतुकोबारायांच्या बारा अभंगातील भक्तिशास्त्र

प्रा. डॉ. नरेंद्र कुटे

संतश्रेष्ठ श्रीतुकाराम महाराज यांचे 'बारा-अभंग' हे ईश्वरप्राप्तीचा परमार्थमार्ग विशद करणारे असून अहर्निश नामस्मरणानेच देवाची अनुभूती येईल, असे प्रतिपादन त्यांनी केले आहे. एकापरीने हे बारा अभंग म्हणजे श्रीतुकोबारायांचे भक्तिशास्त्रच होय. त्यातील अध्यात्मविचारांचा मागोवा विनम्रपणाने घेतला असून तो परमार्थप्रेमी मंडळींना आणि भक्तिमार्गी साधकांना मार्गदर्शक ठरेल.

श्रीतुकोबारायांची अभंगगाथा ही 'पांचवा वेद' मानली जाते; इतकी तिची अध्यात्मदृष्ट्या प्रतिष्ठा आहे. या अभंगातून त्यांनी लोकांना परमार्थमार्ग उघड करून सांगितला आहे. 'आधी केले, मग सांगितले' अशी त्यांची परमार्थप्रसाराच्या संदर्भातली भूमिका आहे. 'बीज वाढवावे नाम' हेच कार्य त्यांनी केले आहे.

*आम्ही वैकुंठवासी । आलो याचि कारणासाठी ।*
*अहो बोलिले जे ऋषि । साचभावे वर्ताया ॥*
*झाडू संतांचे मारग । आडरानी भरले जग ।*
*अहो उच्छिष्टाचा भाग । शेष उरला तो सेवू ॥*

असे म्हणत म्हणत ... शब्दज्ञानानेच नुसती पुराणे बोलतात, विषयाविकारांनीच परमार्थही बुडविला जातो... म्हणूनच 'पिटू भक्तीचा डांगोरा' ही कृतीची दिशाही ते स्पष्ट करतात आणि शेवटी हे भक्तिज्ञान सांगून 'जयजयकार आनंदे' ही भक्तिमार्गाची फलश्रुतीही ते विशद करतात. श्रीतुकोबांच्या सर्वच अभंगातून त्यांचे एक आध्यात्मिक चरित्रच उलगडत गेले आहे. अशाच प्रसिद्ध असलेल्या 'बारा अभंगातून' त्यांनी भक्तिशास्त्र विशद केले आहे. एका परीने हे 'बारा अभंग' म्हणजे एकूण 'चारकोटी एक लक्ष चौतिस सहस्त्र' अभंगातून जे विवरून सांगितले त्याचेच 'सूत्र - भाष्य - स्वरूप' होय, असेच म्हणता येईल. म्हणूनच या 'बारा अभंगा'तील भक्तिशास्त्रपर विचारांचा मागोवा इथे घेतला आहे.

**'बारा - अभंग' : पूर्वपीठिका...**

इंचगेरी संप्रदायाची एक भजनमालिका असून ती 'नित्यनेमावली' या नावाने प्रसिद्ध आहे. हा संप्रदाय निंबर्गीमहाराज तथा श्रीगुरुलिंगजंगम यांच्यामुळे रूढ झाला, म्हणून कुणी यालाच निंबर्गी संप्रदाय म्हणतात. त्यांचे शिष्य व पुढे सांप्रदायिक परंपरा चालविणारे आत्मज्ञानी श्रीभाऊसाहेबमहाराज उमदीकर यांचे भक्तिप्रसाराचे कार्य इंचगेरी येथे आणले, म्हणून कुणी याला इंचगेरी संप्रदाय म्हणतात. त्यांचे शिष्य व थोर तत्वज्ञ आणि संत डॉ.रा.द. रानडे तथा श्रीगुरुदेव रानडे यांच्या आध्यात्मिक कार्याचे केंद्र निंबाळ (जिल्हा : विजापूर) हे असल्याने अलिकडे त्यांचे साधक यालाच निंबाळ संप्रदाय असेही संबोधतात. पण या तीनही ठिकाणी हा जो 'नाम-संप्रदाय' सुरु आहे तिथे 'नित्यनेमावली'त असलेलेच भजन म्हटले जाते. या नित्यनेमावलीची रचना श्रीभाऊसाहेब महाराज यांच्या सांगण्यावरून श्रीगुरूदेव रानडे यांनी केली. (इ.स. १९११) या पुस्तिकेला त्यांची एक विवेचक प्रस्तावना लिहिली असून तीत आध्यात्मिक विचार 'सूत्र-भाष्य' स्वरूपात प्रकट झाला आहे. हल्ली या 'नित्यनेमावली'ची ११वी आवृत्ती श्रीगुरूदेव रानडे समाधी ट्रस्ट, निंबाळ यांनी प्रसिद्ध केली आहे. (सन १९८८ - पृष्ठे १९१ मूल्य : ९ रूपये) हे 'बारा अभंग', या संप्रदायात 'रात्रीचें भजन' मध्ये समाविष्टत करण्यात आलेले आहेत. हे अभंग गाथेत (सरकारी) नाहीत. या बारा अभंगांविषयी श्रीगुरूदेव रानडे यांनी नित्यनेमावलीच्या प्रस्तावनेत यथार्थ उल्लेख केला आहे. ते म्हणतात, "भजनात जे तुकारामाचे अभंग दिले आहेत ते निंबरगी महाराजांच्या वेळेपासून या संप्रदायात नित्य म्हणण्याची वहिवाट पडली आहे. हेच कोठे 'चवदा अभंग' या नांवाने प्रसिद्ध आहेत... *चारकोटी एक लक्षाच्या शेवटी । चवतीस सहस्त्र सांगितले ॥ सांगुनि इतुके तुका कथिता झाला । चवदा अभंगा सोडू नका ॥*... याचाच एक पाठ भजनात अभंग क्र. १४ मध्ये आहे. *(चार कोटी एक लक्षाचा शेवट । चौतिस सहस्त्र स्पष्ट सांगितले । सांगितले तुका कथोनिया गेला । बारा अभंगाला सोडू नका ॥)* हे बारा अभंग तुकारामांनी विदेह मुक्ती मिळविल्यानंतर त्यांची टाळ आणि गोधडी जी खाली पडली त्याबरोबर शेवटचा निरोप म्हणून पाठविले आहेत. *'टाळ आणि कंथा धाडिली निशाणी । घ्या रे ओळखोनि सज्जन हो ॥ माझे दंडवत तुम्हा सर्व लोकां।* देहासहित तुका वैकुंठासी ॥' (अभंग क्र. १२) हे अभंग तुकाराम महाराजांचेच आहेत अशी लोकांची खात्री व्हावी म्हणून 'टाळ आणि कंथा' निशाणी रूपाने त्यांजबरोबर पाठविण्यात आल्या. ही निशाणी पाठविण्यात आली, तथापि ते तुकाराम महाराजांचेच आहेत किंवा कसे याबद्दल मोठ्या लोकांत सुद्धा मतभेद आहेत... ह.भ.प. विष्णुबुवा जोग यांच्या सार्थगाथेत क्षेपकांतही हे अभंग दिलेले नाहीत. हे अभंग स्वतंत्ररूपाने मात्र उपलब्ध आहेत व पुष्कळसाधुसंतांच्या तोंडी असल्याने पुष्कळ प्रसिद्धी पावलेले आहेत. शिवाय तुकारामतात्या यांनी आठदहा हजार अभंगांची जी गाथा दोन भागात छापली आहे तीतही हे सापडतात. याखेरीज, हे अभंग तुकारामांचेच आहेत असे म्हणण्याबद्दल आणखी एक पुरावा आहे. त्या अभंगातील विलक्षण प्रेमळपणा व ओतप्रोत भरलेला स्वानुभव, यांचा विचार केला असता हे अभंग तुकाराम महाराजांच्या वाणीतूनच बाहेर पडले असावेत असे सबळ अनुमान होते." (आवृत्ती ११ वी/ पृष्ठे २४ ते २६)

**परमार्थाच्या पांच - पायऱ्या....**

श्रीगुरुदेवांनी हे 'बारा अभंग' आपल्या भजनात घेतले, याचे आणखीही एक कारण आहे. त्यांनीच प्रस्तावनेत म्हटल्याप्रमाणे 'आत्मज्ञान मिळविले आहे ते आहे तरी काय..'.याची कल्पना लोकांना यावी म्हणूनच हा भजनक्रम योजिला आहे. श्रीगुरुदेवांनी आपल्या ग्रंथातून, विशेषतः मराठी, कानडी, हिंदी संतांचा परमार्थमार्ग या पुस्तकातून परमार्थाच्या पांच पायऱ्या प्रतिपादिल्या आहेत. (१) ईश्वरप्राप्तीची तळमळ - देवाकडे वळण्यास निर्माण झालेले दुःख (२) गुरू भेट व गुरू बोध (मंत्रोपदेश) (३) सद्गुण - संपादन आणि दुर्गुण-त्याग या स्वरूपातील नैतिक आचरण (४) नामस्मरणात्मक - भक्तियोग (साधन) (५) साक्षात्कार. (देवाच्या रूपाचा अनुभव किंवा आत्मसाक्षात्कार.) या पांचही पायऱ्या बारा - अभंगातून प्रकट झाल्या आहेत. तसेच 'आत्मज्ञानाची प्राप्ती सद्गुरूस शरण गेल्यानेच अनुभवता येते' हेही त्यांनी प्रतिपादिले आहे. (प्रस्तावना, पृष्ठ १९) सर्वाधिक महत्वाची गोष्ट म्हणजे त्यांनी नामस्मरणावर दिलेला भर ही होय. कारण 'नामस्मरण हाच परमार्थ होय' असे भक्तिसूत्र त्यांनी प्रकट केले आहे. 'ईश्वराचे नाम घेतले असता रूप सहजीच प्रकट होणार आहे; अहर्निशी नाम घोकिले असता देवास भक्तापासून अन्यत्र जाताच येत नाही.' (प्रस्तावना, पृष्ठ २१) गुरु, संप्रदाय, नाम यापेक्षां वेगळा परमार्थ नाही, हे त्यांचे ठाम मत होते. 'भजन ऐकले असता, मार्ग कळून येतो' असे असल्याने त्यांनी जो भजनक्रम रचला, त्यांत परमार्थमार्ग स्पष्टपणे कळून यावा, याची दक्षता घेतली आहे. 'या संप्रदायाची मुख्य शिकवण कोणती' हे कळून यावे म्हणूनच त्यांनी भजनमालिकेला दीर्घ प्रस्तावना लिहिली आहे. या सर्व गोष्टींचा विचार करता श्रीतुकोबारायांच्या बारा अभंगातून यथार्थपणे भक्तिशास्त्र प्रकट होत असल्यानेच त्यांनी या अभंगांचा समावेश केला आहे. या अभंगातील 'भक्तिबोध' पाहावयाचा आहे. जन्माला जीव येतो आणि एकदिवस तो मृत्युपंथाला लागतो. ईश्वरप्राप्ती हेच जीवाचे ध्येय व्हावे. तरच जीव मनुष्यजन्माला आल्याचे सार्थक होईल. परमार्थाने हेच साध्य होते.

**गुरुशोध व गुरुबोध हवा....**

जिज्ञासूंनी हे बारा - अभंग मुळातून जरूर पहावेत. 'नित्यनेमावली'त (आवृत्ती ११ वी) हे बारा - अभंग पृष्ठ क्र. ५८ ते ६८ मध्ये आहेत. पुढे पृष्ठ क्र. ७१ वर मागणीपर - प्रार्थनापर अभंग आहेत. इथे मात्र फक्त त्यांतील 'भक्तिबोध'पर विचारांचा मागोवा घेतला आहे.

श्रीतुकोबारायांच्या या बारा - अभंगांना 'साखळीचे - अभंग' असेही म्हटले जाते. या अभंगांची रचनाही वैशिष्ट्यपूर्ण आहे. अभंगाचा चरण संपतो आणि दुसरा अभंग सुरू होताना त्यांतील कांही शद्ब पुन्हा येतात. उदा. *'खूण त्यांची जाणे जे जैसे असती । तुका म्हणे भ्रांती* ***दुजियाला'*** असा दहावा अभंग संपतो; आणि अकरावा अभंग सुरू होताना पुन्हा शद्ब येतात ते असे : ***'दुजियाला भ्रांती*** *भाविकाला शांती। साधूचि ती वृत्ती लीन झाली.'* कांहीवेळा तर एकाच अभंगातल्या दोन ओळीतील शद्ब पुढील ओळीत येतात. उदा.

*लीन झाली वृत्ती ब्रह्माते मिळाले । जळात आटले* ***लवण जैसे*** *॥*
***लवण जैसे*** *पुन्हा जळाचे बाहेरी । येत नाही खरे त्यातूनिया ॥*
*त्यासारखे तुम्ही जीणा साधुवृत्ती । पुन्हा न मिळती* ***मायाजाळ*** *॥*
***मायाजाळ*** *त्यांना पुन्हा रे बाधेना । सत्यसत्य जाणा तुका म्हणे ॥*
(११ वा अभंग)

बारा - अभंगातील **'पहिला अभंग'** हा 'भूमिका' सांगणारा आहे.

*जन्माचे ते मूळ पाहिले शोधून । दुःखासी कारण जन्म घ्यावा ॥*
*पापपुण्य करूनि जन्मा येतो प्राणी । नरदेहा येऊनी हानी केली॥*

या ओळींमध्ये जन्म हा दुःखाचे मूळ आहे. ते दुःख कमी व्हायचे असेल तर या जन्मामध्येंच देव शोधून.. त्याचे दर्शन करून घेऊन.. कृतार्थ व्हावे, अशी भूमिका ते सांगतात. जर तसे करून घेतले नाही तर जन्म (नरदेह) मिळूनही तो वाया घालविल्यासारखे होईल. नरदेह हा दुर्लभ आहे. तो पाप-पुण्य समसमान होऊन मिळतो. मग देवप्राप्ती करून घेण्याचा भक्तिमार्ग हा पुण्यमार्ग असल्याने या जन्मातही पुण्यमार्गच अनुसरला तर आपोआपच पापक्षय होईल. तम हा नरकच होय. तम म्हणजे आळस, निद्रा. त्यांतच आयुष्य घालविले तर केवळ दुःखभोगच पदरी येईल. ईश्वरप्राप्तीचा परमार्थमार्ग हा सुखाचे साधनही आहे आणि सुखपर्यवसायीही आहे. त्यामुळेच *'करावा परमार्थ अहर्निशी'* असा उपदेश श्रीतुकोबारायांनी केला आहे. परमार्थ ही क्षणिक घटना नव्हे, तर तो अखंडपणाने अनुसरण्याचा जीवनधर्म होय, ही त्यांतली मुख्यार्थाची गोष्ट होय. परमार्थ करायचा, देव मिळवायचा तर त्यासाठी 'पूर्वतयारी' करावी लागते. तिचा विचार श्रीतुकोबारायांनी **'अभंग दुसरा'** आणि **'तिसरा'** यामध्ये स्पष्ट केला आहे. सद्गुरूंची भेट व्हावी आणि त्यांचेकडून मंत्रोपदेश मिळावा, ही महत्त्वाची अट होय. त्यासाठीच आडमार्गी जाऊ नये. गैरमार्गाला जाऊ नये. परमार्थाच्या नांवे फसगत करणाऱ्यांच्या नादी लागू नये. आडमार्ग म्हणजे कुकल्पना होत. गैरमार्ग आणि गैरकल्पना हे दोन्हीही आडमार्गच असल्याने *'त्यांतून काढील तोचि ज्ञानी'* असा उपदेश श्रीतुकोबाराय करतात. हा ज्ञानी कोण? तो कसा? त्याविषयी लगेच त्यांनी स्पष्टीकरण केले आहे कीं, हा ज्ञानी म्हणजेच 'सद्गुरू' होय. तो उपदेशमंत्र देऊन शरणागतास (तारकमंत्र देऊन) तारतो. म्हणूनच गुरूंचा शोध घेऊनं त्यांना शरण गेले पाहिजे. त्यांचेकडून उपदेश (अनुग्रह) घेतला पाहिजे. त्याचे फळ कोणते? तर कुळोद्धार होतो, हे होय. कुळात सत्पुरुष होऊन गेला तरच ते कुळ उद्धरले, असेच म्हणावे लागेल. परमार्थात गुरु आणि संप्रदाय यांना फार फार महत्व आहे. गरुकुळ आणि संप्रदाय परंपरा ही भक्तिमार्गाला पोषक असते. देवदर्शन घेतलेला तोच खरा कुळोद्धारक होय.

**नामस्मरण आणि सत्संगती....**

गुरु आणि संप्रदाय याबरोबरच परमार्थात महत्वाची गोष्ट म्हणजे साधना ही होय. गुरुमंत्र नुस्ता घेण्याने परमार्थ होत नसतो. त्या मंत्राचे (नामाचे) स्मरण केले पाहिजे. स्मरणोपासना ही सर्वाधिक महत्वाची होय.

हे नामस्मरण (१) जप (२) स्मरण (३) नेम (४) ध्यान या स्वरूपात घडत असते. जप हा यांत्रिकपणे केला जातो. स्मरण हे आठवण ठेवून केले जाते. ठराविक वेळ राखून जे नामस्मरण केले जाते त्याला नेम म्हणतात. नेमात ईश्वराच्या स्वरूपाचे दर्शन (रूप, रंग, तेज, नाद, स्पर्श इ.) होताना जी तद्रूपता किंवा भावावस्था निर्माण होते, ती म्हणजे ध्यान होय. *'तिळभरी नाही चित्तासी तो मळ । तुका म्हणे जळ गंगेचे ते'* ॥ असे सांगून श्री तुकोबारायांनी नामस्मरणाशी सद्गुणसंवर्धनप्रक्रिया निगडित केली आहे. कारण नामस्मरण करताना अंतःशुद्धी - निर्मळ मन ही गोष्ट होणे अगत्याची आहे. **'चवथ्या'** अभंगात त्यांनी गंगेसारख्या निर्मळ मनाच्या माणसाजवळच देव उभा असतो, असे म्हटले आहे. मन जितके निर्मळ वा शुद्ध होईल, तितके देवाचे रूप अधिक दिसूं शकेल. हे रूप 'अंगुष्ठप्रमाण' दिसते, असे श्रीतुकोबा सांगतात. मुखाने नाम घ्यावे आणि डोळ्याने रूप पहावे असा हा भक्तिसाधनेचा भाग आहे. मुख व डोळा यांतले अंतर अंगुष्ठप्रमाणच आहे. देवाचे दिसणारे रूपही असे लहानच असते, असे संतांच्या अनुभवपर पदामधून पहावयास मिळते. ज्याचे जसे साधन (नामस्मरण) तसे त्याला देवाचे स्वरूप कळून येत असल्याने श्रीतुकोबारायांनी इथे एक सिद्धांतच सांगितला आहे तो असा की, *'जाणती हे खूण स्वात्मानुभवी । तुका म्हणे पदवी ज्याची त्याला'*॥ जे भक्तिमार्गी नाहीत, त्यांनाही हाच सिद्धांत लागू पडतो. ते ईश्वरसन्मुख वा परमार्थप्रवृत्त असे कधीच राहत नाहीत. ती त्यांची अवस्था त्यांना लखलाभ असो, असेही श्रीतुकोबांनी इथे सूचित केले आहे, असे म्हणता येईल.

भक्तिमार्गात नामस्मरणाबरोबरच सत्संगतीचा लाभ मिळणे फार फार महत्वाचे आहे. म्हणून श्रीतुकोबाराय **'पांचव्या'** अभंगात सांगतात की, *'करू नका कांही संतसंग धरा । पूर्वीचा तो दोरा उगवेल ॥ उगवेल प्रारब्ध संतसंगेकरूनी । प्रत्यक्ष पुराणी वर्णियेले ॥'* ईश्वराच्या नामगुणाचा जयघोष (नामस्मरणच) कराल तर दोष (विकार - वासना यांची आसक्ती) निघून जातील. **'सहाव्या'** अभंगातही नाम आणि सत्संग यांचा पुनरुच्चार करून 'पाय त्या देवाचे न सोडावे' असा आग्रहपर उपदेश त्यांनी केला आहे. पाय म्हणजे चरण. चरण म्हणजे आचरण. देवप्राप्तीचे परमार्थसाधन सोडू नये, असे त्यांचे सांगणे आहे. 'नकळे तो देव संतसंगावाचुनी' असे सांगून हा सत्संग म्हणजे नामस्मरण होय, हेही त्यांनी प्रतिपादिले आहे. त्यालाच पूरक - पोषक ठरणाऱ्या आणखी गोष्टी म्हणजे गुरुसहवास, समाधिस्थानात वास्तव्य, ग्रंथसहवास (पारायण), भजन, पोथी - वाचन, सप्ताह, भक्तमेळावे इत्यादि गोष्टी असून त्यांनाही सत्संगतीच म्हटले जाते. भक्तिमार्गात त्यांना उपाधी म्हटले जाते. नामस्मरण ही मूल्यभक्ती व इतर त्या सर्व उपाधी होत, असे श्रीगुरुदेव रानडे यांचे सद्गुरू श्रीभाऊसाहेब महाराज उमदीकर यांनी आपल्या पारमार्थिक पत्रात म्हटले आहे. **'सातव्या'** अभंगात श्रीतुकोबाराय म्हणतात की, *'ओळखा रे वस्तु सांडा रे कल्पना । नका आडराना जाऊ झणी ॥ झणी जाल कोठें बुडवाल हित । विचारी मनात आपुलीया ॥'* इथे वस्तु म्हणजे देव होय. देवाच्या खुणा (अनुभव - प्रचिती) यांना वस्तु हा शब्द संतवाङ्मयात येतो. देव पहा, अन्य शाब्दिक कल्पना, पांडित्याचे अवडंबर, इत्यादि गोष्टी व्यर्थ होत. अनुभवाशिवाय कुणी परमार्थ बोलत असेल तर त्याही आडरानी जाऊ नका, असे श्री तुकोबारायांनी सांगितले आहे. गुरु, संप्रदाय, साधना याशिवायच पारमार्थिक गप्पा मारणाऱ्यांची संख्या कमी नाही. शब्दज्ञानाचे बुडबुडे तर पुष्कळ निघू शकतात. तेच सारे आडरान आहे. आडमार्ग आणि आडरान हे दोन्ही शब्द श्रीतुकोबारायांनी मोठ्या विचारपूर्वकच योजिले आहेत. म्हणूनच गुरुबोध आणि नामसाधना यांचेशीच निगडीत खरा भक्तिमार्ग आहे. या सर्व अभंग विचारात आध्यात्मिक तत्त्वज्ञानाची सांखळी दिसते.

**भक्तीने वृत्तिपरिवर्तन!**

**'आठवा'** अभंग भक्तीने घडून यावयाच्या वृत्तिपरिवर्तनाविषयीचा आहे. साधक हा साधन करू लागला कीं, त्याच्या मूळवृत्ती (दोषस्वरूप) त्या कमी कमी होऊन त्याचे ठिकाणी सद्गुणांचा उदय झाला पाहिजे. हे परिवर्तन घडून येणे आवश्यक आहे. या अभंगात श्रीतुकोबाराय सांगतात (१) अहंकाराची शांती व्हावी (२) भूतदया निर्माण व्हावी. (३) वृत्तिपालट होणे हेच मुख्य साधन आहे. **'नवव्या'** अभंगात (४) ईश्वरीप्रेम निर्माण व्हावे. (५) साधू-सत्पुरूष-संत यांना शरण जावे. (६) कीर्तनसेवेत दंग व्हावे (७) भजन, पुराणश्रवण हेही सोडू नये. (८) सतत नामाविषयीचा ध्यास असावा. म्हणजे मग (९) सहजसमाधी-अवस्था निर्माण होऊ शकेल. इथे नाम आणि नीती याविषयीचा विचारही अनुस्यूत आहे. कारण नाम आणि नीती या दोन पाऊलबळानेच भक्तिमार्गाची वाट चालता येते. नीतीत सद्गुण समुच्चयाचा उत्कर्ष असतो. नामस्मरणानेच हा उत्कर्ष होतो. **'दहाव्या'** अभंगात वृत्तिपरिवर्तनाची फलदायी अवस्था सांगितली आहे. ते म्हणतात,

*गेली त्याची जाणा ब्रह्म तोचि झाला । अंतरी निवाला पूर्णपणे ॥*
*पूर्णपणे घाला राहतो कैशा रीती । त्याची आता स्थिती सांगतो मी ॥*
*सांगतो मी तुम्हा ऐका मनोगत । राहतो मूर्खवत जगामाजी ॥*
*जगात पिशाच्च अंतरी शहाणा । सदा ब्रह्मी जाणा निमग्न तो ॥*
*निमग्न तो सदा जैसा मकरंद । अंतर्बाह्य भेद वेगळाले ॥*

साधकाची ही स्थिती दुसरा आत्मज्ञानी साधकच जाणू शकेल. इतरांना मात्र भ्रांती राहून जाईल. कारण जे नामधारकच नाहीत, त्यांना ह्या पारमार्थिक स्थितीच्या निजखुणा कशा ओळखता येतील? **'अकराव्या'** अभंगात हीच परिवर्तनाची स्थिती श्रीतुकोबारायांनी विशद केली आहे. ते म्हणतात (१०) पारमार्थिक जो नाही तोच भ्रांतीत सापडलेला असतो. भाविकाच्या मनाला मात्र शांती लाभलेली असते. (११) वृत्ती लीन, विनम्र झालेली असते. (१२) पाण्यावर जसे लोणी येते, पण ते पुन्हा पाण्यात मिसळत नाही, तशी ही वृत्ती होते. ब्रह्मभावना निर्माण झाल्यानंतर हा साधक पुन्हा मायाजाळात गुंतत नाही; प्रापंचिक आसक्ती त्यांना बांधू शकत नाही. **'बारावा'** अभंग सर्वाधिक महत्त्वाचा होय. श्रीतुकोबाराय सांगतात, हे अभंग (भक्तिशास्त्र) स्वर्गातून

(देवलोकीतून) आणले आहेत. ते पृथ्वीवरच्या जीवांच्या उद्धारासाठी आणले आहेत.

*नित्यनेमे यासी पढता प्रतापे । जळतील पापे जन्मांतरीची ।*
*तया मागेपुढे रक्षी नारायण । मांडिल्या निर्वाण उडी घाली ।*
*बुद्धीचा पालट नासेल कुमती । होईल सद्‌भक्ती येणे पंथे ।।*
*सद्‌भक्ती झालीया सहज साक्षात्कार । होईल उद्धार पूर्वजांचा ।।*
*साधतील येणे इहपरलोक । सत्यसत्य भाक माझी तुम्हा ।।*
*परोपकारासाठी सांगितले देवा । प्रासादिक मेवा ग्रहण करा ।।*
*येणे भवव्यथा जाईल तुमची । सख्या विठ्ठलाची आण मज ।।*
*टाळ आणि कंथा घाडिली निशाणी । घ्या रे ओळखोनी सज्जनहो ।।*
*माझे दंडवत तुम्हा सर्व लोका । देहासहित तुका वैकुंठासी ।।*

यात नित्यनेमाने नामस्मरण करा, असे सांगण्यावर त्यांचा भर असून नामधारकाचा रक्षक केवळ देवच असतो, अशी ग्वाहीही त्यांनी दिली आहे. तोच साधकांचा आधार होय.

**परमार्थाची फलश्रुती...**

अभंग 'तेरावा, चवदावा, पंधरावा, सोळावा आणि सतरावा' यामध्यें त्यांनी परमार्थाची फलश्रुती, आपली एकूण अभंगसंख्या, तसेच भक्तीचे मुख्य वर्म सांगून शेवटी मागणी - प्रार्थना केली आहे. 'नाम घ्यावे व देवाचा अनुभव घ्यावा, पदोपदी नामस्मरण केल्यास विठ्ठलाचे श्रीमुख दिसेल, देवदर्शनाने प्रापंचिक चिंता संपून जाईल, जीव मुक्त होईल, संसारचक्र संपेल, ईश्वराविषयीच्या अस्तित्वाचा कोणताही किंतु मनात राहणार नाही. जीव पूर्णत्व पावेल;' ही फलश्रुती त्यांनी सांगितली आहे. आपली अभंगसंख्या *'चार कोटी एकलक्षाचा शेवट । चौतिस सहस्त्र स्पष्ट सांगितले'* तरीही

*सांगितले तुका कथोनिया गेला । बारा अभंगाला सोडू नका ।।*
*सोडू नका तुम्हा सांगितले वर्म । भवपाशी कर्मे चुकतील ।।*
*चुकती यातायाती विठोबाची आण । करा हे पठण जीवेभावे ।।*
*जीवेभावे करीता होईल दर्शन । प्रत्यक्ष सगुण तुका म्हणे ।।*

असा निर्वाळा ते देतात. *'चौतिस सहस्त्र लक्ष एक कोटी पाच । सांगोनिया साच गेला तुका'* अशीही संख्या ते सांगतात. (आतां, गाथेतील अभंगसंख्या पाहिली तर ती फक्त चारहजार एवढी आहे. बाकी अभंग उपलब्ध नाहीत.)

*जगी पाठ करिता आवडी सद्‌भावे । विपत्ती न होय त्या प्राण्यासी ।।*
*प्राण्याचे कल्याण होईल वा पाहे । भावे वाचिताहे नित्य नेमे ।।*
*नेमे संकष्टासी करी अकरा पाठ । विघ्न त्याचे स्पष्ट दूर होय ।।*
*दूर होय विघ्न विठ्ठल म्हणे तुकया । शेवटी निजठाया नेईन मी ।।*

अशा रीतीने भक्तिवर्म त्यांनी विशद केले आहे. नाम आणि नीती याद्वारे परमार्थपथ अनुसरणाऱ्याला ही आत्मिक शक्ती प्राप्त होते. देव कुणामुळे भेटेल? तर गुरूंमुळे होय! देव कुठे आहे? तर तो गुरूंजवळ आहे !! गुरुभजनामुळेच देव प्राप्त होतो !!! अशी ठोक उत्तरे त्यांनी दिली आहेत. ईश्वरप्राप्तीसाठी अहर्निश नामस्मरण करावे, गुरुमंत्र आणि संप्रदाय यांना विसरू नये, नीतियुक्त आचरण असावे ही 'भक्तिशास्त्राची - त्रिसूत्री' या बारा - अभंगातून प्रकटली आहे, असे म्हणता येईल. 'नित्यनेमावली'त अभंग बावीस, तेवीस, चोवीस हे मागणी - प्रार्थना स्वरूपाचे आहेत. त्यांत देवाची भक्ती करण्यात खंड पडतो, हाच अपराध घडत असून देवाने मजवर कृपा करावी, अपराधक्षमा करावी, असे मागणे ते मागतात. आपले बोल (अभंग) हे 'लेकराचे वेडेवाकुडे' आहेत हे देवाने समजावे, श्रीज्ञानेश्वरांच्या सारख्या संतांचा अधिकार मोठा आहे. *'तुका म्हणे ज्ञानेश्वरा । राखा पाया पै किंकरा'* अशी विनम्रपणाची भाषा ते बोलून दाखवितात. संताचे उच्छिष्ट (कृपाप्रसाद) प्राप्त व्हावे, अशी प्रार्थना ते करतात. कृतार्थतेने आपण 'निवांत' झालो, अशी ग्वाहीही त्यांनी दिली आहे. 'बीज वाढवावे नाम' या कार्याचाच एक भाग 'अहर्निशनामाने परमार्थ करा' अशी उपदेशवाणी उच्चारून त्यांनी पार पाडला आहे. श्री तुकोबाराय स्वतःला 'निरोप्ये' समजतात. त्यांचा हा निरोप जगत्‌हितार्थ, जीवोद्धारार्थ आहे, एवढे मात्र खरे!

**प्रा. डॉ. नरेंद्र कुंटे**
प्रज्ञा, ए / ७४, आसरा सोसायटी,
होटगी रस्ता, सोलापूर ४१३ ००३.

# तुकाराम आणि नामदेव

प्रा. पां. ना. कुलकर्णी

विठ्ठलभक्तीचे वाढत पिकत गेलेले रसमधुर फळ म्हणजे संत तुकाराम होत. त्यांच्या विकासामागे *'शुद्ध बीजा पोटीं फळें रसाळ गोमटीं'* (६२) या घरंदाज तत्त्वाचे जसे पाठबळ आहे त्याचप्रमाणे त्यांच्या पक्वतेमागे वारकरी संप्रदायाच्या तपस्वी संतसाहित्याची पुण्याई उभी आहे. तुकोबांच्या पूर्वजांची माहिती ज्ञानदेव, नामदेवांचे समकालीन विश्वंभरबुवा यांच्यापासून मिळते. या विश्वंभरबुवांच्या स्वप्नदृष्टांताप्रमाणे श्रीविठ्ठलदेव देहूस वास्तव्यासाठी आले. तेव्हापासून या घराण्यात पंढरीनाथाची भक्ति होती – 'आदि तो हा देव कुळपूज्य' (१३३३), भजनपूजनाची प्रीति होती - *'सहज वडिलां होती सेवा । म्हणोनि पूजितों या देवा'* (१३३४) आणि साधुत्वाची वसती होती – *'कुळींची हे कुळदेवी । केली ठावी संतांनीं'* (२५७३). म्हणूनच तुकाराम आपल्या वडिलांच्या मिरासीचा आणि वंशपरंपरेचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख करतात. (पंढरपूरप्रत ७, २८११).

प्रारंभी एक ते चार या संख्यावाचक शब्दांचा उपयोग करून लिहिलेल्या 'एके घाई खेळतां' (१९०) या अभंगात नामदेव, ज्ञानेश्वर, कबीर आणि एकनाथ यांचा तुकारामांनी निर्देश केला आहे. नामदेव, कबीर आणि एकनाथ यांना एकेक स्वतंत्र कडवे आहे. तर ज्ञानेश्वर, मुक्ताबाई, वटेश्वरचांगा आणि सोपान यांना एका कडव्यात गुंफले आहे. बेचाळीस दिवस उपवासी राहिलेल्या ब्राह्मणाला ज्ञानेश्वरांनी आळंदीहून देहूस तुकारामांकडे पाठविले. त्या निमित्ताने लिहिलेल्या एकतीस अभंगात तुकोबा कमालीचे भावव्याकुल दिसतात. ज्ञानदेवांविषयीचा असीम आदर येथे फुलून आला आहे. आठवण झाली की ते आळंदीस कसे धावून जात असतील ते दिसू लागते. ज्ञानदेवीची शुद्ध प्रत त्यांनी मिळविली होती असे महीपतीने सांगून ठेवले आहे. (मिळेल का हो ही ज्ञानेश्वरी कोठे?) एकनाथांच्या भागवताची तर त्यांनी अनेक पारायणे केली होती. विनोबाजी तुकारामांना 'नाथांचे मानसपुत्र' म्हणतात. "कवित्वस्फूर्ती तुकारामांना नामदेवांपासून झाली, पण विचारस्फूर्ती त्यांना नाथांपासून लाभलेली आहे. ज्ञानेश्वरीपेक्षा भागवत सोपे म्हणून आरंभी तुकारामानी भागवताचीचं अनेक पारायणे केली, ही गोष्ट जगजाहीर आहे" असेही त्यांनी पुढे म्हटले आहे. (एकनाथांची भजने, पान ३६) उपरिनिर्दिष्ट अभंगात तुकारामांनी नामदेवांविषयी म्हटले आहे –

> सिंपियाचा पोर एक खेळिया नामा । तेणें विठ्ठल बसवंत केला रे ।
> आपुल्या संवगडिया सिकवूनि घाई । तेणें सतंतर फड जागविला रे ।
> एक घाई खेळतां तो न चुकेचि कोठें । तया संत जन मानवले रे ॥२॥

नामदेवांनी विठ्ठलास बसवंत केले तसा विठ्ठलच तुकोबांचा बसवंत होता. नामदेवांचे जसे संवगडी होते तसे तुकारामांचे टाळकरी होते. 'एक घाई खेळतां' दोघेही कोठे चुकले नाहीत, कधी थकले नाहीत. दोघांनीही विठ्ठलभक्तीचा सुकाळ केला, पंढरीची कीर्ति वाढविली. केशवद्वारी उगवलेला नामा आतबाहेर न मावण्याइतका व्यापक झाला तर आकाशाएवढा तुका लोकांत सूर्याप्रमाणे क्रीडा करीत राहिला. तरीही *'नामा म्हणे आम्ही पायरीचे चिरे'* आणि *'तळिले पायेरीस तुका'* असे दोघेही म्हणाले आहेत.

वारकरी संतपरंपरेचा मराठी वारसा तुकारामांची शिष्या बहिणाबाई सांगते तो असा –

> *संतकृपा जाली । इमारत फळा आली ॥१॥*
> *ज्ञानदेवे घातला पाया । उभारिले देवालया ॥२॥*
> *नामा तयाचा किंकर । तेणे रचिले आवार ॥३॥*
> *जनार्दन येकनाथ । खांब दिल्हा भागवत ॥४॥*
> *तुका जालासे कळस । भजन करा सावकास ॥५॥*
> *बहेणि फडकति ध्वजा । निरोपण केले वोजा ॥६॥*

या नामावलीत कबीरांचे नाव नसणे स्वाभाविक आहे. ज्ञानेश्वर ते तुकाराम या मराठी संतांच्या कार्याचे स्वरूप बहिणाबाईने येथे स्पष्ट केले आहे. ही इमारत देवालयाची आहे. हे देवालय वारकरी संप्रदायाच्या 'साहित्या'तून उभे राहिले आहे. या साहित्याने या संप्रदायाला बांधून ठेवले आहे. ज्ञानेश्वरीच्या प्रारंभीचा गणेश हा जसा वाङ्मयगणेश आहे त्याप्रमाणे हे देवालय वाङ्मयमंदिर आहे. पाया, आवार (= तट), खांब आणि कळस यांनी युक्त असे एक विशाल आणि उद्धारक साहित्यमंदिर सावकाश भजन करण्यासाठी संतकृपेने सिद्ध झाले आहे. ज्ञानदेवांच्या साहित्याच्या भक्कम पायावर ही वास्तू उभी राहिली आणि दुरूनही दर्शनाचे समाधान देण्यासाठी आणि लांबवरच्या भक्तांना मंदिराची समीपता सांगण्यासाठी तुकोबांच्या अभंगवाणीला कळसाचे रूप प्राप्त झाले. *'राखा पायांपें किंकरा'* अशी आळी तुकोबांनी घेतली तरी त्यांची वाणी या मंदिराने शिरोधार्य केली.

साहित्यनिर्मितीच्या दृष्टीने तुकारामांची भूमिका नामदेव-कबीरांच्या जवळची आहे. ज्ञानेश्वर - नाथांची रचना प्रदीर्घ आणि टीकारूप अधिक. नामदेव - कबीरांची आणि तुकारामांची रचना मुख्यतः स्फुट. ज्ञानेश्वर - एकनाथांना संस्कृत-मराठी - वादाशी मुकाबला करावा लागला तर नामदेव - तुकारामांना जाति-व्यवस्थेतील उच्चनीचतेच्या समस्येला तोंड द्यावे लागले. ज्ञानेश्वर - नाथबाबांच्या ओव्यांनी पारायणांचे सप्ताह उभे केले, वारकऱ्यांच्या चिंतनाला अवकाश दिला. नामदेव - तुकारामांच्या

अभंगांनी कीर्तनांचे उत्साह थाटले आणि वारकऱ्यांना नाचाबागडायला लावले. या उभयविध साहित्याने शांतभक्तीची एक आनंदी दुनिया निर्मिली. *'मसि कागद छूयो नही, कलम गह्यो नही हाथ'* असे कबीरांप्रमाणे नामदेव-तुकाराम म्हणत नसले तरी ज्ञानदेव - एकनाथांप्रमाणे त्यांना सद्गुरुसहवास लाभला नाही की 'उपस्थिती' साधली नाही. साहजिकच नामदेव-तुकारामांचा भर ग्रंथांपेक्षा संतांवर, संस्कृतापेक्षा प्राकृतावर, टीकेपेक्षा निरीक्षणावर आणि विवेचनापेक्षा आविष्कारावर आहे. *'साक्षीविण बोलें । तरी मज पाहिजे दंडिलें'* (३४२६) असे तुकाराम सांगतात तर कबीरांनी म्हटले आहे, *'साखी आँखी ज्ञानकी.'* अंतिमतः हे सारेच आनंदयात्री आहेत. द्वैताद्वैताच्या, सगुणनिर्गुणाच्या टिपऱ्यांनी एकाच नादात खेळणारे - खेळविणारे महामानव आहेत. साहित्याच्या चर्चेसाठी काही विवेचन करायचे हे मात्र आपले काम! 'ज्ञानाचा एका' तसा 'नामाचा तुका'[१] म्हणता येण्यासारखे यांच्या साहित्याचे स्वरूप आहे म्हणून त्याचा तसा विचार करावयाचा, तुकाराम आणि नामदेव यांच्यातील भावबंधाची पाहणी करावयाची. ही पाहणी करिताना तुकारामांच्या वाङ्मयीन कर्तबगारील नामदेव - पांडुरंगांनी दिलेली प्रेरणा महत्त्वाची आहे हे प्रथम लक्षात येते. तुकोबा सांगतात (१३२०) –

*नामदेवें केलें स्वप्नामाजी जागें । सवें पांडुरंगे येऊनियां ।।१।।ध्रु।।*
*सांगितलें काम करावें कवित्व । वाउगें निमित्य बोलों नको।।*
*माप[२] टाकी सळ धरिली विठ्ठलें । थापटोनि केलें सावधान ।।२।।*
*प्रमाणाची संख्या सांगे शतकोटी । उरले शेवटीं लावी तुका ।।३।।*

नामदेवांनी तुकोबांना स्वप्नात जागे केले. त्यांच्या समवेत पांडुरंग होते. त्यांनी तुकारामांना दोन गोष्टी सांगितल्या :- (१) तुकोबांपाशी शब्दरत्नांचे धन[३] विपुल होते. कवित्वशक्तीचा झरा त्यांच्या ठायी मुळचाच होता. पण कदाचित अद्यापि सूर न गवसल्याने वाणीचा व्यय तुकोबा अन्य कार्यासाठी करीत असावेत. *'तुका वेडा अविचार । करी बडबड फार'* (२८६९) याचा अर्थ भक्तिपर पण काव्येतर बडबड असा असावा. आपल्या वैखरीस *'नको बडबडूं भांडे । कांहीं वाउगें तें रांडे'* (७४४) असे ते बजावतात. म्हणूनच देवानामदेवांनी 'कवित्व करावें' असे सांगितले. (२) नामदेवांनी शतकोटी अभंग लिहिण्याची प्रतिज्ञा केली होती पण त्यांच्याकडून (अधिक त्यांच्या परिवाराकडूनही) तेवढे लिहून झाले नव्हते. म्हणून उरलेले लिहून संख्या पुरी करावी असा आग्रह विठ्ठलाने धरला. आश्वासक रीतिने थापटून त्याने तुकोबारायांना सावध केले. म्हणजे आता वावगे काही न बोलता तुकारामांना कवित्वच बोलत राहायला हवे होते हे उघड होते. "उरले शेवटी लावी तुका हे शब्द पांडुरंगरायांनी उच्चारिले असावेत", असे बा. ग. परांजपे[४] यांच्या म्हणण्याप्रमाणे मानता येईल. मग कविनाममुद्रा येथे सूचित आहे किंवा हे सभंग श्लेषाचे उदाहरण आहे असे म्हणता येईल. शासकीय गाथेत[५] १३२० - १३२१ या अभंगांआधी 'नामदेव व पांडुरंग यांनी स्वप्रात येऊन स्वामींस आज्ञा केली की कवित्व करणे – ते अभंग ।।२।।' असा मथळा आहे. दुसऱ्या अभंगातील *'नामदेवापायीं' तुक्या स्वप्नीं भेटी । प्रसाद हा पोटीं राहिलासे।।'* या उद्गारावरून, विठ्ठलाने भेट दिली ती नामदेवांमुळे, असे नामदेवमहत्त्व तुकोबांना सांगावयाचे आहे हे स्पष्ट आहे. नामदेवांविषयीचे हे अगत्य *'जिवलगा माझिया नामदेवा'* (१५६८) या शब्दांत दिसते. विठ्ठलाची नामदेवप्रीति *'नाम्यासवें जेवी नव्हे संकोचित'* (२८२०) आणि *' फिरविलें देऊळ जगामाजी ख्याति । नामदेवा हातीं दुध प्याला'* (४३२१) या ठिकाणीं तुकोबांनी दाखविली आहे. कोणत्याही छापील गाथ्यांत नसलेला पण जयरामस्वामी वडगावकरांच्या मठात सापडलेला एक अभंग परांजप्यांनी[४] प्रस्तावनेच्या १०६ व्या पृष्ठावर छापलेला आहे तो असा –

*नामदेव आणि ज्ञानदेव । बहु चक्रपाणी आवडती ।।१।।*
*कलीयुगामाझारी भक्तीचा हारास । जाणोनी जगदीश अवतार घे।।*
*दामशेट शिंपी शुद्ध याचा भाव । पोटा आले देव आपणची ।।*
*नामदेवमुखें कीर्तनाचा गजर । करुनी श्रीधर जग उद्धरी ।।*
*संन्यास आश्रमीं विठ्ठल रूक्मीणी । पोटा आले ज्ञानी आपणची।।*
*जयाचा महिमा वर्णिता अगाध । रेडा बोले वेद ज्याचें वचन।।*
*गीतेवरी टीका करूनी ज्ञानदेव । उद्धरी जडजीव श्रवणमात्रें*
*अर्थ करोनीयां वाचिती अनुभवी । तया होय पदवी सायोज्याची।।*
*दोहींचा महिमा वर्णिला आवडी । भक्ती ज्ञान गुढी उभवीली ।।*
*तुका म्हणे मी त्या अनन्य शरण । जाईन वोवाळुन पायावरुनी।।*

भक्ती आणि ज्ञान यांची गुढी उभविणारे नामदेव, ज्ञानदेव, तुकोबांना विठ्ठलाचे अवतार वाटतात.

शासकीय नामदेवगाथेत 'श्रीनामदेवचरित्र' या विभागात (१३८२) आणि सकलसंतगाथेत 'अभंग वृत्तलक्षणाचे स्वप्न' या शीर्षकाखाली (१४०६) *'अभंगाची कळा नाहीं मी नेणत (? जाणत?) । त्वरा केली प्रीत केशिराजें।।*, हा अभंग छापलेला आहे. हा सारा अभंग अर्थदृष्ट्या स्पष्ट नाही[६]. मात्र शेवटचे कडवे असे –

नामा म्हणे मज स्वप्न दिलें हरी । प्रीतीनें खेचरीं आज्ञा केली ।।७।।

आपल्यास हरीने स्वप्नात अभंगाच्या रचनेची अक्षरसंख्या, चरणसंख्या आदी वैशिष्ट्ये सांगितली आणि गुरू विसोबा खेचर यांनी (स्वप्नातच) प्रेमाने रचनेची आज्ञा केली असे नामदेवांनी म्हटले आहे. नामदेवांच्या स्वप्नात हरी (= केशिराज) आणि गुरू खेचर आले तर तुकारामांच्या स्वप्नात पांडुरंग आणि नामदेव आले, हे साम्य लक्षणीय आहे. आपल्या आईशी बोलताना नामदेव म्हणाले (१२५४),

*मी गेलों दर्शना नागनाथा ।।१।। आंवढ्या देउळीं जाहला संचार।*
*पारुषला धीर या देहाचा ।।२।। तैंहूनि तुजमज तुटला संबंधु ।*
*विठ्ठलाचा छंदु घेतला जीवीं ।।३।।*

नामदेवांच्या भक्तियात्रेचा प्रारंभ असा झाला होता.

शतकोटी अभंग रचण्याची नामदेवांची प्रतिज्ञा चरित्रविभागाच्या शेवटी १३८० ते १३८३ या अभंगांत आली आहे. नामदेव सांगतात, "वाल्मीकाने शतकोटी ग्रंथ केला असे मी चंद्रभागेच्या काठी ऐकले.

आपण आपले आयुष्य व्यर्थ गमाविले असे वाटून मला क्लेश झाले. मंदिरात जाऊन मी विठ्ठलास विनंती केली. मी तुझा खरा भक्त असेन तर वाल्मीकाने रामायण केले तसा माझा पण सिद्धीस न्यावा. मी तुझे शतकोटी अभंग करीन. माझे म्हणणे ऐकून पांडुरंग म्हणाला,

'नामा, त्यावेळी आयुष्य दीर्घ होते, आता अवधी थोडा असतो. (तुझी प्रतिज्ञा पूर्ण होणे कसे शक्य आहे?)' देवाने अशी साशंकता व्यक्त करताच मी म्हणालो, 'हा पण पुरा झाला नाही तर तुझ्यापुढे जीभ उतरून ठेवीन' (१३८०). माझा निश्चय पाहून विठ्ठलाला दया उपजली. त्याने शारदेस सांगितले, 'नामदेवाच्या जिभेवर तू बैस'[७]. नामा माझे तान्हे लडिवाळ आहे. त्याला माझ्यावीण कोण आहे? माझ्यावर त्याचे खूप ऋण आहे. तू जिभेवर बसलीस एवढ्याने मी ऋणमुक्त होईन.' वह्या बाधून पांडुरंग लिहायला बसला[८] (१३८१). मी आता खवळलो आहे, तुला भीत नाही, मी लौकिकाची लाज सोडली आहे. आम्ही दीन शिंपी, यातिहीन. तुझ्याकडचे माझे ठेवणे (तू लिहून घेतलेले माझे अभंग) परत दे.

*साठ लक्ष संख्या चौऱ्यांसी कोटि । त्यांत मी कवडी सोडूं काय।।*
*आणिक याहून असेल वेगळें । घेईन तें बळें जाण आतां ।।*
*तुझें थोरपण ऐक हें देवा । दुर्बळाचा ठेवा अभिलाषी ।।*
*म्हणूनि पोरटा नामा खेचराचा । काया मनें वाचा सत्य करी ।।*

हा आशय लक्षात घेतला, तर नामदेवांच्या हिशेबाप्रमाणे चौऱ्यांसी कोटी, साठ लक्ष रचना त्यांनी केली होती. त्यांतील एक कवडीही ते देवाला सोडायला तयार नाहीत. लेखकू बनून विठ्ठलाने काही रचना दडवली आहे अशी शंका नामदेवांना आली की काय कोण जाणे! म्हणून "याहून वेगळे असेल ते बळाने घेईन, दुबळ्यांच्या ठेव्याची अभिलाषा तू धरू नकोस. खेचराचा हा व्रात्य नामा आपली प्रतिज्ञा कायावाचामनाने सत्य करील." नामदेवांची ही प्रतिज्ञा अपुरी राहिली अशी तुकारामांची समजूत होती म्हणून तर त्यांना 'उरले ते शेवटी' लावण्याची इच्छा मानावी लागली.

हे अभंग कोणी किती लिहिले यासंबंधी एकवाक्यता आढळत नाही. तशी ती न आढळणे हेही स्वाभाविक आहे. डॉ. अ. ना. देशपांडे यांच्या प्राचीन मराठी वाङ्मयाच्या इतिहासाच्या पाचव्या खंडात (पृ. १०६-७) आणि डॉ. रा. ग. हर्षे यांच्या 'तुकारामबोवा' या पुस्तकात (पृ. ४६) या संख्येसंबंधी काही उतारे दिलेले आहेत. तुकारामांच्या नंतर ही संख्या पूर्ण करण्याचा प्रयत्न तुका विप्रांनी केला[९] अशी माहिती मिळते. तुका विप्रांनी (यांचा काल सन १७२९ ते १७९२ असा) अभंगरचनेचा अहवाल दिला आहे तो असा –

*चौऱ्याण्णव कोटी साठ लक्ष । नामदेव पूर्ण ब्रह्म वदला की ।*
*पाच कोटी अडतीस लक्ष तुका । पंचाक्षत्र ऐका सहस्त्र की ।*
*सव्वा लक्ष बाकी तेथोनि राहिली । विठ्ठल माऊली सिद्धी नेत ।*
*तुका विप्र नामदेव - शतकोटी - । संकल्प सेवटी विठ्ठलाई ।।* (पृ.६)

आपण ही संख्या पुरी केल्याचे तुका विप्र वारंवार सांगतात. नामदेवांचा अवतार तुकाराम व तुकारामांचा अवतार तुका विप्र असेही ते म्हणतात. *'चौदावरी (नामदेव कुटुंबातील मंडळी) एका पंधरावा तुका (देहूकर) । सोळावा तो तुका विप्र नामा'* (पृ.७) असे एक कडवे तुका विप्रांनी लिहिले आहे. या सोळा व्यक्तींनी शतकोटी अभंगांची रचना केली असे त्यांचे म्हणणे आहे. महीपतीचा काल सन १७१५ ते १७९० असा आहे. त्याचा भक्तलीलामृत, शके १६९६ - जय संवत्सरी - फाल्गुन कृष्ण चतुर्थीस (२१ मार्च १७७५) पूर्ण झाला. शके १६९२ च्या पौष मासात (सन १७७० - ७१) शतकोटीची संख्या तुका विप्रांनी पूर्ण केली असे तुका विप्र सांगतात. महीपती व तुका विप्र समकालीन असूनही महीपतीला ही गोष्ट ज्ञात नाही. (या तुका विप्रांच्या संग्रहातील शके १२७२ची ज्ञानेश्वरीची प्रत आपल्यास मिळाल्याचे डॉ. हर्ष्यांनी म्हटले होते. संशोधकांनी ती प्रत शके १५७२ ची किंवा त्यानंतरची ठरवण्याचा प्रयत्न केला. ती फार जुनी नाही हे आता सर्वमान्य झाले आहे.)

नामदेव - तुकारामांच्या साहित्यसेवेशी असणारा तुका विप्रांचा हा संबंध त्यांनी स्वतःच सांगितला आहे. तो दुर्लक्षून चालणार नाही. त्याचा अधिक विचार व्हायला हवा.

काव्यप्रेरणेच्या दृष्टीने तुकाराम-नामदेवांचा संबंध आपण पाहिला. आता लेखाच्या उत्तरार्धात त्यांच्या साहित्यातील गुरुविषयक भूमिकेचा विचार करू या.

नामदेवांच्या हातून विठ्ठलाने दुग्धप्राशन केले ही कथा भक्तमंडळींच्या आवडीची आहे. नामदेवरायांच्या आयुष्याच्या नाटकात विठ्ठलाची भूमिका अतिशय महत्त्वाची आहे, हे त्यांचे काव्य वाचीत असता ध्यानात येते. *'नामदेव कीर्तन करी । पुढें नाचे पांडुरंग'* असे जनाबाई सांगते. नामदेव हे पंढरीरायाचे प्रेमभांडारी आहेत. त्या दोघांचे संवाद समोरासमोर चालू असतात. एक अद्भुत रस सर्वत्र भरून राहिला आहे. एका गूढ, रम्य, स्वप्नसदृश वातावरणात नामदेव गुंगत होते असे जाणवत राहते. आपल्या कुटुंबियांपेक्षा ते विठ्ठलाबरोबरच अधिक बोलले-चालले आहेत आणि विठ्ठलही अन्य कोणत्याही भक्तापेक्षा नामदेवांचेच कोडकौतुक जास्त करीत आहे असे स्पष्ट दिसते. प्रत्यक्ष परमेश्वर ज्याचा असा घडीघडीचा सांगाती त्याला आणखी गुरूची 'निशाणी' कशाला हवी होती? *'माझा गुरु तूं गुरुमंत्र तूं । सर्वस्व तूं माझें'* (१४३९) असे विठ्ठलाला म्हणणाऱ्या नामदेवांवर साऱ्या संतांनी एक गुरु[१०] लादला आहे, असे दिसते.

नामदेव पंढरीस संतमेळाव्यात आले आहेत. निवृत्तिनाथांनी त्यांचे चरण वंदिले. *'अंगें परब्रह्म मजपाशीं'* असा अभिमान उरी असल्याने नामदेवांनी प्रतिवंदन केले नाही. ज्ञानेश्वर उठले. त्यांनी वंदन केले. नामदेवांना वाटले, *'आम्हां वडिल अधिकारू । यासाठीं नमस्कारू योग्य आहे'*. सोपानांनी नमस्कार केला तरी नामदेव स्थिरच. मग मुक्ताबाईला संयम ठेवता आला नाही.

*अखंड जयाला देवाचा शेजार । कां रे अहंकार नाहीं गेला ।।१।।*
*मान अपमान वाढविसी हेवा । दिवस असतां दिवा हातीं घेसी ।।२।।*
*परब्रह्मासंगें नित्य तुझा खेळ । आंधळे पां डोळे कां बा जाले ।।३।।*

*कल्पतरुतळवटीं इच्छिली ते गोष्टी । अद्यापि नरोटी राहिली कां ॥४॥*
*घरीं कामधेनु ताक मागूं जाय । ऐसा द्वाड आहे जगामाजीं ॥५॥*
*म्हणे मुक्ताबाई जाई दरुषणा । आधीं अभिमाना दूर करा ॥६॥*

गुरुप्राप्तीने विनय बाणतो, अहंकार जातो असे मुक्ताबाईचे म्हणणे आहे. निवृत्ति, ज्ञानदेव, सोपानांप्रमाणे तिनेही निमूटपणे नमन करायला काय हरकत होती? त्या तिघांनी प्रारंभी नमन केल्याने नामदेवांची अहंता त्यांना कदाचित जाणवली नसेल. एक दोन तीन या क्रमाने तीन संतांनी वंदन करूनही नामदेव नरमले नाहीत हे मुक्ताईच्या लक्षात आले. लौकिक जीवनातील छोट्या बहिणीस आपल्या ज्येष्ठ भावंडांचा अवमान सहन होत नाही. येथे तर *'तिन्ही देव जैसे परब्रह्मीचे ठसे । जगीं सूर्य जैसे'* असे प्रणिपातासाठी पुढे झाले होते. त्यांचे ते तेज नामदेवांना या वेळी जाणवले नाही? जाणवायला हवे होते असे मुक्ताईला वाटले आहे. म्हणून ती मुक्तपणे बोलते, *'अंतरींचा कोरा गुरुविण.. गुरुविण संतपण आहे कोठें .. पंढरीचें भूषण सांगतो जनांसी । नाहीं या मनासी तीळ बोध ...'* मुक्ताबाईने अनेक दृष्टांत दिले आहेत. निवृत्तिदेवांना मुक्ताचे बोल आवडले नाहीत. ते म्हणाले, *"नामदेवासंगें देवाचा हो वोढा । प्रेमें केला वेडा पांडुरंग'*. त्यांना अरे तुरे करू नको. डोई टेकलीस तर बरे." मुक्ताई मग रागावून म्हणते, *'घाला लोटांगण । आपणां दर्शन न लगे त्याचें.'* पुन्हा म्हणाली, "हा रात्रंदिन हरीसी वर्दळ लावतो म्हणून हरीनेच तुमच्याकडे पाठविला आहे. तेव्हा तुम्ही संतांनी या विठोबाच्या लडिवाळाचा उद्धार करायला हवा. गोरोबांना बोलवा. मग 'भाजलें कीं कोरें । काकाचें उत्तर सत्य मानूं'." अनुभवाचे थापटणे घेऊन गोरोबा पुढे झाले. तपासावयाचे होते नामदेवांना. पण आपला अवमान केला असे नामदेवांना वाटू नये म्हणून त्यांनी निवृत्ती, ज्ञानदेव, सोपान, मुक्ता या क्रमाने डोकी तपासली. कोरेपणा आढळला नाही तेथे. मग नामदेवांची परीक्षा. ज्यांच्या अभंगांतून नामदेवांविषयी आदरभाव आढळतो त्या काकांनी *'कोरा राहिला गे बाई । सुन्नेभरि नाहीं भाजियेला'* असा निर्णय दिला. नामदेवांना वाटले, *'लांकडानें डोई फोडिली माझी'*. या 'कैकाडां' जवळून नामदेवांनी काढता पाय घेतला. *'हे संतमंडळी कपटी तुझी'* अशी विठ्ठलाकडे त्यांनी तक्रार केली.[१०अ]

*'श्री गुरुवांचुनी मुक्ति तुज नाहीं'* (१३४६) हे विठ्ठलाचे शब्द ऐकून नामदेव थरारले. कंठ सद्गदित होऊन त्यांनी भूमीवर लोळण घेतली, डोळ्यात आसवे तरारली आणि त्यांना मूर्च्छाही आली. *'जाई गुरुसी शरण'* असे देवाने पुन्हा सांगितले. नामदेवांनी नाइलाजाने विचारले, मग *'कवणा शरण जाऊं?'* देवाने विसोबा खेचरांचे नाव सांगितले.

चिंताग्रस्त नामदेव आवंढ्यास आले. येथे त्यांचे गुरू त्यांना कसे सापडले? अभंगप्रेरणा सांगताना नामदेवांनी स्वप्न हा शब्द (१३८२) स्पष्टपणे वापरला आहे, पण गुरुभेटीच्या प्रसंगाविषयी तसे काही म्हटलेले दिसत नाही. विसोबा निवांत 'निजेले' होते. मुद्दाम देवावर[११] पाय ठेवून ते निजले असतील असे वाटत नाही.[१२] नामयाचा भाव पाहण्यासाठी लिंगावर पाव देऊन खेचराने माव[१३] केली असेही म्हटलेले आहे (१३५२). *'डोळियांचे डोळे उघडिले जेणें । आनंदाचें लेणें लेवविलें ॥४॥ जन्ममरणांचे तोडिलें सांकडें । कैवल्य चि पुढें दावियेलें ॥५॥ कैवल्याचा गाभा विटेवरी उभा । दिसे दिव्य शोभा पांडुरंग ॥६॥'* (१३५०) म्हणजे याच वेळी विटेवरच्या उभ्या पांडुरंगाचे दर्शन त्यांना झाले आहे. पुन्हा *'बाराशीचे[१४] गांवीं जाहला उपदेश । देवाविण ओस स्थळ नाहीं ॥११॥'* असेही म्हटले गेले आहे (१३६९). एकाच वेळी औंढा, पंढरपूर, बार्शी या तीन गावांचा संबंध साधणे हे स्वप्नातच शक्य नाही काय? नामदेवांना गुरूपदेश स्वप्नात झाला असावा असे मला वाटते. म्हणूनच

*सद्गुरुनायकें पूर्ण कृपा केली । निजवस्तु दाविली माझी मज॥१॥*
*माझें सुख मज दावियेलें डोळां । दिधली प्रेमकळा ज्ञानमुद्रा ॥२॥*
*तया उतराई व्हावें कवण्या गुणें । जन्म नाहीं येणें ऐसें केलें ॥३॥*
*नामा म्हणे निकी दावियेली सोय । न विसरावे पाय विठोबाचे॥४॥*

(१३६८) अशी गुरुमहती गात नामदेवांनी वळण विठोबाकडेच दाखविले आहे. विसोबांनी नामदेवांच्या आवडीचे उपास्यच त्यांच्यापुढे ठेवले आहे. गुरूपदेशाची ही घटना नामदेवांच्या चिंतनानुभूतींतून अवतरलेली असून ती स्वप्नगर्भा आहे असे राहूनराहून वाटते. तुकारामांच्या गुरुप्राप्तीचा प्रकार असाच पण अधिक स्पष्ट आहे.

खरे तर तुकारामांना गुरुपरंपरेविषयी खास आस्था होती असे दिसत नाही. ढोंग-लबाडीचे समाजातील मनसोक्त थैमान पाहून तुकोबा उग्रावतार घेतात. *'गुरुशिष्यपण । हें तों अधम लक्षण'* (२७९७), *'गुरुमार्गामुळे भ्रष्ट सर्वकाळ'* (२९७३), *'जळो जळो तें गुरुपण । जळो जळो तें चेलेपण'*(४४२६). असे उद्गार ते अनेकदा (पहा २९९, २११३, ४११२) काढतात. दानाच्या आड आलेल्या गुरुचा डोळा फोडून बळीने शुक्राचार्यास आंधळे केले हा पौराणिक दाखला देऊन *'न मनावें तैसें गुरुचें वचन । जेणें नारायण अंतरे तें'* (१२०८) असे ते सांगतात. मनापासून गुरुस्तुती करावी असे त्यांना कधी वाटलेच नसावे. गुरुकृपेचे त्यांचे उल्लेख (२६६८, २८४६, ३१०५, ४३२०) फिकट वाटतात. गुरुपेक्षा देवावर त्यांची भिस्त अधिक आहे. सांसारिकांना गुरुदास्य जमत नाही, नामस्मरण मात्र विनासायास घडते असे ते (१२११) मोकळेपणाने सांगतात. शिष्याची सेवा न घेता त्याला देवासारखे मानणाऱ्या गुरूचा उपदेश फलद्रूप होतो हे सत्य सांगताना कोणी रागाला आले तर येवोत, त्याची त्यांना पर्वा नाही (१४३३). गुरुपदेशाची त्यांना गरज वाटत नाही. *'मेघवृष्टीनें करावा उपदेश । परि गुरुनें न करावा शिष्य'* (२२९०), *'उपदेसी तुका । मेघवृष्टीनें आइका'* (२४७५), *'नव्हे हें गुरुत्व मेघवृष्टि वाणी । ऐकावी कानीं संतजनीं'* (१५२५), *'मेघवृष्टि कांहीं न विचारी ठाव । जैसा ज्याचा भाव त्यासी फळे'* (३३१४) असे त्यांचे बोल ऐकले - वाचले की त्यांनी प्रत्यक्ष कोणास गुरूपदेश का केला नाही ते ध्यानात येते. बहिणाबाई आणि रामेश्वरभट यांच्याशी भेटीगाठी झाल्या होत्या. त्यांची श्रद्धानिष्ठा अनुभवासही आली होती तरी तुकोबांनी त्यांना प्रत्यक्ष अनुग्रह दिलेला नाही. निळोबाराय, कचेश्वर, महीपती हे तुकारामांचे स्वप्नशिष्य तर उत्तरकाळीनच आहेत. तुकारामांच्या उपदेशमेघाच्या

दृष्टीत अनेक भक्तचातक तृप्त झाले असतील. तुकोबांचे त्यांना एवढे आकर्षण वाटू लागले की त्यांचीच त्यांना स्वप्ने पडत राहिली. आध्यात्मिक क्षेत्रात स्वप्नांना सत्याइतकेच किंबहुना अधिकच महत्त्वाचे स्थान दिले जाते, असे म्हणतात.

बहिरा जातवेदाच्या 'भैरवी टीके'त चित्ररेखा उषेला सांगते (अ. ६२) - *'जागृति असिजे सावधान । त्याचाची उलथा वो स्वप्न । ऐसें उभयें आवस्था मन । नांदे विवेकें ।।५४।। ऐसा निढळ विवेक राहे । तैं स्वप्नचि साच होये ।'*. हे लौकिक जीवनाविषयीचे बोलणे झाले. 'योगविद्या' या पुस्तकात प्रा. श्री. शं. खानवेलकर लिहितात, 'जे मंत्र स्वप्नात प्राप्त झालेले असतात, त्यांना स्वप्न-मंत्र म्हणतात. अशा मंत्रांना सिद्धिसंजीवनादिकांची आवश्यकता तर नाहीच, पण हे महासिद्धी देणारे असतात. आपल्या साधनमार्गात साधक जसजसा उन्नत होत जातो, तसतशी त्याची स्वप्नभूमी शुद्ध होत जाते, आणि विश्वातील सूक्ष्म शक्ती त्याला साहाय्य करतात. अशा वेळी त्याच्या स्वप्नभूमीवर त्याला विविध प्रकारची दृश्ये दिसतात ...' (पृ. ३२६). 'तुकाराम महाराजांची *गुरुपरंपरा' या पुस्तकात (पृ. २२१) वा. सी. बेंद्रे म्हणतात, 'स्वप्न' हा* शब्द तुरीयेतील किंवा समाधीतील आठवणीला तुकारामकाली उपयोजीत असत असे स्पष्ट दिसते. सामान्य निद्रेतील स्वप्न, निद्रेतून जागृतावस्थेत येण्याच्या म्हणजे निद्रेच्या उत्तरकालातील असते, तर योगनिद्रेतील स्वप्न जागृतीतून तुरीयेत किंवा समाधीत होणाऱ्या अवस्थांतरातील म्हणजे तुरीयेच्या किंवा समाधीच्या पूर्वकालातील असते.' जाणत्यांनी अधिक विचार करावा.

शासन - गायेत 'स्वामीस सद्गुरूची कृपा जाली - अभंग ४' या शीर्षकाखाली तुकोबांचे चार[९५] अभंग (३६८ - ३७१) आहेत, त्यांतील पहिला -

सद्गुरुरायें कृपा मज केली । परी नाहीं घडली सेवा कांहीं ।।१।।।धृ।।
सांपडविलें वाटे जाता गंगास्नाना । मस्तकीं तो जाणा ठेविला कर ।।धृ।।
भोजना मागती तूप पावशेर । पडिला विसर स्वप्नामाजी ।।२।।
कांहीं कळे उपजला अंतराय । म्हणोनियां काय त्वरा जाली ।।३।।
राघवचैतन्य केशवचैतन्य । सांगितली खूण माळिकेची ।।४।।
बाबाजी[९६] आपलें सांगितलें नाम । मंत्र दिला राम कृष्ण हरि ।।५।।
माघ शुद्ध दशमी पाहुनि गुरुवार । केला अंगीकार तुका म्हणे।।६।।

पुढे तुकाराम म्हणतात, 'माझ्या मनीचा भाव जाणून गुरुराजाने उपाव केला. माझ्या आवडीचा सोपा मंत्र सांगितला. त्यामुळे कोठे काही गुंपा (अडचण) निर्माण झाला नाही.' पण या विभागातील शेवटचे दोन अभंग तर कमालीची विठ्ठलभक्ती दर्शविणारे आहेत. गुरुकृपेचा वृत्तांत सांगता सांगता तुकोबा मूळ स्वभावाप्रमाणे गुरुला सोडून केशवाकडे - विठ्ठलाकडे वळले आहेत. कारण *'सहज वडिलां होती सेवा । म्हणोनि पूजितों या देवा'* (१३३४). त्यामुळे गुरू, संत, पांडुरंग यांना एकमेकात गुंतवून आपला लाभ करून घेण्याची चतुराई तुकोबा दाखवितात. शिवाय येथेही त्यांच्या गुरुने [किंवा गुरुरुप धरलेल्या विठ्ठलाने – *माझ्या विठोबाचा कैसा प्रेमभाव । आपणचि देव होय गुरु'* (८७३)] स्वतःला 'सांपडविलें' आहे. संतांनी तगादा लावल्यामुळे नामदेव गुरुकडे गेले तर येथे गुरुनेच तुकारामांपुढे अवतीर्ण होऊन त्यांच्या मस्तकी हात ठेवला येथे शिष्यापेक्षा गुरुचीच उतावळी जाणवते. गुरुनेच गुरुत्व लादले. पण विसोबा आणि बाबाजी हे दोन्ही गुरु असे आहेत की ते शिष्याची आवडनिवड व योग्यता पाहून उपदेश व उपास्य सांगतात. उपदेश करायला हवा, तशी पद्धती आहे म्हणूनच त्यांनी स्वतःकडे गुरुत्व घेतले आहे असे दिसते.

तुकोबांच्या गुरुत्रयीचा संबंध बंगाली चैतन्य परंपरेशी जोडण्याचा प्रयत्न झाला आहे. त्याप्रमाणेच ही त्रयी नागनाथपरंपरेतील असल्याचे 'नागेशलीलामृत' या ग्रंथात म्हटले आहे. तथापि शासकीय गायेच्या प्रारंभी *श्रीनिवृत्तिनाथाय नमः ।।श्री ज्ञानेश्वराय नमः ।।*

*श्रीराघवचैतन्य श्रीकेशवचैतन्य –।। श्री बाबा चैतन्य सद्गुरूभ्यो नमः ।।"* असे जे नमन आहे त्यावरून बाबाजी चैतन्य विसोबा खेचरांप्रमाणे ज्ञानेश्वरपरंपरेतील आहेत असे वाटते. नामदेव आणि *तुकाराम यांच्या गुरुपदेशाच्या घटनेचे स्वरूप पाहाता दोघांनाही* अनुग्रह स्वप्नात झाला आहे असे म्हणायला हवे असे मला वाटते.

नामदेवांनी तत्कालीन समजुतीप्रमाणे त्यांच्याहून कनिष्ठ मानल्या जाणाऱ्या स्त्रीपुरुषांना अनुग्रह देऊन धन्य व धीट केले. दासी जनाबाईसह नामदेवांच्या घरच्या स्त्रिया अभंग रचू लागल्या. चोखोबांच्या परिवारातील स्त्रीपुरुष भक्तिपर गीते गाऊ लागले. मंगळवेढ्याच्या कुसूखाली चिरडलेली चोखोबांची हाडे गोळा करून त्यांवर नामदेवांनी महाद्वारी समाधी बांधली. चोखोबांना अनुग्रह तर आधीच दिला होता. तथाकथित कनिष्ठांना जवळ करण्याची नामदेवांची ही कृती निश्चितपणे क्रांतिकारक आहे.

*'तुका कुणबियाचा नेणे शास्त्रमत'* (४३१२), *'घोकाया अक्षर । मज नाहीं अधिकार'* (२७६६), *'नये माझा तुम्हां होऊ शद्वस्पर्श । विप्रवृंदा तुम्हां ब्राह्मणांसी'* (३८५८) असे म्हणणाऱ्या तुकारामांना त्यांच्या ब्राह्मण शिष्यांनी सद्गुरू म्हटले आणि त्यांना 'जगद्गुरु' मानले ही गोष्ट लोकविलक्षण नाही काय? या ब्राह्मणशिष्यांना कोणी सक्ती केली नव्हती, तरीही त्यांनी वर्णश्रेष्ठत्वाची कल्पना झुगारून दिली. आपणहून त्यांनी तुकारामांचे शिष्यत्व स्वीकारले, तेही स्वप्नद्वारा! एवढी जबरदस्त मोहिनी तुकोबांच्या उत्तीकृतींनी निर्माण केली होती. 'गुण अवगुण हे दोन्ही प्रमाण । यातीशीं कारण नाहीं देवा' (१२३), *'वर्णाभिमान विसरली याति । एकएकां लोटांगणीं जाती'* (१८९) असा विचार आणि आचार मान्य होऊ लागला. वारकरी संप्रदायाने मनी धरलेल्या समभावाची उंची साधली गेली. तथाकथित वरिष्ठांना जवळ आणण्याची तुकारामांची ही कृती निश्चितपणे क्रांतिकारक आहे.

नामदेव आणि तुकाराम यांचे कार्य सामाजिक दृष्टीनेही असे क्रांतिसाधक आहे.

**या लेखातील टीपा पुढील पानावर पाहाव्या.**

टिपा :-

(१) अ) *'ज्ञानेश्वरें मज केला उपकार । स्वप्नीं सविस्तर सांगितलें ॥३॥*
*तुका सर्वा श्रेष्ठ प्रिय आम्हा थोर । कां जे अवतार नामयाचा ॥४॥*
- रामेश्वर.

आ) *'जगद्गुरू तुका अवतार नामयाचा'* – निळोबाराय.

इ) पांगारकरकृत तुकारामचरित्र, पृ. ५९, दासकृत अभंग.

ई) महीपतीकृत भक्तलीलामृत, अध्याय २६.

(२) 'स्वप्न' शब्द न वापरता हाच आशय तुकारामांनी पुढीलप्रमाणे मांडला आहे –

*करितों कवित्व म्हणाल हें कोणी । नव्हे माझी वाणी पदरींची ॥१॥॥ध्रु॥*
*माझिये युक्तीचा नव्हे हा प्रकार । मज विश्वंभर बोलवितो॥*
*काय मी पामर जाणे अर्थभेद । वदवी गोविंद तेंचि वदें ॥२॥*
*निमित्त मापासी बैसविलें आहें । मी तों कांहीं नव्हे स्वामिसत्ता॥३॥*
*तुका म्हणे आहें पाईक चि खरा । वागवितों मुद्रा नामाची हे ॥४॥*
(१००७).

'नामाची' हा शब्द येथे श्लिष्ट वाटतो. 'मज बोलवितो देव' असे ते वारंवार म्हणतात.

(३) *'शब्दांचीं रत्नें करूनी अलंकार । तेणें विश्वंभर पूजियेला'* (५०४),

*आम्हां घरीं धन शब्दाचींच रत्नें,* (३३९६).

(४) श्री. तुकोबारायांचे अभंग, पृ. ४७.

(५) श्री तुकारामबावांच्या अभंगांची गाथा, सं. पु. मं. लाड, सन १९५५. माझ्या प्रस्तुत लेखात संदर्भ देताना नमूद केलेले अभंगांक याच गाथेतील आहेत. नामदेवांच्या अभंगांचे संदर्भ शासनगाथेतील आहेत.

(६) (अ) शासकीय गाथेच्या प्रास्ताविकात (पृ. २४) या अभंगापूर्वी 'नामदेवांनी आपल्या कवित्वासाठी षड्क्षर चरणात्मक निवृत् गायत्री अभंग छंद बराचसा वापरला असून या छंदाचे लक्षणही पुढीलप्रमाणे सांगितलेले आहे –' असा मजकूर आहे.

(आ) शासकीय गाथेत (२०२८) 'उपदेश' या विभागात आणि सकलसंतगाथेत (२०८५) 'समाधियोगनिषेध' या मथळ्याखालील गटात आरंभी *'मुख्य मातृकांची संख्या । सोळा अक्षरें नेटक्या'* असा एक अभंग आहे. येथेही अभंगविशेष सांगितले आहेत असे वाटते. याचा छंदोदृष्ट्या विचार कोणी केला असल्यास तो आज माझ्यापुढे नाही.

(इ) *'प्रेमपिसें भरलें अंगीं'* (१४९१) या अभंगात नामदेव

*कोणे वेळे काय गाणें । हें तो भगवंता मी नेणें ॥२॥*
*वारा धावे भलतेया । तैसी माझी रंग छाया ॥३॥*
*टाळ मृदंग दक्षिणेकडे । आम्ही गातों पश्चिमेकडे ॥४॥*

असे विनयाने म्हणतात. गायनाचे सामर्थ्य ते ओळखून असणार.

(ई) *'गायनाचे रंगीं । शक्ति अद्भुत हे अंगी'* (६९३) हे तुकारामांना मान्य असून *'तुका प्रेमें नाचे गाये । गाणियांत विरोन जाये'* (२९२८) हा त्यांचा अनुभव आहे.

(७) (अ) *'माझें जन्मपत्र बाबाजी ब्राह्मणें'* (१२४०) या अभंगामध्ये

*प्रसवली माता मज मळमूत्रीं । तेव्हां जिव्हेवरी लिहिलें देवें ॥४॥*
*शतकोटी अभंग करील प्रतिज्ञा । नाममंत्र खुणा वाचुनी पाहे ॥५॥*

असे नामदेवांनी म्हटले आहे.

(आ) परिसा भागवत नामदेवावरील आरतीत म्हणतो,

*जन्मतां पांडुरंगे । जिव्हेवरी लिहिलें ।*
*शतकोटी अभंग । प्रमाण कवित्व रचिलें ॥१॥.*

या दोन ठिकाणीं तर ही भविष्याक्षरे विठ्ठलानेच लिहिली होती असे सांगितले आहे.

(इ) शासन गाथा पान १०३२ वर *'आयुष्य कळसासिं आलें । अभंग सिद्धी नेले'* अशी भाषा, आषाढ शुद्ध एकादशीला नामदेवांनी विठ्ठलाकडे समाधीसाठी आज्ञा मागताना केल्याचे, परिसा भागवत सांगतात. येथील 'अभंग सिद्धी नेले' हे उद्गार संदिग्ध आहेत असे मानायला हवे.

(८) *नामया जनीचें बोलणें जाण । रुक्मिणीरमण लिहीतसे ॥२१०॥*
अ. २१.

श्रीभक्तविजय' असे महीपतीनेही नमूद करून ठेवले आहे.

(९) शेवट शतकोटीचा – सं. तु. ना. विप्र, १९९२. 'संतकवि तुकाविप्रांविषयी थोडेसे' या प्रास्ताविकातून वरील पृष्ठांक दिले आहेत. प्रकाशक – ह.भ.प. दिगंबर भा. परुळेकर.

(१०) ज्ञानदेव-एकनाथांच्या तुलनेने नामदेव-तुकारामांत गुरुभक्तीचे दर्शन अत्यल्प आहे. 'आदिग्रंथा'तील नामदेवरचनेत जसा गुरुमहिमा आहे तसा तो मराठी रचनेत आढळत नाही असे डॉ. हे. वि. इनामदारांचे निरीक्षण आहे.

(१०) (अ) 'गुरु करण्याविषयी श्री विठ्ठलाचा नामदेवास उपदेश' या मथळ्याखाली हा मथळा सकळसंतगाथेत आहे (१३६५). शासनगाथेत नाही (१३४५). ज्या ६२ ओव्या आल्या आहेत त्या गुरुविषयक चर्चा करणाऱ्या आहेत. अभंगरूपाने लिहिलेल्या चरित्ररचनेत त्या मध्येच घुसल्यासारख्या वाटतात. हे एखादे स्वतंत्र प्रकरण असावे. अन्य काही अभंगांतून द्विरुक्तीही झाली आहे. असो.

(११) तसे तर जनाबाईनेही *'देव खातें देव पितें । देवावरी मी निजतें, '* असे म्हटले आहे. पण ते बोलणे आहे, अनुभव आहे, कृती नव्हे.

(१२) विसोबांना निजलेले पाहून *'उठी उठी प्राण्या आंधळा तूं काये । देवावरी पाय ठेवियेले ॥३॥'* असे नामदेव म्हणाले. तेव्हा *'विसोबा खेचर बोले नामदेवा । उठविले जिवा कां रे माझ्या ॥४॥'* (१३४९) यावरून विसोबा झोपेत होते हे जाणवते. गुरुच्या निद्रेपेक्षा शिष्याचे हे स्वप्न असेल काय? असावे, असे वाटते.

(१३) या प्रसंगास जुळणारी म्हणून डॉ. हे. वि. इनामदारांनी मे. वि. भिडे यांच्या लेखाच्या आधारे 'संत नामदेवा'त गुरू नानकांच्या

जीवनातील एक कथा (पृ. ११०) दिली आहे. ती अशी – 'नानक मक्केस गेले असता ते एकदा पश्चिमेकडे पाय करून निजले. हे कृत्य मुसलमानांना धर्माविरूद्ध वाटले. मुल्लाजी रागावले व "काबाकडे पाय करून निजणारा तू कोण?" म्हणून त्याने त्यांना प्रश्न केला. नानकांनी शांतपणे उत्तर दिले – "बाबांनो, रागावू नका. मी दुरून आलेला पांथस्थ आहे. मेहेरबानी करून तुम्हीच माझे पाय ज्या बाजूला परमेश्वर नाही त्या बाजूकडे करा, म्हणजे त्यात चूक होणार नाही." हे उत्तर ऐकताच त्यातील रहस्य लक्षात येऊन मुल्ला खजील झाले." येथे नानक निजलेले होते असे सांगण्यामुळे स्वाभाविकता जाणवते.

(१४) 'द्वादशीचे' असा पाठ सकलसंतगाथेत आहे (१३९१).

(१५) या चार अभंगांच्या गटास श्रीसकलसंतगाथेत 'देवांनी बाबाजी चैतन्याचें रूप धरून स्वामीस स्वप्नामध्यें उपदेश केला ते विषयी' असा मथळा आहे (३४५३ ते ३४५६). त्यावरून या सुमारास बाबाजी हयात नव्हते अशी प्रतकाराची समजूत असावी. तसेच गुरु हवाच या विचाराच्या समर्थनार्थ विठ्ठलाने गुरुचे रूप धारण केले असावे असेही वाटते. महीपती सांगतो –

'बाबा चैतन्य माझे नांव । तुकयासि देव बोलिले'

(भक्तलीलामृत अ. ३३-६३).

★ संताजी जगनाड्यांच्या संहितेच्या आधारे येथे कळहे (= कल्हे = कल्हे) असा मूळ पाठ असावा असे मा. डॉ. सदानंद देहूकरांनी दाखविले आहे. पहा 'मंथन' पृ. १८ - १९.'

(१६) (अ) 'स्वामींस संतांनीं पुसलें कीं तुम्हांस वैराग्य कोण्या प्रकारें जालें तें सांगा - ते अभंग ॥३॥' या मथळ्याखाली *'मानियला स्वप्नीं गुरुचा उपदेश ।धरिला विश्वास दृढ नामीं ॥१३॥ यावरि या जाली कवित्वाची स्फूर्ति । पाय धरिले चित्तीं विठोबाचे ॥१४॥'* (१३३३). येथे गुरुपदेश स्वप्नात झाला व नंतर कवित्वाची स्फूर्ती झाली असे त्यांनी म्हटले आहे. (आ) *'पांडुरंगा करू प्रथम नमना'* या ओवीसमूहात *'बाबाजी सद्गुरुदास तुका'* (४५०५ - २) एवढाच निर्देश तुकोबा करतात. (इ) *'नेणें अर्थ कांहीं'* (१७९०) या अभंगात

*तुका म्हणे गुरुकृपेचा आधार । पांडुरंगें भार घेतला माझा ॥*

असा गुरुकृपेचा आधार निर्दिष्ट असला तरी भार घेतला आहे पांडुरंगानेच.

(ई) ओस जाल्या दिशा मज भिंगुळवाणें । जीवलग नेणें मज कोणी ॥१॥ ॥धृ॥ भय वाटे देखें श्वापदांचे भार । नव्हे मज धीर पांडुरंगा ॥धृ॥ अंधकारापुढें (अंधकार पुढें - ससंगा २२३३) न चलवे वाट । लागतील खुंट कांटे अंगा ॥२॥ एकला निःसंग फाकती मारग । भितों नव्हे लाग चालावया ॥३॥ तुका म्हणे वाट दावूनि सद्गुरु । राहिला हा दुरू पांडुरंग (पांडुरंगा - ससंगा) ॥४॥(३३६१). वाट दाखवून सद्गुरु दूर राहिला अशी तक्रार तुकोबा पांडुरंगाकडे करीत आहेत, असे वाटते ना येथे?

**प्रा. पां. ना. कुलकर्णी**
२५७५ बी, बलशाली अपार्टमेंट्स,
खासबाग, कोल्हापूर ४१६ ०१२.

# 'वाचा बोलों वेदनीति'

प्रा. श्री. मा. कुलकर्णी,

वैदिक ऋषिमुनींनी मनुष्य जीवनाची ध्येये अथवा प्राप्तव्ये म्हणून धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष ही ठरविली आहेत. अर्थ-काम ही ऐहिक ध्येये असोत की मोक्षासारखे अंतिम पारमार्थिक लक्ष्य असो धर्माचे आचरण आवश्यक आहे. महर्षी व्यास महाभारताच्या शेवटी म्हणतात,

*धर्मादर्थश्च कामश्च स किमर्थं न सेव्यते ॥६२॥*

स्वर्गारोहण पर्व (३१०५)

धर्मनेच अर्थ व कामही सिद्ध होतात तरीही लोक त्याचे सेवन का करीत नाहीत याचे व्यासांना आश्चर्य वाटते. याच धर्माचे रक्षण करण्यासाठी परमेश्वर वेळोवेळी अवतार घेत असतो. परमेश्वराचंच कार्य करणारे संतही याचसाठी अवतरतात आणि धर्मरक्षणाचे कार्य करतात[१]. त्यासाठी,

*वाचा बोलों वेदनीति । करुं संतीं केलें तें ॥*

अशी त्यांची प्रतिज्ञा असते. ती ते कशी पूर्ण करतात? तेच येथे पहावयाचे आहे.

जीवनाचं अंतिम लक्ष्य मोक्ष अथवा ईश्वरसाक्षात्कार आहे. ते कोणालाही प्राप्त करता येण्यासारखे आहे. त्यासाठी धर्म, पंथ, वर्ण, जात, सत्ता, संपत्ती, विद्वत्ता या कशाचीही आडकाठी नाही की आवश्यकता नाही.

*पैं भक्ति एकी मी जाणें । तेथ सानें थोर न म्हणे ।*
*आम्ही भावाचे पाहुणे । भलतेया ॥ ९.३९५ ॥*
*म्हणोनि कुळ जाति वर्ण । हें आघवेंचि गा अकारण ।*
*एथ अर्जुना माझेपण । सार्थक एक ॥९.४५६ ॥*

अशी भगवंताची व संतांची ग्वाही आहे. ज्याच्या त्याच्या अधिकारानुसार त्याने मार्ग अनुसरावा अशा या उदार भूमिकेला अनुसरूनच तुकाराम महाराज म्हणतात –

*अधिकार तैसा करूं उपदेश । साहे ओझें त्यास तेंचि द्यावें ॥*

असे असले तरी संत आपण तरून, इतरांस तारण्याचा सोपा उपाय सांगतात –

*कास घालोनि बळकट । झालों कळिकाळासी नीट ॥*
*केली पायवाट । भवसिंधु वरूनी ॥*

असे आश्वासन देऊन तुकोबा आवाहन करतात –

*या रे यारे लहानथोर । याति भलते नारी नर*
*करावा विचार । नलगे चिंता कोणासी ॥१००७॥*

भवसिंधू तरून जाण्यासाठी सोपी पायवाट भक्तीची आहे. ती भक्ती, तो भक्तिभाव अंतःकरणात उदित होणे आवश्यक आहे. मातेच्या प्रेमाने, सोप्या सोप्या प्रश्नांनी तुकोबा हे कार्य हळुवारपणे करतात.

*कोरे नाठवीसी कृपाळू देवासी । पोसीतो जगासी येकला तो ॥*

देव कृपाळू आहे, समर्थ आहे; तोच जगाचे पालन पोषण करीत आहे. बाळ जन्माला येतं तेव्हाच त्याच्या पोषणासाठी मातेच्या स्तनात दूध कोण उत्पन्न करतं? केवढी ही चिंता आणि किती ही तत्परता! पुढेही जीवनात हरएक गोष्टीची तोच काळजी घेतो. हेच पहा ना! उन्हाळ्यात शीतल छायेची प्राणिमात्राला आवश्यकता असते. तो कृपावंत असा दक्ष की, मोठमोठे वृक्ष नव्या दाट पालवींनी भरपूर छाया देण्यास उन्हाळ्याच्या आरंभीच तयार करून, श्रांत पांथस्थाच्या आगमनाची वाट पाहात असतात. *'उष्णकाळमासीं । जीवन तयांसी कोण घाली ?'॥* या दृष्टीने भोवतालच्या निसर्गाकडे आणि समाजाकडे पाहिले तर, हे मानवा! तुझ्या असे लक्षात येईल की,

*'तेणें तुझी काय । केली नाहीं चिंता ।'* आणि म्हणून कृतज्ञतेने *'राहे त्या अनंता आठवूनी ॥'* हे सर्व इतक्या थोड्या शब्दांत आणि अशा सोप्या रीतीने सांगून आणि त्या अनंताचे स्मरण चित्तात जागे करून तुकाराम म्हणतात,

*तुका म्हणे ज्याचें नांव विश्वंभर । त्याचें निरंतर ध्यान उरी ॥*

॥३१८५॥

असा हितोपदेश केला तरी मनुष्य तेवढ्यानेच सन्मार्गाला लागत नाही.

*जे प्राणियां कामीं भरू । देहाचिवरी आदरू ।*
*बहुत करूनि विसरू । आत्महिताचा ॥* (ज्ञा. ४.२०)

म्हणून त्याला धाकही दाखवावा लागतो. संत तेही कार्य भीडभाड न ठेवता करतात. कारण, *बुडतां हे जन न देखवे डोळां । येतो कळवळा म्हणुनीयां ॥१३६५॥* म्हणून स्वतःच्याच मनाला मध्यस्थ घालून तुकोबाराय म्हणतात –

*नको नको मना गुंतो माया जाळीं । काळ आला जवळीं ग्रासावया॥*
*काळाची हे उडी पडेल बा जेव्हां । सोडविना तेव्हां माय बाप ॥*

मायबापच नव्हेत तर सगे, सोयरें, राजाचे अधिकारी आणि स्वतः राजा देखील सोडवू शकणार नाही –

*सोडवीना राजा देशीचा चौधरी । आणिक सोयरीं भलीं भलीं ॥*

शेवटी, चक्र हातात धरून कळिकाळालाही पळवून लावणाराच तुझी सुटका करू शकेल –

*तुका म्हणे तुज सोडवीना कोण्ही । येका चक्रपाणीवांचुनीयां ॥*

॥२५०८॥

परंतु त्याला शरण जायचं तर प्रपंच सोडावा लागेल, घरदार सोडून वनात जावे लागेल – हे कसं काय जमेल? त्याची चिंता नको. महाराज सोपं साधन सांगतात –

*नामसंकीर्तन साधन पैं सोपें । जळतील पापें जन्मांतरींची ॥*

या जन्मीचीच नव्हे तर मागील अनेक जन्मांतळी पापेही जळतील आणि ईश्वर प्राप्तीचा मार्ग मोकळा होईल. शिवाय यासाठी –

*न लगती सायासं जावें वनांतरा । सुखें येतो घरा नारायण ॥*

त्यासाठी काही तरी करावे लागेल ना? जिथे असाल तिथेच बसून चित्त एकाग्र करा आणि त्या अनंताला प्रेमाने आळवा –

*रामकृष्ण हरि विठ्ठल केशवा ॥ मंत्र हा जपावा सर्वकाळ ॥*

एवढे कराल तर अन्य कोणतेही साधन नको, साधना नको असे तुकोबा शपथपूर्वक सांगतात –

*याविण असतां आणिक साधन । वाहातसे आण विठोबाची ॥*

असे हे सर्वात सोपे साधन आहे. आपले हित जाणणारा जो शहाणा माणूस असेल तो याचा लाभ घेईल आणि सुखी होईल –

तुका म्हणे सोपें आहे सर्वांहुनी । शहाणा तो धणी घेतो येथे ॥
॥३३१२॥

'नाम' हा सर्वाहून सोपा मंत्र आहे. त्याच्यासाठी काही मोल पडत नाही. त्यात गूढ, कठिण असेही काही नाही –

*नाम घेतां न लगे मोल । नाममंत्र नाहीं खोल॥*

परमेश्वराच्या सहस्रावधी नामांपैकी सर्वात सोपे व सर्वाधिक प्रभावी नाम दोन अक्षरीच आहे –

*दोंचि अक्षरांचें काम । उच्चारावें राम राम ॥*

ते महादेव शंकरापासून सामान्य माणसापर्यंत कोणालाही घेता येते. कसलाही भेद तेथे नाही –

*नाहीं वर्णधर्म याती । नामें अवघेचि तरती ।*
*तुका म्हणे नाम । चैतन्य हें निजधाम ॥३२३०॥*

भव सागरातून तरून जाण्याला नामाची नौका हेच सुलभ आणि प्रभावी साधन आहे. ज्ञानेश्वर श्रीकृष्णमुखाने सांगतात –

*भवसिंधूचेनि माजें । कवणासि धाकु नुपजे?*
*येथ जरी कां माझे । बिहिती हन ॥८८॥*
*म्हणोनि गा पांडवा । मूर्तीचा मेळावा ।*
*करूनि त्यांचिया गांवा । धांवतु आलों ॥८९ ॥*
*नामाचिया सहस्रवरी । नावा इया अवधारीं ।*
*सजूनियां संसारी । तारू जाहलों ॥९०॥*

ज्ञा.अ.१२ (दांडेकर प्रत)

संसारी गुंतलेला मनुष्य म्हणेल, 'काय करू? नाम केवळ मुखाने घेऊन काय उपयोग? मनात आवडच नाही. चंचल मन भलतीकडेच जातं'. संत सांगतात, 'तरी हरकत नाही. मुखाने नाम घेत जा; आरंभी मनात ते ठसणार नाही. पण हळू हळू गोडी लागेल. काळांतराने मनातही बसेल',

*नसे तरी मनीं नसो । परी वाचे तरी वसो ॥*

वरकरणी असे नाम घेणे दंभ असेल; पण कोणत्याही रीतीनी नाव घेतले तरी काळांतराने तरी परमेश्वर तारीलच –

*दंभस्थिती भलत्या भावें । मज हरिजन म्हणावें ।*
*तुका म्हणे काळांतरीं । मज सांभाळील हरी ॥ ११३९॥*

अजामेळाचं उदाहरण देऊन तुकोबा सांगतात – जन्मभर त्याने नाव घेतले नाही – पण,

प्राण जाते वेळे म्हणे नारायणा । त्यासाठीं विमान पाठवीलें ॥
॥३८६५॥

असा हा कृपाळू देव आहे. म्हणून तुकोबा म्हणतात,

'नामावर विश्वास ठेव, संन्यास घ्यावा लागत नाही, तीर्थाटनाचे श्रम करावे लागत नाहीत. मुखी नाम असले पाहिजे. मग मोक्ष तुझ्या स्वाधीन आहे. हा अनेकांचा अनुभव आहे' –

*मुखीं नाम हातीं मोक्ष । ऐसी साक्ष बहुतांची ॥*
*भस्म दंड नलगे काही । तीर्था आटी भ्रमण ।*
*तुका म्हणे आडकाठी । नाहीं भेटी देवाचे ॥३१७०॥*

घरदार, संसार सोडण्याची, संन्यास घेऊन वनात जाण्याची आवश्यकता नाही. परंतु हा संसार कसा करायचा? घरी, दारी, समाजात कसे वागायचे? नीतिनियम कोणते पाळायचे? असे प्रश्न संसारी माणसाच्या मनात उभे राहतात. त्यासंबंधीही तुकारामांनी वेळोवेळी मोलाचा उपदेश केला आहे, मार्गदर्शन केले आहे.

अर्जुनाने भगवान श्रीकृष्णांना प्रश्न विचारला होता –

*अथ केन प्रयुक्तोऽयं पापं चरति पूरुषः ।*
*अनिच्छन्नपि वार्ष्णेय बलादिव नियोजितः ॥३-३६॥*

अर्थात हे श्रीकृष्णा! मनुष्याला पापकृत्ये करण्याला कोणाकडून प्रेरणा मिळते? इच्छा नसतानाही मनुष्य जणुकाय बळजबरीने पापकर्मात प्रयुक्त केला जातो, तो कोणामुळे?' या प्रश्नाचे स्पष्टीकरण करताना ज्ञानेश्वर म्हणतात, "सामान्य लोक सोडा, पण ज्ञानी पुरुषांचाही स्वभाव बिघडतो आणि तेही निराळ्या मार्गाने जाताना दिसतात. जे सर्वज्ञ आहेत, ज्यांना त्याज्य-ग्राह्य कळते तेही परधर्माचा आधार करून भ्रष्ट होतात.... ज्या पापाचे भय घेतात तेच अंतःकरणाला चिकटून राहते; ज्याला ते चुकवितात तेच यांना घेरते –

*ऐसा बलात्कारु एकु दिसे । तो कोणाचा एथ असे ।*
*हें बोलावें हृषीकेशें । पार्थु म्हणे ॥२३३॥ अ.३*

यावर भगवान श्रीकृष्णांनी जे उत्तर दिले ते फार महत्त्वाचे आहे. श्रीभगवान म्हणाले,

*काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः ।*
*महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम् ॥३.३७॥*

(रजोगुणापासून उत्पन्न झालेला मोठा खादाड व मोठा पापी असा हा काम व असा हा क्रोध हाच शत्रू आहे असे समज.) हे काम क्रोधच व्यक्तीचा सर्वनाश करतात, समाजातही धुमाकूळ घालतात. त्यांच्या या उपद्रवांचं व उत्पातांचं ज्ञानेश्वरांनी सविस्तर वर्णन केलं आहे.

या कामक्रोधांचा परिवारही मोठा आहे - अहंकार, दंभ, मोह, आशा, तृष्णा, भ्रांती असा हा परिवार मोठा अनर्थकारी असल्याचेही ज्ञानेश्वरांनी वर्णिले आहे. सर्व काळी आणि सर्व देशात हे कामक्रोधच सर्व प्रकारचे पापाचरण करवितात; नाना प्रकारचे गुन्हे घडवितात. सर्व संतांनी यांच्यापासून सावध राहण्याला लोकांना परोपरीने सांगितले आहे.

तुकाराम महाराजांनी सांसारिकांना उपदेश करताना या कामक्रोधाची जी आलंबने आहेत त्यांच्यापासून दूर राहण्याचा व्यावहारिक उपदेश वारंवार आणि मोठ्या कळवळ्याने केला आहे –

*पराविया नारी माऊलीसमान । मानलीया धन काय वेंचे ।*
*न करितां परनिंदा द्रव्य अभिलाष । काय तुमचें यास वेंचे सांगा॥*
॥४५३॥

आणखी एका अभंगात ते सांगतात –

*इतुलें करी भलत्यापरी । परद्रव्य परनारी ।*
*सांडोनि अभिलाष अंतरीं । वर्ते वेव्हारीं सुखरुप ॥*

काही झालं तरी या दोन गोष्टी कर. दुसऱ्याच्या धनाची अभिलाषा धरू नको आणि परस्त्रीची वासना अंतरात ठेवू नको. मग सुखाने व्यवहार कर. या दोन मुख्य गोष्टींच्या बरोबरच काही साहाय्यक गोष्टी करण्यास वा सोडण्यास तुकोबा सांगतात –

*न करी दंभाचा सायास । शांति राहे बहुवस ।*
*जिव्हे सेवी सुगंध रस । न करीं आळस रामनामीं ॥*

सर्वांशी मैत्री करावी, वाणीत सौजन्य असावं. दुर्जनांची संगती सोडून संतांचा सहवास प्रयत्नपूर्वक साधावा –

*जन मित्र होई सकळांचा । अशुभ न बोलावी वाचा ।*
*संग न धरावा दुर्जनांचा । करीं संतांचा सायास ॥*

देवाशिवाय अन्य कोणाच्या साहाय्याची आशा धरू नको, निराशाच पदरी येईल. तृष्णा वाढवू नको, ती कधीही तृप्त होत नाही[२] आणि कधीही सुख मिळत नाही. देवावर विश्वास ठेव, धैर्य धारण कर, निर्धारच कर म्हणजे देव योगक्षेमाचा भार वाहतो; या गोष्टीला अंतर पडणार नाही –

*करिसी देवाविण आस । अवघी होईल निरास ।*
*तृष्णा वाढविसी बहुवस । कधीं सुखा न पावसी ॥*
*धरोनि विश्वास करी धीर । करितां देव हाची निर्धार ।*
*तयाचा वाहे योगक्षेम भार । नाहीं अंतर तुका म्हणे ॥ ८२७ ॥*

ज्ञानेश्वरांनी वर्णिलेला काम क्रोधांचा परिवार यात आलाच आहे. त्यात कामक्रोधच मुख्य आहेत. म्हणून त्यांचा त्याग करण्यास तुकाराम परोपरीने सांगतात. हा एकच अभंग पहा -

*साधनें तरी हींच दोन्हीं । जरी कोण्ही साधील ।*
*परद्रव्य परनारी । याचा धरी विटाळ ॥*

असे केले म्हणजे सर्व ऐहिक भाग्य तर घराला येतेच पण ते शरीर आणि ते घर देवाचे निवासस्थान होऊन जाते –

*देव भाग्यें घरा येती । संपत्ती त्या सकळा ।*
*तुका म्हणे तें शरीर । गृहभांडार देवाचें ॥ १०६४ ॥*

यापरते भाग्य ते कोणते आणि सुख तरी कोणते?

व्यवहारात असो की परमार्थात असो अहंकार घातकच आहे. अंतःकरण शुद्ध झाल्याशिवाय कशाचाच उपयोग नाही –

*थोर ते गळाली पाहिजे अहंता । उपदेश घेतां सुख वाटे*
*व्यर्थ भराभर केलें पाठांतर । जोंवरी अंतर शुद्ध नाही ॥ २०३७॥*

अहंकारा प्रमाणेच 'दंभ' ही त्याज्य आहे –

*हित व्हावे तरी दंभ दुरी ठेवा । चित्त शुद्धसेवा देवाची ते ॥ २६०७॥*

तुकारामांना सभोवतालच्या समाजात जो दंभाचार दिसत होता त्याचा त्यांनी सर्वत्र निषेध केला आहे –

*टिळे टोपी उंच दावी । जगीं मी एक गोसावी ॥*
*औघा वरपंग सारा । पोटीं विषयाचा थारा ॥*
*मुद्रा लावितो कोरूनी । मान व्हावयासी जनीं ॥*
*तुका म्हणे ऐसे किती । नरका गेले पुढे जाती ॥ २०८३ ॥*

अशा भोंदू साधुसंतांचा त्या काळीही बराच बोलबाला झाला असावा. काही 'साधू' व्यसनीही असावेत. अशा भोंदू साधूंपासून सामान्य भाविकांना तुकाराम सावध करतात. कलियुगातील संतांचं हे एक वर्णन पाहा,

*ऐसे संत झाले कळीं । तोंडीं तमाखूची नळी ॥*
*स्नान संध्या बुडविली । पुढें भांग वोढवली ॥*
*भांगभुकी हें साधन । पचीं पडे मद्यपान ॥*
*तुका म्हणे अवघें सोंग । तेथें कैचा पांडुरंग ॥ २०८४ ॥*

असा हा दंभस्फोट त्यांनी आणखी बऱ्याच अभंगांतून केला आहे.

संतांचा भर चित्तशुद्धीवर आहे. काम-क्रोधादी षड्रिपूच्या नाशाने ही चित्तशुद्धी होते. स्थितप्रज्ञाचं देखील पहिलं लक्षण चित्तशुद्धी हेच श्रीभगवान सांगतात –

*प्रजहाति यदा कामन् सर्वान पार्थ मनोगतान् ।*
*आत्मन्येवात्मना तुष्टः स्थितप्रज्ञस्तदोच्यते ॥ २.५५ ॥*

चित्ताचं हे विकाररहित्य व्यक्ती, कुटुंब आणि समाज या सर्वांनाच हितकारक आहे. शिवाय व्यक्तीचं पारमार्थिक कल्याणही त्यामुळे साधतं. तुकारामांनी वेगवेगळ्या प्रकारांनी, निरनिराळ्या निमित्तांनी हा उपदेश केला आहे. होमहवन, जपतप, पांडित्य हे सर्व भक्तीवाचून व्यर्थ होत. उलट त्यायोगे काम-क्रोध, दंभ, अहंकार, अभिमान यांचीच वाढ होते. धर्म करिता अधर्म म्हणतात तो हाच. अशा साधकाला तुकाराम विचारतात –

*तीळ जाळीले तांदुळ । काम क्रोध तैसेची खळ ॥*
*कां रे शिणलासी वाउगा । न भजतां पांडुरंगा ॥*
*मान दंभ पोटासाठी । केली अक्षराची आटी ॥*
*तप करूनीया तीर्थाटण । वाढविला अभिमान ॥*
*वाटिलें तें धन । केली अहंता जतन ॥*
*तुका म्हणे वर्म । चुकलीया तो अधर्म ॥ ४८२ ॥*

लोक तीर्थाला जातात. तेथे स्नान केल्याने पापक्षालन होते अशी त्यांची धारणा असते. परंतु केवळ शरीर धुतल्याने काय साधणार?

मनोमळ दूर झाले पाहिजेत –

*जाउनीया तीर्था तुवां काय केलें । चर्म प्रक्षालिलें वरीवरी ।।*

*अंतरींचें शुद्ध कासियानें झालें । भूषण त्या केलें आपणया ।।*

अंतःकरण पालटल्याचे कसे ओळखावे?

*तुका म्हणे नाहीं शांति क्षमा दया । तोंवरी कासया फुंदा तुम्ही ।।*

।।२६४५।।

अंतःकरणातील दुर्गुण गेले पाहिजेत तसेच दुराचारही सोडले पाहिजेत. कन्या, गाय आणि कथा यांचा विक्रय तुकारामांनी निषिद्ध ठरविला आहे –

*कन्या गौ करी कथेचा विकरा । चांडाळ तो खरा तया नावें ।।*

*आशाबद्ध नये करू ते करिती । तुका म्हणे जाती नरकामाधी।।*

।।५१५।।

दंडाच्या भयानेच सर्वसामान्य माणूस पापापासून दूर राहतो. मग तो दंड राजाचा असो की यमराजाचा असो. पापाचे आणि परिणामी नरकाचे भय हे अधिक व्यापक आणि परिणामकारक होय. म्हणून संत, लोकांना सतत याची जाणीव देत असतात. कथा कीर्तन करून द्रव्य घेणारांना नरकवास घडतो असे आणखी एका अभंगात सांगताना तुकारामांनी नरकातील भयंकर यातनांचाही उल्लेख केला आहे –

*कथा करूनियां द्रव्य घेती देती । तयां अधोगति नर्कवास ।।*

*रौरव कुंभीपाक भोगिती यातना । नये नारायणा करूणात्यांची ।।*

*असिखड्गधारा छेदिती सर्वांग । तप्तभूमी अंग लोळविती ।।*

*तुका म्हणे तया नरक न चुकती । सांपडल्या हातीं यमाचिया ।।*

।।१८९९।।

गाय, कन्या आणि कथा यांच्या विक्रयाचा असाच निषेध आणखी काही अभंगांतूनही केलेला असून परिणाम नरकवास हाच सांगितला आहे.

पाप-पुण्य, नरक-स्वर्ग या संकल्पना अंधश्रद्धामूलक आहेत असे ज्यांना वाटते त्यांनी खुशाल तसे मानावे. स्वतः यमराजाने सदेह स्वर्गाजवळ पोचलेल्या धर्मराज युधिष्ठिराला नरकाचे दर्शन घडविल्याचे श्रीव्यासांनीच वर्णिले आहे[२]. अर्जुनाला नरकाचे भय वाटत होते. आणि भगवान श्रीकृष्णांनीही स्वर्ग-नरक, पुण्य-पाप यांचा निर्देश अर्जुनाजवळ अनेकदा केला आहे.

*अनेकचित्तविभ्रांता मोहजालसमावृताः ।*

*प्रसक्ताः कामभोगेषु पतन्ति नरकेऽशुचौ ।।१६।।*

*त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः ।*

*कामः क्रोधस्तथा लोभस्तस्मादेतत्त्रयं त्यजेत् ।।२१।। अ. १६*

*ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं ।*

*क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति ।।२१।। अ.९*

आसुरी प्रकृतीच्या लोकांच्या ठिकाणी ईश्वराविषयी तिरस्कार, द्वेष असतात. साहजिकच,

*स्वर्गालागीं आदरू । कां नरकाचा अडदरू ।*

*या वासनांचा अंकरू । जळोनि गेला ।।३१६।। ज्ञा. अ. १६*

स्वर्गाविषयी आदर अथवा नरकाचे भय त्यांच्या अंतःकरणातून नष्टच झालेले असतात. या आसुरी लोकांची विचारसरणी एका अभंगात तुकारामांनी अचूकपणे मांडली आहे. त्यांचे दुराचार याच प्रकारच्या विचारसरणीतून जन्मलेले असतात. पहा –

*जीव तोचि देव भोजन ते भक्ति । मरण ते मुक्ति पाखांड्यांची ।।*

*पिंडाच्या पोषकीं नागविले जन । लटिकें पुराण केले वेद ।।*

*मना आला तैसा करिती विचार । म्हणती संसार नाही पुन्हा ।।*

*तुका म्हणे पाठीं उठती यमदंड । पापपुण्य लंड न विचारी ।।*

१७९८

गीतेच्या १६ व्या अध्यायात भगवंतांनी या आसुरी लोकांच्या आचारविचारांचे वर्णन केले आहे. त्याचा मार्मिक विस्तार ज्ञानदेवांनी केला आहे. तो मुळातूनच पहावा.

'त्याज्य ते त्यजावेयालागीं' म्हणून या पाखंडी दुष्ट लोकांच्या दुर्गुणांचा व दुराचारांचा निषेध जसा तुकारामांनी केला आहे तसाच दैवी संपत्तीच्या सज्जनांच्या सद्गुणांचा आणि सदाचारांचा पुरस्कारही त्यांनी केला आहे. त्याचाही थोडासा परिचय करून घेऊ.

सत्य हा सर्वात मोठा सद्गुण. या एका गुणाच्या आधारे सर्व काही साध्य होते. तुकाराम महाराज तर म्हणतात की याच्या योगाने विशेष काही न करता परमेश्वराची प्राप्ती होते –

*खरें बोले तरी । फुकासाठी जोडे हरी ।।*

*ऐसे फुकाचे उपाय । सांडोनियां वाया जाय ।।*

*पर उपकार । येका वचनाचा फार ।*

*तुका म्हणे मळ । मनें सांडितां शीतळ ।।१७८५।।*

दया, क्षमा, शांती हे दैवी संपत्तीचेच गुण आहेत. ते ज्याच्या अंगी वसतात त्याच्या ठिकाणी देवाचाच वास असतो –

*दया क्षमा शांती । तेथें देवाची वसती ।। १७८६।।*

या दयेची तुकारामांची व्याख्या मार्मिक आणि मार्गदर्शक आहे. ते सांगतात,

*दया तिचें नांव भूतांचें पाळण । आणिक निर्दळण कंटकांचे ।।*

प्राण्यांचं पालन करणं हे दयेचं लक्षण खरं; परंतु त्यांत जे दुष्ट असतील, दुर्जन असतील त्यांचं काय? साधूंच्या रक्षणासाठी दुष्टांचा विनाश आवश्यकच असतो. परमेश्वराचंच ते कार्य आहे. म्हणून परमेश्वराचं कार्य करणाऱ्या राजाचंही ते कार्य असून त्यानं ते केलं पाहिजे. तो त्याचा स्वधर्म आहे. तो आचरल्यानं पाप लागत नाही. राजाच्या या कार्याविषयी तुकारामांनी एका अभंगात म्हटलं आहे ते या ठिकाणी लक्षणीय आहे –

*अन्यायासी राजा न करी दंड । बहुच ते लंड पीडिती जना ।।*

पुढे शेतीच्या दृष्टांताने आपला आशय ते अधिक स्पष्ट करतात,

*न करी निगा कुणबी न काढिता तन । कैंची येती कण हातासी ते ।।*

असे करण्यात राजाला पाप लागत नाही हेही तुकाराम सांगतात,

*तुका म्हणे सत्ता करूं नये अनुचित । पाप नाहीं नीत विचारितां।।*

।। ३७९९।।

आपलं अवतारकार्य सांगतानाही तुकारामांनी या प्रकारच्या द्विविध कार्याचा उल्लेख केला आहे –

*धर्माचें पाळण । करणें पाखांड खंडण ।।*
*हेंचि आम्हां करणें काम । बीज वाढवावें नाम ।।*
*तीक्ष्ण उत्तरें । हातीं घेऊनि बाण फिरे ।।*
*नाहीं भीड भार । तुका म्हणे साना थोर ।।३०४४।।*

सामान्य जनांनाही तुकोबा असाच विवेकपूर्ण उपदेश करतात –

*दुर्जनाचा मान । सुखें करावा खंडण ।*
*लाता हाणोनिया वरी । गुंडा वाट शुद्ध करी ।*
*बहुतां पीडी खळ । त्याचा धरावा विटाळ ।।*

समर्पक दृष्टांताने याचा समारोप असा करतात –

*तुका म्हणे नखें । काढुनि टाकीजे तीं सुखें ।।३०३२।।*

दये प्रमाणेच क्षमा हाही दैवी गुण असून त्याचा तुकारामांनी गौरवपूर्वक पुरस्कार केला आहे –

*क्षमा शस्त्र जया नराचिये हातीं । दुष्ट तया प्रति काय करी ।।*
*तृण नाहीं तेथें पडला दावाग्नि । जाय तो विझोनि आपसया ।।*

वैराने वैर वाढते आणि कुटुंबाचा नाश होतो. वैराग्नी विझविण्यास क्षमेसारखे प्रभावी साधन नाही. असे स्पष्ट करून तुकोबा म्हणतात –

*तुका म्हणे क्षमा सर्वांचे स्वहित । धरा अखंडित सुखरूप ।।*
।।३९४३।।

शांती हाही दैवी संपत्तीचाच महत्त्वाचा गुण आहे. प्रत्येक उपनिषदाचा एक शांतिपाठ असतो. त्रिवार शांतीचा उद्घोष केल्याशिवाय कोणत्याही धार्मिक कार्याची सांगता होत नाही. कुटुंब, समाज, राष्ट्र आणि जग या सर्वच क्षेत्रात शांतीचं सारखंच महत्त्व आहे. अशा या 'शांती'चा तुकाराम कसा गौरव करतात पहा –

*शांतीपरतें नाही सुख । येर अवघेंचि दुःख ।।*
*म्हणउनी शांती धरा । उतराल पैल तीरा ।।*

काम क्रोधादि विकार उफाळले तर नाना आधी - व्याधी प्राप्त होतात. उलट शांती धारण केली तर त्रिविध तापही शमतात –

*खवळलिया कामक्रोधीं । अंगीं भरती आधी व्याधी ।।*
*तुका म्हणे त्रिविध ताप । जाती मग आपेंआप ।।१०६१।।*

असा हा ऐहिक सुख आणि पारमार्थिक कल्याण साधणारा नीत्युपदेश तुकारामांनी उदंड केला आहे. 'अनुभवे आले ते जगा दिले' असा हा उपदेश लोकांना बुडताना पाहून राहवेना पण कळवळ्याने केलेला असल्यामुळे तो अत्यंत प्रभावी झाला आहे. *'वेदांचा तो अर्थ आम्हांसीच ठावा'* असे आत्मविश्वासपूर्वक म्हणणाऱ्या तुकोबांनी, वेद, उपनिषदे, भगवद्गीता, ज्ञानेश्वरी, नाथ भागवत अशा क्रमाने आलेली ही 'वेदनीती' आपल्या अनुभवसंपन्न आणि तपःपूत वाणीने जगाच्या कल्याणासाठी सांगितली आहे. या सर्व उपदेशाचं सार ज्या एका अभंगात सामावलेलं आहे तो उद्धृत करून या विवेचनाचा समारोप करणे उचित होईल. सामान्य सांसारिकाला केलेला हा उपदेश असा आहे –

*जोडोनिया धन उत्तम व्यवहारें । उदास विचारें वेंच करी ।।*
*उत्तमचि गती तो येक पावेल । उत्तम भोगील जीवखाणी ।।*
*परउपकार नेणें परनिंदा । पर स्त्रिया सदा बहिणी माया ।।*
*भूतदया गाई पशूंचे पाळण । तान्हेल्या जीवन वनामाजी ।।*
*शांतिरूप नव्हे कोणाचा वाईट । वाढवी महत्त्व वडीलांचे ।।*
*तुका म्हणे हेंचि आश्रमाचें फळ । परमपद बळ वैराग्याचें ।।*
।।२०९१।।

**टीप :**

(१) धर्मरक्षावयासाठी । करणे आटी आम्हांसी ।।
आणि, धर्माचे पालण । करणें पाखांड खंडण ।।

– तुकाराम

(२) न जातु कामः कामानामुपभोगेन शाम्यति ।
हविषा कृष्णवर्त्मेव भूय एवाऽभिवर्धते ।। भाग. ९-१९-१४ ।।

(३) पहा, महाभारत, स्वर्गारोहणपर्व अ. १ ते ३

(**सुचना** : या लेखातील अभंगांचे क्रमांक 'तुकाराम महाराजांच्या अभंगांची सांप्रदायिक ओळीची गाथा', केमकर आणि मंडळी, मुंबई ४, १९५० या गाथेतील आहेत.)

**प्रा. श्री. मा. कुळकर्णी,**
'राजमाणिक', ४८९,
हनुमान नगर, नागपूर - ४४० ००९.

# तुकाराम महाराजांचे साहित्यिक मोठेपण

**प्रा. ग. प्र. प्रधान**

थोर लेखकांचे मोठेपण हे असते की त्यांचे साहित्य आपण आयुष्यात जेव्हां पुन्हा वाचतो तेव्हां त्यांच्या त्या लेखनाचा अर्थ नव्याने समजू लागतो. मी कॉलेजमध्ये असताना तुकाराम महाराजांचे 'महाराष्ट्र वेद' हे पुस्तक आम्हाला अभ्यासासाठी नेमलेले होते. त्यावेळी तुकाराम महाराजांच्या मनातील भक्तिची उत्कटता जाणवली आणि त्यांच्या रोखठोक भाषाशैलीबद्दल आकर्षण वाटले. पुढे अनेक वर्षांनी १९६९ मध्ये जेव्हा तुकाराम महाराजांची 'गाथा' संपूर्ण वाचली त्यावेळी त्यांच्या काव्याचा आणि काव्यातून व्यक्त झालेल्या जीवन-दृष्टीचा आवाका किती प्रचंड आहे हे लक्षात आले आणि मन स्तिमित झाले. पुढे १९७५ साली आणीबाणीत असताना तुकारामांचे अभंग पुन्हा वाचले त्यावेळी मी त्यांच्या जीवनाचा विचार करू लागलो. आपणा सामान्य माणसांना संसाराबद्दल विलक्षण ओढ असते. तुकाराम महाराजांना बायकामुले होती, आणि तरीही त्यांना ही अध्यात्माची ओढ कशी वाटू लागली आणि विठ्ठलभक्तीत रंगून गेल्यामुळे ते संसाराबद्दल उदासीन कसे झाले हे कोडे मला उलगडत नव्हते. नंतर अभंग पुनः पुन्हा वाचतांना हे लक्षात आले की मनाची प्रगल्भता ही पुस्तकी शिक्षणावर अवलंबून नसते. संसारातील तापत्रयामुळे पोळले जात असतानाही बहुतेक सर्व जण त्यातच गुरफटून जातात. परंतु तुकाराम महाराजांना तरूणपणीच, या जीवनाचा अर्थ काय, हे कोणी निर्माण केले आणि या भवसागरात गटांगळ्या खात कसेबसे जगण्याऐवजी मनाला शांतता कशी लाभेल हे प्रश्न पडले. पत्नी, मुले यांच्याबद्दल त्यांना प्रेम होते आणि त्याच बरोबर आपण या विराट सृष्टीचा एक घटक आहोत ही जाणीव त्यांना झाली. वृक्षवल्ली आणि वनचरे ही त्यांना सोयरी वाटू लागली. तरीही त्यांच्या मनाला शांतता लाभेना आणि मग विठ्ठलाच्या भक्तीमध्ये ते रंगून गेले. परमेश्वराच्या भक्तीमुळे मनाला आधार वाटणारी असंख्य माणसे आहेत. परंतु तुकाराम महाराजांच्या भक्तीचे स्वरूप याहून वेगळे होते. ते परमेश्वराशी एकरूप झाले होते आणि त्यामुळे त्यांना सत्याचा साक्षात्कार झाला होता. ते, त्यांचा संसार आणि नंतर विठ्ठल असे त्यांच्या भक्तीचे स्वरूप नव्हते. विठ्ठलाबद्दल लिहितांना *"जिकडे पहावे तिकडे उभा । अवघ्या गगनाचा गाभा"* असे ज्यावेळी तुकाराम महाराज लिहितात त्यावेळी त्यांच्या विठ्ठलाशी झालेल्या एकरूपतेचा प्रत्यय येतो. या उत्कट व भव्य अनुभूतीचा आविष्कार करणारे अभंग हे तुकाराम महाराजांच्या काव्याचे खरे वैभव आहे. परंतु जीवनाबद्दल चिंतन करीत असताना आपल्या मनातील उमाळे नुसते व्यक्त होऊन चालणार नाहीत; आपल्या भोवतालच्या माणसांनाही आपल्या अनुभूतीचा स्पर्श व्हावा असे त्यांना वाटले, आणि त्यामुळे विठ्ठलाबद्दल लिहिताना जीवनातील अनेक अनुभवांबद्दल, आणि त्यांनी केलेल्या निरीक्षणांबद्दल त्यांनी अभंग रचले. या अभंगांमध्ये "टिळा टोपी माळा" च्या बहिरंगामागे दडलेल्या दांभिकतेवर त्यांनी प्रहार केला त्याचप्रमाणे कन्या सासरी जाताना आईच्या मनाची जी अवस्था होते, तिचाही हृदयस्पर्शी उल्लेख केला. तुकाराम महाराजांना जीवन जसे दिसले तसे त्या जीवनाचे चित्र अभंगात उमटले. यात कृत्रिमतेचा लवलेशही नाही. म्हणूनच इतकी वर्षे लोटली तरी तुकाराम महाराजांचा भाविकांशी संवाद चालूच आहे.

तुकाराम महाराजांच्या मनातील भक्तिची उदात्त भावना त्यांच्या अभंगातून ज्या रीतीने व्यक्त झाली आहे, तिच्यामुळे ते अभंग वाचतांना न्या. महादेव गोविंद रानडे यांच्या सारख्या विद्वान व्यक्तिच्या डोळ्यांनाही अश्रुधारा लागत.

तुकाराम महाराजांनी स्त्रीबद्दल जे लिहिले आहे ते मात्र मला मुळीच रुचत नाही. स्त्रीही अध्यात्म साधनेत सहचरी होऊ शकेल असे त्यांना का वाटले नाही, ते मला समजत नाही. जीवनाचे भव्य दर्शन होताना स्त्री पुरूष हे एकत्र वाटचाल करणारे वाटसरू आहेत असे त्यांनी लिहिले नाही याचा मला खेद वाटतो.

काही दिवसापूर्वी दिलीप चित्रे यांनी तुकाराम महाराजांच्या अभंगांचे इंग्रजीत केलेले रूपांतर वाचले. रूपांतर इंग्रजीच्या दृष्टीने चांगले असले तरी तुकाराम महाराजांचे मराठीतील अभंग वाचतांना त्यांच्याशी जी जवळीक निर्माण होते, आणि हा मेणाहून मऊ असणारा विष्णुदास कठिण वज्राला भेदून टाकतो याचा प्रत्यय आल्यामुळे जो आनंद वाटतो तो इंग्रजी रूपांतर वाचतांना पुरेसा मिळत नाही. ही माध्यमाची मर्यादा आहे.

मी वृत्तीने भाविक नाही. परंतु महाराष्ट्राच्या सामाजिक जीवनावर भागवतधर्माचा जो संस्कार झाला आहे त्याचे महत्व मी जाणतो. तुकाराम महाराजांचा असा संस्कार त्यांच्या अभंगामुळे मराठी मनावर झाला, आणि म्हणूनच त्यांचे साहित्य आजही महत्वाचे आहे.

**प्रा. ग. प्र. प्रधान**
९२६, सदाशिव पेठ, बॅ. गाडगीळ रस्ता,
पुणे ४११ ०३०.



# संत तुकारामांचे व्यक्तिमत्व

डॉ. सदा कऱ्हाडे

तुकारामाच्या व्यक्तित्वाचा विचार करताना त्याच्या संबंधात प्रचलित असलेल्या दोन उक्तिंचा विचार केला जातो. 'ज्ञानाचा एका आणि नाम्याचा तुका' अशी एक उक्ती आहे. ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ आणि तुकाराम हे भागवत संप्रदायातले प्रमुख चार संतकवी आहेत. ज्ञानेश्वरांनी भगवत्‌गीतेचा अनुवाद केला. श्रीकृष्णाने अर्जुनाला केलेल्या उपदेशाच्या अनुषंगाने भक्तिचे तत्वज्ञान विशद केले, त्या तत्वज्ञानाचा भाष्यात्मक अनुवाद ज्ञानेश्वरांनी केला. श्रीकृष्णाने उद्धवालाही उपदेश करण्याच्या निमित्ताने तत्वज्ञान सांगितले ते भागवताच्या एकादश स्कंधात आहे. संत एकनाथांनी ज्ञानेश्वरीतील तत्वज्ञानाच्या आधारे आणि त्याच विवेचन पद्धतीने भागवत धर्मासंबंधीचे सोपपत्तिक भाष्य केले. एकादश स्कंधावरील त्यांचे हे भाष्य त्यांच्या 'भागवत' या ग्रंथात आहे. श्रीकृष्णाने विशद केलेले भक्तितत्त्वज्ञान अशा रीतीने भगवत्‌गीता आणि भागवत-एकादशस्कंध या दोन ग्रंथात आहे. म्हणून भक्तितत्त्वज्ञान प्राकृतात आणण्याचे ज्ञानेश्वरांचे कार्य संत एकनाथांनी पूर्ण केले. या अर्थाने 'ज्ञानाचा एका' ही उक्ती घ्यायची. *'नाचू कीर्तनाचे रंगी । ज्ञानदीप लावू जगी ।'* अशी भूमिका घेऊन संत नामदेवांनी ज्ञानेश्वरांच्या शिकवणुकीचा प्रसार केला आणि तुकारामाने नामदेवाचे कार्य पूर्ण केले. म्हणून 'नाम्या तुका'. नामदेवाने स्वप्नात दृष्टांत देऊन शतकोटी अभंग पूर्ण करण्याची प्रेरणा तुकारामाला दिली होती. *'नामदेवे केले स्वप्नामाजि जागे'* असे आपल्या कवित्वस्फूर्तिच्या अभंगात तुकारामच सांगतात. *'उरले ते शेवटी लावी तुका'* म्हणून 'तुका म्हणे' ही नाममुद्रा तुकारामाच्या अभंगात येते. तुकारामाच्या व्यक्तिमत्त्वाचा विचार करताना स्वाभाविकच ज्ञानेश्वर, नामदेव आणि एकनाथ यांच्या सापेक्ष तुलनेने करावा लागतो. *'संतकृपा झाली । इमारत फळा आली ।'* या प्रसिद्ध अभंगात *'ज्ञानदेवे रचिला पाया'* आणि *'तुका झालासे कळस'* अशा दोन पंक्ती आहेत. संतांनी भगवत्‌भक्तिचे देवालय रचिले. त्याचा पाया ज्ञानेश्वरांनी रचला आणि तुकारामाने त्या देवालयावर कळस बांधला. म्हणजे एका अर्थी ज्ञानेश्वरांचे कार्य तुकारामाने पूर्ण केले. पाया आणि कळस यांचा अनुबंध लक्षात घेतला तर 'ज्ञानेश्वर - तुकाराम' या नामद्वयाचा भावार्थ समजू शकतो. 'ज्ञानबा - तुकाराम' हा मध्यमपदलोपी समास आहे, असे विनोबांनी म्हटले ते यथार्थच आहे.

ज्ञानेश्वरांनी स्त्री शूद्रादिकांच्या अध्यात्मिक उन्नतीचे ध्येय आपल्यासमोर ठेवले होते. एकाअर्थी ते ध्येय तुकारामांच्या रूपाने प्रत्यक्षात अवतरले. *'वेदांचा तो अर्थ आम्हासीच ठावा ।'* असे म्हणण्याचा अधिकार तुकारामाने स्वतः प्राप्त करून घेतला. इतकेच नव्हे तर बहुजन समाजालाही तो अधिकार प्राप्त करून दिला. ज्ञानेश्वरांचे श्रेष्ठत्व तुकारामाने गौरविले आहे. आणि सामान्य माणसालाही 'ज्ञानेश्वर माऊली' विषयी आदर आहे. तरीही बहुजन समाजाला तुकाराम अधिक जवळचा वाटतो. महात्मा ज्योतीबा फुले यांनी ज्यांचा शूद्रातिशूद्र म्हणून उल्लेख केला, त्या शूद्रातिशूद्रांचा कैपक्ष तुकारामाने घेतला. आणि शूद्रातिशूद्रांच्या मूक भावनांना वाचा फोडण्यासाठी तुकारामाने आपली लेखणी आणि वाणी झिजविली. तुकाराम जातीने शूद्र होता. आपल्या शूद्र वर्णाचा त्याने वारंवार आवर्जून उल्लेख केला आहे.

'बरा कुणबी केलो । नाही तरि दंभेचि असतो मेलो ।'

असे म्हणणारा तुकाराम सतत आत्मपरीक्षण करणारा, आत्मनिरीक्षण करणारा होता. आणि आत्मपरीक्षणाने डोळस झालेल्या दृष्टीने बहुजन समाजाकडे पहाणारा होता. *'भीत नाही आता आपल्या मरणा । दुःखी होता जना न देखवे ।'* सर्वसामान्य माणसाचे दुःख तुकारामाला पाहवत नव्हते. *'बुडता हे जन न देखवे डोळा । येतो कळवळा म्हणवुनि ।'* बहुजनसमाजाच्या दुःखाचा, दैन्याचा कळवळा तुकारामाला येत असे. तुकाराम हा ज्ञानेश्वरांपेक्षा अधिक लोकाभिमुख होता. म्हणून बहुजन समाजाला ज्ञानेश्वरांपेक्षा तुकारामांविषयी अधिक जवळीक वाटते. याचे रहस्य तुकारामांच्या व्यक्तिमत्वात आहे.

ज्ञानेश्वरांचे व्यक्तिमत्व चतुर्विध होते. ते आत्मानुभवी योगी होते, क्रांतदर्शी तत्त्वज्ञ होते, भूतदयावादी संत होते आणि प्रतिभासंपन्न कवी होते. एका अर्थी ज्ञानेश्वर सिद्धपुरुष होते. नामदेवाचे व्यक्तिमत्व सामान्य माणसाप्रमाणे सांसारिक आपदांनी भरलेले, व्यावहारिक झगड्यांनी भरलेले होते. त्यांची भूमिका ही ध्येयमार्गाने जाऊ इच्छिणाऱ्या वाटाड्यासारखी होती. या वाटेने गेलो तर आपलाही अध्यात्मिक विकास होऊ शकतो, हा आदर्श नामदेवाने सामान्य माणसासमोर ठेवला. म्हणून नामदेवाने स्वतः करून घेतलेला अध्यात्मिक विकास सर्व सामान्यांना अनुकरणीय वाटला. 'हरिनामाचा सुकाळ' करून नामदेवाने नामसंकीर्तनाची वाट दाखवली. एका अर्थी संत एकनाथही त्याच वाटेने गेले. पण शेवटी ते भागवत धर्माचे प्रवक्ते बनले. दत्तसंप्रदाय, वारकरी पंथ, पैठणची वैदिक परंपरा यांचा मिलाफ त्यांच्या व्यक्तिमत्वात होता. त्यांच्या ठायी समन्वय बुद्धी होती. त्यांना अभिजन वर्गालाही अध्यात्मिक विकासाचा मार्ग दाखवायचा होता, आणि बहुजन वर्गालाही मार्ग दाखवायचा होता. अभिजन वर्गासाठी 'भागवता'सारखी रचना त्यांनी केली, आणि बहुजन वर्गासाठी 'भारूडा'सारखी रचना केली. समन्वयबुद्धीचे आदर्श समाज सुधारक आणि उदार मतवादाचे जनक अशी त्यांची भूमिका होती.

ज्ञानेश्वर एका अर्थी प्रेषित होते. एकनाथ प्रवक्ते होते.

भागवत संप्रदायातील या तीनही संतकवींपेक्षा तुकारामाचे व्यक्तिमत्व भिन्न होते. तुकाराम ज्ञानेश्वराप्रमाणे योगी, तत्त्वज्ञ अथवा प्रेषित नव्हते. नामदेवाप्रमाणे केवळ कीर्तनांत दंग होऊन सामान्यजनासाठी अध्यात्मिक विकासाचे वाटाडे नव्हते. अथवा एकनाथांसारखे भागवत धर्माचे प्रवक्ते आणि समन्वयवादी उदारमतवादी सुधारक नव्हते. सांसारिक जीवनातील चढउतार पाहून उद्विग्न झालेला, प्रापंचिक विपत्तींचा वीट आल्यामुळे संसाराकडे पाठ फिरवून परमार्थाची वाटचाल करणारा, आणि साधकावस्थेतून सिद्धावस्थेला पोचलेला झुंजार व विजीगीषु वृत्तीचा 'भक्तवीर' होता. *'झुंजार ते एक विष्णुदास जगी ।'* असा उद्‌घोष तुकारामानेच प्रथम केला.

*पुनीत केले विष्णुदासी । संगे आपुलिया दोषी ।*
*कोण पाहे तयाकडे । वीर विठ्ठलाचे गाढे ।*

विष्णुदास हे विठ्ठलाचे पराक्रमी वीर आहेत. ज्ञानेश्वर, नामदेव एकनाथ इत्यादी संतांनी प्रामुख्याने धर्मरक्षणाचं कार्य केलं. परंतु तुकारामांनी धर्माचे पालन, धर्माचे रक्षण करता करताच 'पाखांड खंडण' करणे हेही आपले जीवितकार्य मानले होते. कोणाची भीडभाड न धरता त्यांनी ही कामगिरी पार पाडली.

*धर्माचे पाळण । करणे पाषांड खंडण ॥*
*हेचि आम्हा करणे काम । बीज वाढवावे नाम ॥*
*तीक्ष्ण उत्तरे । हाती घेऊनि बाण फिरे ॥*
*नाही भीड भार । तुका म्हणे साना थोर ॥*

अनिष्ट प्रवृत्तीवर शब्दांच्या सहाय्याने प्रहार करताना, कुठाराघात करताना कोणाची पर्वा केली नाही.

*आम्ही वैकुंठवासी । याचि कारणासी ॥*

पाखंडच सामान्यजनांचे अहित करतो. म्हणून जनहितासाठीच पाखंड खंडण करणं आवश्यक आहे. आणि त्यासाठीच आपला जन्म आहे अशी तुकारामांची धारणा होती. *"देतो तीक्ष्ण उत्तरे । पुढे व्हावयासी बरे ।"* स्वतःच्या जीवनात आलेल्या अनुभवांमुळे तुकारामाने सतत आत्मनिरीक्षण केले. त्यामुळेच त्यांना जनहिताचा कळवळा आला आणि त्याच कळवळ्याने त्यांनी जगाला 'नीत' देण्यात उद्योग केला. त्यासाठी सत्याची कास धरली. तर्कवितर्काची चाड बाळगली नाही.

*उपकारासाठी केले हे उपाय । येणेविण काय चाड आम्हा ॥*
*बुडती हे जन न देखवे डोळा । येतो कळवळा म्हणवुनी ॥*

'संसारातील दुःख, दैन्य, आपत्ती, यातना आणि मृत्यू यांचे भय आणि लौकिक व्यवहारातील विवेकशून्यता, स्वार्थलंपटवृत्ती, निसत्वपणा व ढोंग हे सर्व पाहून तुकारामांना उबग आला होता. परंतु ते अगतिक झाले नाहीत. उलट या सर्वांच्या विरूद्ध त्यांनी संघर्षाची भूमिका घेतली: *'रात्री दिवस आम्हा युद्धाचा प्रसंग । अंतर्बाह्य जग आणि मन ।'* असं म्हणणाऱ्या तुकारामांच जीवन संघर्षमय होतं; स्वतःच्या व्यक्तिगत जीवनात त्यांना सतत संघर्ष करावा लागला. आणि बहुजनसमाजाला, शूद्रातिशूद्रांनाही त्यांनी संघर्षशील बनविण्याचा प्रयत्न केला. 'रात्र आणि दिवस' सतत संघर्ष. रात्रंदिवस असणाऱ्या युद्धप्रसंगात एका अर्थी लोकसंघर्षाची कल्पना आहे. तुकारामाने भक्तिला नवा अर्थ दिला. भक्ती म्हणजे नीती. अथवा नीती म्हणजेच भक्ती. भक्ती हे लोकसंघर्षाचे हत्यार आहे, अशी तुकारामांची धारणा होती. लोकसंघर्ष हा संग्राम आहे. संग्रामातून माघार घ्यायची नाही. पळ काढायचा नाही. *'रणी निघता शूर न पाहे माघार ।'* अशी तुकारामांची झुंजार वृत्ती होती तुकाराम निःस्पृह होता, निर्भय होता. धर्ममार्तण्डांचा रोष त्याने ओढवून घेतला. परंतु सत्यकथनाच्या बाबतीत कोणाची भीडमुर्वत ठेवली नाही. समाजकण्टकांवर निष्ठूर प्रहार करताना 'मेणाहून मऊ' असलेले तुकाराम 'वज्राहून कठोर होत. *'देव्हाऱ्यावरि विंचू आला । देवपूजा नावडे त्याला ॥ तेथे पैजाराचे काम । अधमाशी तो अधम ॥'* इतका परखडपणा, कुठाराघात करण्याची निर्भय वृत्ती ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ यांच्या व्यक्तिमत्वात नव्हती. ज्ञानेश्वरांची मनोवृत्ती कारुण्यपूर्ण होती. सर्व संत मंडळींनी त्यांना 'माउली' म्हटले. सांप्रदायिकांच्या खोटेपणाचा धिक्कार नामदेवानेही केला आहे. परंतु त्यांचे 'बोलणे' तुकारामांइतके 'तीक्ष्ण हत्यार' बनत नाही. 'प्रेमसुखगोडी'चा आस्वाद घेणे आणि देणे ही नामदेवाची वृत्ती होती. नामदेवाच्या काव्यात संसृति टीका नाही. नामदेव समाज चिंतन क्वचितच करतो. *'संत भेटी प्रेम फावे । प्रेमे देवाशी भेटावे ॥'* ही नामदेवाची प्रकृती. तुकाराम समाजचिंतक होता. अंतर्मुख तसाच बहिर्मुख वृत्तीचा होता. *"भीत नाही आता आपुल्या मरणा । दुःखी होता जना न देखवे ॥"*

जनसामान्यांच्या दुःखाचे कारण दैन्य, दारिद्र्य, यातना, आपत्ती इत्यादीत होते, हे तर खरेच. परंतु सामाजिक दुष्ट प्रवृत्तीतही (Social evils) जनसामान्यांच्या दुःखाचे कारण होते. तुकारामाला हे प्रकर्षाने जाणवले होते. म्हणून दुष्ट प्रवृत्तींविरूद्ध त्याने संघर्ष केला. वर्णश्रेष्ठत्व, पांडित्य व कर्मठपणा ही बिरूदे धर्ममार्तण्डांनी मिरविली. त्यातूनच सामाजिक दुष्टप्रवृत्ती निर्माण झाल्या होत्या त्या दुष्ट प्रवृत्तींना तुकारामाने तोंड दिले. सालोमालो आणि मंबाजी सारख्या लोकांनी तुकारामाचा छळ केला. लौकिक जीवनाच्या दोन्ही बाजू तुकारामाने पाहिल्या होत्या, अनुभवल्या होत्या. शेतीवाडी, सावकारी, व्यापार उदीम हे तुकारामाचे पिढीजात व्यवसाय त्याच्या वाट्याला आले होते. महाजनकीचे अधिकार व उत्पन्न चालू होतेच. एका सुस्थितीत आयुष्याच्या पूर्वार्धात तुकारामाने सुखाचा संसार केला. वडिलांची इच्छा मानून वयाच्या तेराव्या वर्षी कुटुंबाची जबाबदारी स्वीकारली. घराण्याच्या नावलौकिकाला साजेल अशा नेटकेपणाने व नेकीने प्रपंच व व्यवसाय सांभाळला. परंतु सुखाचे पर्व संपले. एकामागून एक संकटे कोसळली. प्रापंचिक जीवनाची घडीच विसकटली. सतराव्या वर्षी आईबाप निवर्तले. थोड्याच दिवसात थोरली भावजय निधन पावली. संसार पाशातून मुक्त झालेला थोरला भाऊ (सावजी) तीर्थयात्रेला निघून गेला. व्यवसायात तूट येऊ लागली. प्रतिष्ठा धूळीस मिळाली. चरितार्थासाठी लोकांपुढे हात पसरण्याची वेळ आली.

जीवनातील निर्घृण सत्याचा रोकडा प्रत्यय तुकारामाला आला. दुष्काळाची भयानक आपत्ती कोसळली. पहिली बायको निवर्तली. मुलगा अन्नान्न करून निधन पावला. या सर्व उद्वेगजनक घटनांचा तुकारामाच्या मनावर खोल परिणाम झाला. जगाच्या नश्वरतेची आणि जीविताच्या क्षणभंगुरतेची साक्ष पटली. *'देह मृत्याचे भातुके ।'* देह हे मृत्यूचे भक्ष्य आहे, हे मनावर ठसले. *'सुख पाहता जवापाडे । दु:ख पर्वताएवढे'* हा प्रत्यक्ष अनुभव आला. *'दु:ख बांदवडी आहे हा संसार ।'* संसार हा दु:खाचा तुरूंग आहे, बंदिखाना आहे. ही जाणीव झाली. वैतागलेल्या मन:स्थितीत तुकारामाने प्रपंचाकडे पाठ फिरविली. आणि परमार्थाची वाटचाल सुरू केली. 'संन्याशाची पोरे' म्हणून ज्ञानेश्वरादी भावंडांचा छळ झाला. आणि काही काळ त्यांना बहिष्कृत जीवन जगावे लागले हे खरेच आहे. परंतु तुकारामाने सोसलेल्या यातना, सोसलेला छळ, तुकारामावर कोसळलेल्या आपत्तीं ज्ञानेश्वरादिकांच्या वाट्याला आल्या नव्हत्या. नामदेव - एकनाथांना त्याची झळ पोचली नव्हती. तुकारामाला एकाकीपणा जाणवला. तुकाराम उद्विग्न झाला. वैतागला. त्याचा जगावरचा आणि स्वत:वरचा विश्वास उडाला. कुणाचा तरी आधार हवा म्हणून तुकारामाने पांडुरंगावर आपला सर्व भार टाकला. आणि परमार्थाच्या क्षेत्रात त्याने पाऊल टाकले. पण म्हणूनच त्याचे डोळे उघडले आणि त्याला लौकिक जीवनातील वास्तवाचे यथार्थ दर्शन घडले. प्रापंचिक जीवनाची सुखाची एक बाजू अनुभवलेल्या तुकारामाला प्रापंचिक जीवनाची दुसरी बाजू दिसली. व्यक्तिगत जीवनातील आपत्ती, दु:ख, यातना, छळ भोगताना तुकारामाने *' मरणाही आधी राहिलो मरोनी । आपुले मरण पाहिले म्या डोळा ।'* हा अनुभव घेतला असेल. पण परमार्थाची वाटचाल करीत असताना तुकारामाला लौकिक जीवनातील सामाजिक वास्तवतेचेही भान झाले. खऱ्या नीतीमूल्यांचा ऱ्हास झालेला होता. दांभिक नीतिमूल्यांना प्रतिष्ठा लाभत होती. कर्मठांचे ढोंग माजले होते. शास्त्रीपंडितांच्या पोपटपंचीत खरा 'सत्यधर्म' लोप पावला होता. महानुभाव, नाथ, शाक्त इत्यादी धर्मपंथातील फोलपणा उघडपणे वावरत होता. तुकाराम माणसातून उठून परमार्थ मार्गी लागले. पण वास्तवाचे भान झाल्यावर त्यांना जाणवले की समाजातले भले भले लोक मनुष्यत्वाला मुकत आहेत. माणुसकीला पारखे होत आहेत. 'मनुष्यधर्मा'चाच लोप होत आहे.

*'अणुरणीया थोकडा । तुका आकाशा एवढा'* झाला. देहरूपी घटातील दीपज्योत - आत्मज्योत उजळली. तुकाराम आत्मोन्नतीच्या परमोच्च अवस्थेपर्यंत पोचला. आणि तरीही तुकाराम "उपकारापुरता उरला." कारण 'मनुष्यधर्माची प्रस्थापना करून त्याला समाजोद्धार करायचा होता. त्यासाठी 'भक्तिचे हत्यार' घेऊन सामाजिक दुष्ट प्रवृत्तीविरूद्ध संघर्ष करायला तुकाराम सिद्ध झाला. समाजाला अथवा समाजधारणेला आवश्यक अशा शाश्वत मूल्यांचा पाठपुरावा तुकारामांइतक्या तळमळीने फारच थोड्या सत्पुरूषांनी केला. नीतिमूल्यांचा लोप होत चालला म्हणून 'मनुष्यधर्म' लयाला चालला. नीती म्हणजे भक्ती अशी तुकारामाची धारणा होती. जपतप, यज्ञयाग, ध्यानधारणा, व्रतवैकल्ये, भजनपूजन यापेक्षाही भावशुद्धी, संयम, सत्यनिष्ठा, सदाचार, भूतदया, समबुद्धी, परोपकार यातच खरी ईश्वरोपासना आहे. अशी तुकारामांची धारणा झाली. आणि खरी ईश्वरोपासना करण्यासाठी अनुकूल परिस्थिती निर्माण करायची तर समाजजीवनातील सर्व क्षेत्रातील दांभिकतेवर प्रहार केले पाहिजेत आणि सामाजिक दुष्टप्रवृत्तींवर कठोरपणे, निष्ठुरपणे कुठाराघात केले पाहिजेत. म्हणून तुकारामाने झुंझार भक्तवीराची भूमिका घेतली.

*मऊ मेणाहून आम्ही विष्णुदास ।*
*कठिण वज्रास भेदू ऐसे ।।*
*मेले जित असो निजोनिया जागे ।*
*जो जो जें जें मागे तें ते देऊ ।।*
*भले तरी देऊ (गांडीची) कासेची लंगोटी ।*
*नाठाळाचे काठी ठेऊ माथा ।।*
*मायबापाहूनि बहु मायावंत ।*
*करू घातपात शत्रुहूनि ।।*

अशी झुंजार वृत्ती तुकारामाशिवाय अन्य संत कवीत क्वचितच आढळते. धर्मरक्षणाचे अथवा धर्मपालनाचे विधायक कार्य तुकारामाने केले. ते करताना धर्मविरोधी प्रवृत्तींचा वारंवार निषेधही केला. परंतु नुसता निषेध करून पुरेसे होत नाही. नुसते सर्वसामान्य सिद्धान्त सांगून चालत नाही. सत्प्रवृत्तींचा पुरस्कार करून भागत नाही. अमूर्त तत्वांचा जयजयकार सगळेच करतात. पण फारच थोडे त्या तत्वांना चिकटून रहातात. *'बोले तैसा चाले त्याची वंदीन पाउले । अंगे झाडीन अंगण । त्याचे दासत्व करीन ।।'* असे तुकारामाने म्हटले, पण दांभिक नीतिमूल्यांचे वर्चस्व असलेल्या आणि 'मनुष्यधर्म' लोप पावत असलेल्या समाजात तुकारामाला असे कोणी आढळत नव्हते. कारण असे कोणी असण्यासाठी अनुकूल परिस्थिती नव्हती. ती परिस्थिती तुकारामाला निर्माण करायची होती. सामान्यजन बाह्यरंगात फसतात. म्हणून त्यांना शुद्धाशुद्ध, खरेखोटे, बरेवाईट, सकस निकस यांची निवड करून द्यावी लागते. तुकारामाने झुंजारवृत्तीने दंभस्फोटाचे कार्य केले. *"उजळावया आलों वाटा । खराखोटा निवाडा ।। "* सर्व सामान्य जनांसाठी त्याने परखडपणे खऱ्याखोट्याचा निवाडा केला. हा निवाडा करताना त्यांनी कठोर वचने वापरलीत. 'तीक्ष्ण उत्तरे' दिलीत. त्याद्दल रोषही ओढवून घेतला. परंतु रोग बरा व्हायचा असेल तर वैद्याला 'कठिण काढा' द्यावाच लागतो. तुकारामांची भूमिका अशीच होती.

*नव्हो वैद्य आम्ही अर्थाचे भुकेले ।*
*भलते द्यावे पाले भलत्यासी ।।*
*कुपथ्य करूनि विटंबावे रोगी ।*
*काय हे सलगी भीड त्याची ।।*
*तुका म्हणे लासूं फासू देऊ डाव ।*
*सुखाचा उपाव पुढे आहे ।।*

*यासी कोणी म्हणे निंदेची उत्तरे ।*
*नागवला खरे तो चि एक ॥*
*आडवाटे जाता लावी नीट सोई ।*
*धर्मनीत ते ही ऐसी आहे ॥*
*नाइकता सुखे करावे ताडण ।*
*पाप नाही पुण्य असे फार ॥*

लोकहिताचा कळवळा होता म्हणूनच तुकाराम सतत असे ताडण करीत असत. जनहितासाठी असे ताडण करताना, धर्माचे पालन करताना समाजातील दुष्ट प्रवृत्ती, विघातक कल्पना, संस्था आणि संप्रदाय यांचा निःपात करणे आवश्यक होते. हे कार्य त्यांनी निष्ठुरपणे केले. त्यादृष्टीने तुकाराम हे एकाअर्थी बंडखोर संत कवी होते. तुकारामांच्या व्यक्तिमत्वाचा हा विशेष लक्षात घेतला म्हणजे कबीराची आठवण होते. *'डालीडाली में फिरू पातै पातै दुख ।'* असा सर्वत्र दुःखाचाच अनुभव घेतल्यानंतर धर्माच्या तटावर उभं राहून समाजातील सर्व विरोधी शक्तींना आणि शोषण शक्तींना कबीराने निर्धाराने आणि निर्भयतेने विरोध केला. जनजागरण केले. लोकसंघर्ष उभा केला. भक्तिला त्याने नवा अर्थ दिला. जीवनमूल्याविषयींची आस्था म्हणजे भक्ती. भक्ती म्हणजेच क्रांती. समाज एकसंध आहे. समाजात कोणत्याही प्रकारचे भेदभाव नाहीत. एक वर्ग - एक जाति असाच समाज आहे. पण समाजातील शोषक शक्तिभेद निर्माण करतात म्हणून समाजातल्या या विरोधी शक्तिंवर कबीराने कुठाराघात केले.

*सूरा के संग्राम में कायर का क्या काम?*
*कायर भागे पीठ दे सूरा करे संग्राम.*

असे सतत ललकारणारा कबीर जनसामान्यांमधला पुरुषार्थ जागा करीत होता. काव्य हे समाज परिवर्तनाचे साधन आहे अशी कबीराची धारणा होती. कबीर हा सिद्धानुवादक नव्हता. म्हणजे आधीच सिद्धरूपात असलेल्या भक्तितत्त्वज्ञानाचा अनुवाद करणारा नव्हता. कबीराचे तत्त्वज्ञान अनुभवसिद्ध होते. 'मैं कहता अखियनकी देखी' त्याच्याच अनुभवातून सिद्ध झालेले होते. सामान्य माणसाच्या भावनांना कबीराने वाणी प्रदान केली. ज्ञानेश्वर हे सिद्धानुवादक होते. भगवत्‌गीतेत सिद्ध रूपात असलेल्या तत्त्वज्ञानाचा त्यांनी अनुवाद केला. तुकारामाचे तत्त्वज्ञान त्याच्या अनुभवातून सिद्ध झालेले आहे. स्वतः शूद्र असल्यामुळें शूद्रातिशूद्रांच्या भावनांना त्याने वाचा फोडली. *'रात्रंदिन आम्हा युद्धाचा प्रसंग । अंतर्बाह्य जग आणि मन '* असं म्हणणाऱ्या तुकारामांचे जीवन कबीरा प्रमाणेच संघर्षमय होते. मनाची मोहवशता आणि लब्धप्रतिष्ठितांना विरोध या दोहोंशी कबीराप्रमाणेच तुकारामालाही झगडावे लागले. परंतु हा झगडा केवळ वैयक्तिक नव्हता. तर तत्कालिन शूद्रातिशूद्रांच्या जीवनाच्या पार्श्वभूमीवर हा झगडा होता. आणि तो शूद्रातिशूद्रांसाठी होता. समाज व्यवस्थेत सर्वसामान्य माणसाला भक्तिचा अधिकार नव्हता. कबीराने हा अधिकार प्रस्थापित केला. तुकारामानेही तेच केले.

*'विष्णुमय जग वैष्णवांचा धर्म । भेदाभेद भ्रम अमंगळ ॥*
*अइका जी तुम्ही भक्त भागवत । कराल ते हित सत्य करा ।*
*कोणाही जिवाचा न् घडो मत्सर । वर्म सर्वेश्वर पूजनाचे ॥*
*तुका म्हणे एका देहाचे अवयव । सुखदुःख जीव भोग जावे ॥*

तुकारामाने भेदभावांचा निषेध केला. आणि निर्वैरवृत्तीचा पुरस्कार केला. *'निर्वैर होणे साधनाचे मूळ ।'*

'परस्परात मैत्र जडो' असे पसायदान ज्ञानेश्वरांनी मागितले. परंतु निर्वैर वृत्ती जोपासल्याशिवाय मैत्रभाव निर्माणच होणार नाही अशी धारणा असल्यामुळे तुकाराम वैरवृत्तीच्या मुळावरच कुठाराघात घालतो. वैरवृत्तीचे मूळ भेदभावात आहे.

*'जो जे वांछिल तो ते लाहो । प्राणिजात ।'*

असे पसायदान ज्ञानेश्वर मागतात. पण तुकाराम आत्मविश्वासपूर्वक सांगतात *"जो जो जे जे मागे तें तें देऊ ।"* कारण ते देण्यासाठीच *"झुंजार (जुंझार) ते एक विष्णुदास जगी ।"* अशी तुकारामांची धारणा होती.

नामसंकीर्तनाचे माहात्म्य गाऊन टाळकुटेपणालाच तुकारामाने उत्तेजन दिले, हा समज तितकासा खरा नव्हे. कारण समाजधारणेला आवश्यक अशा शाश्वत नीतिमूल्यांचा पाठपुरावा तुकारामाने केला. धर्माभिमान, स्वामिनिष्ठा, धर्मनीती, चित्तशुद्धी, सदाचार, निर्वैर वृत्ती इत्यादी जीवनमूल्यांचे महत्त्व तुकारामाने सामान्यजनांना पटवून दिले. म्हणून शिवाजीच्या स्वराज्यसंस्थापनेच्या कार्यास उपयुक्त असा ध्येयनिष्ठ, सुसंघटित व कार्यक्षम बहुजनसमाज तयार झाला. तुकारामाने केवळ निवृत्तीचाच मार्ग दाखवला असे नाही. *'असाध्य ते साध्य करता सायास'* असे म्हणणारा तुकाराम परमार्थमार्गी असला तरी एकाअर्थी प्रयत्नवादी होता *'यत्न तो देव जाणावा'* असे समर्थन करणाऱ्या रामदासाच्या समकालातच तुकाराम अभ्यासाचे महत्त्व जनसामान्यांना पटवून देत होता. अभ्यासात प्रयत्न अनुस्युत आहेच.

असाध्य ते साध्य करिता सायास । कारण अभ्यास तुका म्हणे। असं म्हणणाऱ्या तुकारामाने सांगितले -

*ओले मूळ भेदी खडकाचे अंग । अभ्यासासी सांग कार्यसिद्धी॥*
*नव्हे ऐसे काही नाही अवघड । नाही कईवाड तोंच वरि ॥*
*तुका म्हणे कैसा वैसण्यासी ठाव । जठरी बाळा वाव एका एकी॥*

अभ्यासाने विषही सेवनी पडते, ओले मूळही खडक भेदू शकते. त्याप्रमाणे प्रयत्नाने कोणतीही असाध्य गोष्ट साध्य होऊ शकते. तुकारामाने स्वानुभवाने हे सांगितले की चातुर्वर्ण्यासह सर्व सामाजिक स्तरातील लोकांना भक्तिचा अधिकार आहे. सकल शास्त्रांचे हे सार आहे. वेदांचेही हेच रहस्य आहे.

*दास्य करील कळिकाळ बंद तुटेल मायाजाळ ।*
*होतील सकळ रिद्धीसिद्धी म्हणियासी ॥*
*सकळ शास्त्रांचे सार हे वेदाचे गव्हर ।*
*पाहता विचार हाचि करिती पुराणे ॥*
*ब्राह्मण क्षत्रिय वैश्य शूद्र चांडाळा आहे अधिकार ।*
*बाळे आदि करोनि वेश्या ही ॥*

*तुका म्हणे अनुभवे आम्ही पाडियले होय ।*
*आणीक ही देवै सुख घेती भावे ॥*

परंतु धर्ममार्तण्डांनी हा अधिकार नाकारला. तुकारामाने हा अधिकार तर मिळविलाच पण बहुजनसमाजालाही या अधिकाराचे धनी केले. म्हणून बहुजनसमाजाला तुकाराम अधिक जवळचा वाटतो. तुकारामांच्या व्यक्तिमत्त्वाचा विचार करताना ज्ञानेश्वर - नामदेव - एकनाथांपेक्षा कबीराची आठवण अधिक होते. त्याचप्रमाणे स्वामी विवेकानंदांचीही आठवण होते. जनसेवा हीच ईश्वरसेवा हा उपदेश तुकारामाने केला. तसाच विवेकानंदांनीही केला. विवेकानंद म्हणतात, "प्रत्येक स्त्रीपुरुषाकडे, प्रत्येक माणसाकडे देव समजून बघा. तुम्ही कोणालाही मदत करू शकत नाही. तुम्ही फक्त सेवा करू शकता. तुम्हाला सेवेचा अधिकार असेलच तर ईश्वराच्या लेकरांची सेवा करा. सेवा हीच पूजा आहे. रंजल्या गांजलेल्यांच्या रूपात देवच तुमच्या समोर येत असतो. ज्याची पूजा करावी, सेवा करावी असा एकमेव ईश्वर आहे, तो म्हणजे मनुष्य देहातील 'मानवी आत्मा' (human soul). सर्व प्राणिमात्र हेही देवाचे मंदिर आहे. परंतु मानवी देह हेच सर्वोच्च मंदिर आहे .... प्रतिदिन अधःपतित होत जाणाऱ्या कोट्यवधी लोकांच्या उद्धारासाठी तुमचे जीवन समर्पित करण्यासाठी प्रतिज्ञाबद्ध व्हा. रंजल्या गांजल्यांसाठी ज्याच्या अंतःकरणातून रक्त ठिबकते तोच खरा महात्मा."

'Him I Call a Mahatman whose heart bleeds for the poor.'

*तुकाराम महाराज नेमके हेच वेगळ्या शब्दात सांगतात*

*जे का रंजले गांजले । त्यांसि म्हणे जो आपुले ॥*
*तो चि साधु ओळखावा । देव तेथे चि जाणावा ॥*
*मृदु सबाह्य नवनीत । तैसे सज्जनांचे चित्त ॥*
*ज्यासि आपंगिता नाही । त्यासी धरी जो हृदयी ॥*
*दया करणे जे पुत्रासी । तेचि दासा आणि दासी ।*
*तुका म्हणे सांगू किती । तो चि भगवंताची मूर्ती ॥*

सांस्कृतिक दृष्ट्या आजही आपण भयावह परिस्थितीतून जात आहोत. मानवी जीवनमूल्यांचा ऱ्हास होत आहे, आणि सामाजिक दुष्टप्रवृत्तींचा प्रभाव वाढत आहे. त्यामुळे 'मनुष्यधर्म' लयाला जात आहे. नैतिकतेतच मनुष्यधर्माचे सारतत्त्व आहे. नैतिकतेतच मनुष्याची थोरवी आणि समाधान आहे. नीती म्हणजेच भक्ती अशी तुकारामाची धारणा होती. नैतिकतेची प्रस्थापना करणे हेच महत्त्वाचे जीवितकार्य असले पाहिजे. त्या जीवितकार्याची प्रेरणा तुकारामाच्या व्यक्तिमत्त्वात आणि काव्यकर्तृत्वात मिळू शकते.

**डॉ. सदा कऱ्हाडे**
३, चैतन्य १०९ जयप्रकाश नगर,
गोरेगाव (पूर्व). मुंबई ४०० ०६३.

# श्री तुकाराम महाराजांचा साधनामार्ग - एक चिंतन

डॉ. नंदिनी आनंद सावंत

"तुकिता तुळनेसि ब्रह्म तुकासि आले"

या तुकाराम महाराजांच्या आरतीमधील रामेश्वर भट्टांचे हे "शद्ब" ब्रह्मसाम्राज्य दर्शवणारे तुकाराम महाराजांबद्दलचे "शद्ब" आहेत! संतश्रेष्ठ तुकाराम महाराजांचा महान अधिकार काय आहे याची बरोबर जाणीव त्यावरून आपल्याला होते. तुकोबांचे अभंग ही प्रतिवेदवाणीच समजली गेली आहे. त्यांचे प्रचितीचे अभंग अवघा संसार सुखाचा करायला शिकवणारे आहेत. आज तीनशे वर्षाहून अधिक काळ तुकोबांचे अभंग काळनदीत न बुडता उलट आबालवृद्धांना भवनदी तरायला अत्यंत उपयोगी ठरले आहेत!

तुकोबांचेकडे आधुनिक फ्लॅट, तूप, साखर, बदाम अशी ऐहिक समृद्धी काही नसताही ते *"आनंदाचे कोटी साठविल्या आम्हा पोटी"* असं कसं म्हणू शकले? खरं तर महाराज मुळातच दैवीगुण संपन्न - स्वयंभू असूनही अभंगातून बद्ध, मुमुक्षु, साधक, सिद्धांचे वर्णन अचूक करतात. या कलियुगात, त्यांच्या अभंगांचा मागोवा घेत गेलेल्यांना त्यांचेप्रमाणे समाधान सद्गुरूकृपेने नक्की प्राप्त होऊ शकेल असा दिलासा वाटतो. कारण वारकरी संप्रदायाचे एक रिक्षावाले सततच्या नामस्मरणाने व तुकोबांच्या अभंग गायन - चिंतनाने नेहमीच अत्यंत समाधानात असलेले पाहिले. तुकोबांच्या एकेका अभंगामध्ये माणसाची वृत्ती संपूर्ण बदलावयास लावण्याचे सामर्थ्य पाहून शतशः नतमस्तक व्हावयास होते! बालसंस्कार केंद्रातील बालसाधक जेव्हा *"आम्ही बिघडलो तुम्ही बिघडांना"* हा अभंग आळवून म्हणत असतात तेव्हा तो ऐकून त्यांच्या पालकांनाही आपण घडावं असं वाटू लागतं यात काय नवल!

यंत्रयुगाच्या आजच्या धकाधकीच्या, ताणतणावाच्या काळात दैवीगुणसंपन्न, परमभागवत तुकोबांचे अभंग जगाला आत्मसुखाचे वरदान ठरणारे आहेत. आज लाखो वारकरी ज्ञानोबा - तुकाराम यांच्या पालख्या घेऊन पंढरीला ज्ञानोबा - तुकाराम, या नामघोषांत त्यांचे अभंग म्हणत नाचत आनंदाने वर्षानुवर्ष जात आहेत. या कारणामुळेच महान भागवत तुकोबांच्या अभंगगाथेतून त्यांनी आक्रमिलेल्या साधन मार्गाचा मागोवा आपणही घेत राहणे अत्यंत मोलाचे आहे असे वाटते.

तुकोबा संसारात बद्ध होऊन दुःखी झालेल्यांना भक्तीमार्ग दाखवताना म्हणतात,

*सुख नाहीं कोठें आलिया संसारी ।*
*वायां हांवभरी होऊं नका ॥१॥*
*दुःखबांदवडी आहे हा संसार ।*
*सुखाचा विचार नाहीं कोठे ॥२॥*
*चवदा कल्पेंवरी आयुष्य जयाला ।*
*परि तो राहिला ताटी खाली ॥३॥*
*तुका म्हणे वेगीं जाय सुटोनियां ।*
*धरूनि हृदयामाजी हरि ॥४॥*

साधना करून सुखरूप झालेले तुकोबा मग म्हणतात,

*संसार तो कोण देखे । आम्हा सखे हरिजन ॥१॥*
*काळ ब्रह्मानंदे सरे । आवडी उरे संचली ॥२॥*
*स्वप्नीं तो ही नाही चिंता । रात्री जातां दिवस ॥३॥*
*तुका म्हणे ब्रह्मरसें । होय सरिसें भोजन ॥४॥*

मुमुक्षुदशा दाखविणाऱ्या अभंगात महाराज म्हणतात,

*मन माझें चपळ न राहे निश्चळ ।*
*घडी एकी पळ स्थिर नाहीं ॥१॥*
*आतां तूं उदास नव्हें नारायणा ।*
*धांवें मज दीना गांजीयेले ॥२॥*
*धाव घाली पुढें इंद्रियांचे ओढी ।*
*केलें तडातोडी चित्त माझे ॥३॥*
*तुका म्हणजे माझा न चले सायास ।*
*राहिलों हे आस धरूनी तुझी ॥४॥*

आराध्य दैवत विठ्ठलाच्या व सद्गुरूंच्या कृपेने साधना मार्ग त्यांना मिळाल्यावर म्हणतात,

*बैसोनि निवांत शुद्ध करीं चित्त ।*
*तया सुखा अंतपार नाहीं ॥१॥*
*येऊनि अंतरीं राहील गोपाळ ।*
*सायासाचें फळ बैसलिया ॥२॥*
*राम कृष्ण हरि मुकुंद मुरारि ।*
*मंत्र हा उच्चारीं वेळोवेळां ॥३॥*
*तुका म्हणे ऐसी देईन मी दिव्य ।*
*जरी होइल भाव एकविध ॥४॥*

साधक काळात अहंकार जाता जात नाही म्हणून तुकोबा पांडुरंगाला आळवतात,

*मी एक जाणता । ऐसें वाटतसे चित्ता*
*राख राख गेले वायां । तुका म्हणे पंढरिराया ॥*

पुढे विदेहीपणात - देहभाव गेल्यावर ते सांगतात,

*असो ऐसा कोठे आठवही नाही ।*
*देहीच विदेही भोगू दशा ॥*

*सद्गुरूंचे उपकार तुकोबा विसरत नाहीत,*

*स्वामीचिया सत्ता । आधी वर्म येते हाता ।*

तसेच सद्गुरुकृपेने सगुण निर्गुण एकच, हे वर्म हाती आलेले तुकोबा म्हणतात,

*ज्योती प्रकाशली दीप्ती । मुळींची जे होती आच्छादिली ॥१॥*
*तेथींचा आनंद ब्रह्मांडी न माये । उपमेसी काये देऊं सुखा ।*
*भावाचे माथिले निर्गुण संचले । तें हें उभे केलें विटेवरी ॥२॥*

तुकोबांची सगुण आणि निर्गुण उपासना हातात हात घालून झालेली दिसते. ज्या अधिकाराचा माणूस समोर येईल त्या प्रमाणे उपासना अभंगातून स्फुरलेली दिसते. भक्तीच्या अधिकाऱ्यासाठी ते अभंगात म्हणतात,

*अवघ्या दशा येणे साधती । मुख्य उपासना सगुण भक्ती ।*

तुकोबा देहातच देव पहा म्हणून सांगतात,

*देही असोनिया देव । वृथा फिरतो निर्देव" ॥१॥*
*देव आहे अंतर्यामी । व्यर्थ हिंडे तीर्थग्रामी ॥२॥*
*तुका सांगे मूढजना । देही देव कां पहाना ॥३॥*

विठोबाचे मंदिरात तासनतास "राम कृष्ण हरि" ची धून गात असणारे तुकोबा, भंडाऱ्याचे डोंगरावर दिवस दिवस निर्गुणाच्या - 'सोऽहं' साधनेत - ध्यान साधनेत रंगलेले खालील अभंगातून उमजते.

*सहज मी आंधळा गा निजनिराकार पंथें ।*
*वृत्ति हे निवृत्ति जाली जन न दिसे तेथें ।*
*मी माजी हारपलें ठायीं जेथींचा तेथें ।*
*अदृश्य तें चि जालें कांहीं दृश्य जें होतें ॥१॥*

पुढे म्हणतात,

*उर्ध्वमुखे आळविला सोऽहं शब्दाचा नाद ।*
*अरूप जागविला दाता घेऊनि छंद ।*
*घेऊनि आला दान निजतत्व निजबोध ।*
*स्वरूपि मेळविलें नांव ठेविला भेद ॥३॥*

तुकोबांची नैषकर्मदशा खालील अभंगातून समजते,

*कांहींच मी नव्हें कोणिये गांवींचा ।*
*एकट ठायींचा ठायीं एक ॥१॥*
*नाही जात कोठें येत फिरोनिया ।*
*अवघें चि वांयांविण बोलें ॥२॥*
*नाही मज कोणी आपुलें दुसरे ॥*
*कोणाचा मी खरें कांहीं नव्हे ॥३॥*
*नाहीं आम्हा ज्यावें मरण लागत ।*
*आहों अखंडित जैसे तैसे ॥४॥*
*तुका म्हणे नावेरूप नाहीं आम्हा ।*
*वेगळा ह्या कर्मा अकर्मासी ॥५॥*

अखेर, तुकोबांच्या सहज स्थितीचे वर्णन करणारा अभंग,

*अंतरीचे ध्यान । मुख्य या नावे पूजन ॥१॥*
*उपाधि तें अवघें पाप । गोड निरसतां संकल्प ॥२॥*
*आज्ञा पाळावी हा धर्म । जाणते हो जाणावर्म ॥३॥*
*तुका म्हणे वृत्ति । अविट हे सहज स्थिति" ॥४॥*

तुकोबांची अभंग गंगा अथांग आहे. एक ओंजळभर अभंगरुपी गंगा प्राशनकरून तृप्त होण्याचा हा श्री सद्गुरु कृपेने केलेला अल्प प्रयत्न आहे. स्वानंदनिवासी श्री तुकाराममहाराजांच्याच पवित्र चरणी ही वाक्सुमनांजली समर्पित असो हीच नम्र प्रार्थना आहे.

**डॉ. नंदिनी आनंद सावंत**
८८३, गांधी बंगला,
पुणे ४.

---

## स्वर्गी जाण्या विमान आले

किितक संत ते चंदनापरी झिजून गेले ।
एकच परि जो लाडका प्रभूचा झाला ।
स्वर्गी जाण्या आले विमान त्याला ॥धृ.॥

संत थोर ते गेले होऊनि
केले कार्यहि महान त्यांनी
गंध दरवळे त्याचा अजुनी
जरि भक्तीने त्या सर्वांना देव पावला ॥१॥

हृदय ओतुनी गाथा रचिली
तीच बुडविण्या वेळा आली
त्या विरहाला सीमा कुठली ?
इंद्रायणिच्या रूपाने मग विठू धावला ॥२॥

अभंगगाथा तरलि जळावर
ठरली भक्ति सार्थ खरोखर
आनंदाचा तुकया गहिवर
डबडबलेल्या नयनामधुनी अश्रु ढळला ॥३॥

जणुं संताचा तो मुगुटमणी
प्रसन्न त्यावर देवहि म्हणुनी
बहुमान तया योग्य देवुनी
सन्मानाने यानामधुनी स्वर्गी नेला ॥४॥

**दि. आ. कुलकर्णी**



# तुकारामांचे अभंग : काव्यसौंदर्य आणि संगीतसौष्ठव

डॉ. मदन कुलकर्णी

संतश्रेष्ठ तुकाराम महाराज हे वारकरी पंथाचे मुकुटमणी शोभणारे संत. भागवत धर्ममंदिराचे कळस. तुकारामांची अभंगवाणी केवळ इंद्रायणीनेच तारली असे नाही, तर प्रत्यक्ष जनगंगेनेही तिला तारले. आपल्या अंतःकरणातील जिव्हाळ्याचा ठेवा वाटावा असे हे काव्य! तुकोबांनी आपल्या अभंगातून जे सूर आळविले ते मर्ढेकरांनी म्हटल्याप्रमाणे 'येऊ दे वाणीत माझ्या सूर तुझ्या आवडीचे' असेच आहेत. सर्वसामान्य वाचक-श्रोत्यालाही हे सूर ओळखीचे वाटतात. "तुकारामांचे वाङ्मय म्हणजे तीव्र संवेदनक्षम आणि चिंतनशील भक्ताच्या परमार्थसाधनेतील मौलिक व रसरशीत अनुभूतीचा अर्थ होय. त्यात ओतप्रोत भरून राहिलेल्या मानव्यातच तुकारामांचे मोठेपण आहे" (तुकाराम दर्शन - प्रस्तावना - पृ.२) असा अभिप्राय गं. बा. सरदारांनी व्यक्त केला आहे. तुकारामांचे अभंगकाव्य आध्यात्माच्या अंगाने तर श्रेष्ठ प्रतीचे आहेच, पण ते भक्तिगंगेच्या काठचे जसे तीर्थक्षेत्र आहे तसेच ते नितांत सुंदरही आहे. या काव्याची समृद्धता तुकारामांच्या शब्दांत सांगायची तर *"हरिनाम वेली पावली विस्तार । फळीं पुष्पीं भार वोल्हावली"* - असेच म्हणावे लागेल. या 'हरिनाम वेलींचे' सौंदर्य पाहणाऱ्याने मंत्रमुग्ध होऊन बघत राहावे असेच आहे.

तुकारामांच्या अभंग-काव्याचा विचार करताना त्यांच्या अभंगाचे विषय, वर्गीकरण आधारास घ्यावे लागतात. तुकारामांच्या कवितेत 'बाळक्रीडेचे अभंग' आढळतात ते त्यांच्या उपास्य दैवताशी संबंधित आहेत. संतश्रेष्ठ एकनाथांप्रमाणे त्यांनी लोकसंस्कृतीच्या उपासकांवर आधारीत काही अभंग लिहिलेले आहेत. विराण्या व गौळणीही या अभंगांमध्ये आढळतात. अन्य अभंगांमध्ये आत्मपर, प्रासंगिक, भक्तिपर, संतसंगविषयक, नामसंकीर्तनविषयक, तत्वज्ञानपर, जीवनधर्मपर, उपदेशपर, प्रबोधनपर, समाजदर्शनपर तसेच पांडुरंग व पंढरपूरविषयक अशा विविध विषयांवर ही रचना आढळते. परंतु या सर्वच अभंगरचनेमागे *'अनुभवें आलें अंगा । तें या जगा देतसें ।'* अशी भूमिका प्रामुख्याने दिसते.

यामुळेच या कवितेत *'मूळ ओल अंतरिची'* जाणवत रहाते. कारण तुकारामांची कविता स्फूर्तिनिष्ठ आहे. *"अंतरिचें धावें स्वभावें बाहेरी । धरितांही परी आवरेना"* ही या कवितेची निर्मितीप्रक्रिया आहे. पण तुकाराम आपल्या कवित्वाला ईश्वरी देणगी मानतात. *"करितो कवित्व म्हणाल हें कोणी । नव्हे माझी वाणी पदरींची । माझिये युक्तिचा नव्हे हा प्रकार । मज विश्वंभर बोलवितो."* तुकाराम असे म्हणत असले तरी त्यांना आपल्या काव्याच्या श्रेष्ठत्वाची जाणीव होती. त्यांची काव्यरचना एका विशिष्ट तंद्रीत झालेली आहे. ही तंद्री अर्थातच 'भक्तीची' तंद्री होती. अशा तंद्रीत लिहिलेले काव्य 'यशस्वी अभिव्यक्ती' ठरावे हे उघड आहे. हेच कारण आहे की ज्यामुळे तुकारामांची काव्यसंपदा उत्स्फूर्त, रमणीय, सहजसुंदर आणि मौलिक झालेली आहे. आपल्या ठिकाणी मुळातच काव्यशक्ती आहे याची त्यांना पुरेशी जाणीव होती. ते एके ठिकाणी म्हणतात -

*जोडिलीं अक्षरें । नव्हती बुद्धीची उत्तरें ।*
*नाहीं केली आटी । कांही मानदंभासाठीं ।*
*कोणी भाग्यवंत । तया करेल उचित ।*
*तुका म्हणे झरा । आहे मुळीचाचि खरा ।*

तुकारामांच्या शब्द रत्नांनी त्यांचे काव्यघर सजलेले होते पण याच शब्दांचा उपयोग त्यांनी शस्त्रासारखाही केलेला आहे.

तुकारामांचे कोणतेही अभंग असोत ते वाचकांच्या मनाचा पटकन ठाव घेतात. अगदी तुकारामांचे आत्मपर अभंगही याला अपवाद नाहीत. तुकारामांच्या जीवात्म्याची अंधारयात्रा जरा दीर्घच ठरली. पण यामुळेच त्यांच्या काव्यात एक पराकाष्ठेची आर्तता आढळते. या आर्ततेने त्यांचे अभंगकाव्य हृदयस्पर्शी झाले आहे. त्यांचे काव्य म्हणजे 'आपुलाचि संवाद आपणासी' असा प्रकार आहे. साधनेच्या कालखंडात तुकारामांना निसर्गसहवास सुखाचा वाटत होता. तो अभंग असा -

*वृक्षवल्ली आम्हां सोयरीं वनचरें । पक्षीही सुस्वरे आळवीती ।*
*येणें सुखे रुचे एकान्ताचा वास । नाही गुणदोष अंगा येत ।*
*आकाश मंडप पृथ्वी आसन । रमे तेथे मन क्रीडा करी । ....*

निसर्गाच्या सान्निध्यात हा जो तुकारामांचा स्वतःच्या मनाशी संवाद चाललेला होता तरी त्यांचे वैराग्य, साधना, मनाची तळमळ, तडफड, विठ्ठलाची प्रार्थना, देवावर रुसणे, देवाशी हट्ट धरणे, प्रेमकलह, एकेरीवर येणे इत्यादी साक्षात्कारपूर्वावस्थेतील अनुभवांचे चित्तवेधक आणि करुणेने आकंठ भरलेले अभंग मनोहर आहेत.

तुकारामांचे पंढरपूर - पांडुरंगविषयक अभंग म्हणजे भक्तिगंगेची भावधाराच आहे. भक्तिभावनेची अभिव्यक्ती करताना, नाममहिमा गातांना त्यांच्या शब्दगंगेला पूर येतो. पांडुरंगाचे हे तुकाराम वर्णित शब्दचित्र येथे उल्लेखनीय ठरावे –

*राजस सुकुमार मदनाचा पुतळा । रविशशिकला लोपलिया ।*
*कस्तुरीमळवट चंदनाची उटी । रुळे माळ कंठी वैजयंती ।*
*मुकूट कुंडलें श्रीमुख शोभलें । सुखाचें ओतलें सकळ ही ।*
*कासे सोनसळा पांघरे पाटोळा । घननीळ सांवळा बाईयांनो ।*

*सकळ ही तुम्ही व्हा गे एकीसव । तुका म्हणे जीवा धीर नाहीं ।।*

तुकारामांची शद्बरचना विषयानुरूप नवनवे रूप धारण करते. बोलीभाषेतील अनेक शद्ब चपखलपणे व समर्पकतेने वापरणे हे तुकारामांच्या प्रतिभासामर्थ्याचे दर्शन घडविणारे एक वैशिष्ट्यच आहे. 'मरणाचे स्मरण असावे' हे सांगताना तुकारामांची शद्बकळा कशी रूप घेते ते पहाण्यासारखे असते -

*उपजला प्राणी न राहे संसारी, बैसला सेजारी काळ उसां ।*
*पाहा तो उंदीर, घेउनि जाय बोका, तैसा काळ लोका नेत असे।*
*खाटीकाचें घरी अजापुत्र राहें, कसाबाची गाय वांचे कैसी । ...*

अशी एकामागे एक उदाहरणे देत, 'जाती ऐसी घडी पुन्हा नये' असा शीर्षस्थ विचार तुकाराम मांडतात तेव्हा शिक्षकाने सिद्धांत सांगताना सोपी उदाहरणे देत विषय समजावून सांगावा असाच प्रकार वाटतो.

तुकारामांच्या बहुतांश अभंगांमधून तुकारामांनी *"ओळवीन स्वरें। कैशा मधुरा उत्तरे"* ही स्वतःची प्रतिज्ञा पूर्ण केली आहे. *"कविते रसाळ वदविली वाणी"* हे उद्‌गार त्यांच्या भक्तिभावनेनेयुक्त काव्याला अनुलक्षूनच त्यांनी वापरलेले आहेत. या भावनेच्या सघनतेतच तुकारामांच्या कवितेचे फार मोठे सौंदर्य दडलेले आहे. मात्र 'नयो वाचे अनुचित वाणी' असे तुकाराम दुसरे 'एके ठिकाणी म्हणत असले तरी, प्रबोधनपर व उपदेशपर अभंगांमध्ये ही मर्यादा त्यांना पाळता आलेली आहे असे दिसत नाही. पण त्याकडे अपवाद म्हणूनच पाहिले पाहिजे.

तुकारामांच्या कवित्वकळेचे आणखी एक सौंदर्य-वैशिष्ट्य म्हणजे त्यांच्या अभंगाची चरण-रचना! त्यांची ही अभंगरचना म्हणजे त्यांच्याच शद्बांत 'शद्बांच्या ओवलेल्या रत्नमालिका आहेत.' ह्या केवळ सुंदर रत्नमण्यांच्या माळा नाहीत तर, 'अर्थांतरी असे अनुभवसेवन' अशी अर्थवत्ता धारण करणाऱ्या ह्या शद्बमालिका आहेत.

कोणत्याही कवीचा कल्पना विलास हा त्यांच्या काव्यरचनेतील अलंकार सृष्टीतून प्रत्ययास येत असतो. संत तुकारामांनी आपल्या भावाभिव्यक्तिला योग्य ठिकाणी अलंकारांचा साज चढविलेला आढळतो. अर्थात तुकारामांना येथे स्वतःचे कलाविदूपण दर्शवायचे नाही. त्यांच्या अलंकार योजनेमागे विश्वंभर पूजनाचे उद्दिष्ट आहे. *"शद्बांची रत्ने करूनी अलंकार । तेणे विश्वंभर पूजियेला"* या शद्बांत त्यांनी आपली ही भूमिका स्पष्ट नोंदविलेली आहे. परमेश्वर भेटीची आपली तळमळ व्यक्त करताना, *"पौर्णिमेचा चंद्र चकोरा जीवन' ; दिवाळीच्या मुळी लेकी आसावली' ; 'भूकेलिया बाळा अतिशोक करी'* असे दृष्टांत किंवा "संतांनी सरता केलो तैसेपरी" हे स्पष्ट करताना *'चंदनी ते बोरी व्यापियेली' हा दिलेला दृष्टांत;* किंवा *"अभ्यासासी सांग कार्यसिद्धी"* हे पटवून देताना *'ओले मूळ खडकाचे अंग'* हा दिलेला दृष्टांत विलोभनीय आहे. अधिकारी, ज्ञानी लोकच कौशल्याने चांगल्या गोष्टी ओळखून त्याचा उपभोग घेतात' हे सांगताना जे दृष्टांत दिलेत त्यातून तुकारामांचे काव्यप्रतिभासामर्थ्य जाणवते. तुकाराम दृष्टांतांची मालिका कशी सादर करतात हे लक्षणीय ठरते.

*मृगाचिये अंगीं कस्तुरींचा वास । असे ज्याचा त्यास नव्हे ठावा।।*
*भाग्यवंत घेती वेचूनियां मोलें । भारवाही मेले वाहता ओझें ।।*
*चंद्रामृते तृप्ति पारणे चकोरा । भ्रमरासी चारा सुगंधाचा ।।*
*अधिकारी येथें घेती हातवटी । परीवंता दृष्टी रत्न जैसे ।।*
*तुका म्हणे काय आंधळीया हातीं । दिले जैसें मोती वायां जाय।।*

तुकाराम अनेकदा विविध दृष्टांत योजतात तेव्हा ते कधी पारंपारिक तर कधी संपूर्णतया नवीन असतात. जुन्या दृष्टांताचा वापर करताना तुकाराम त्यातील उपमांना नवीन संदर्भ देतात. सूर्य, चंद्र, कमलिनी, कोकिळा, वसंत ऋतू या शद्बांमागे पारंपारिक संकेत उभे आहेत. पण याच संकेताचे उपयोजन तुकारामांनी देव-भक्त संदर्भात केले तेव्हा त्यात नावीन्य आले. उदा. 'भ्रमर-काष्टाचा' दृष्टांत ज्ञानेश्वर, एकनाथ यांनीही योजलेला होता. भक्ताच्या प्रेमासाठी निर्गुण निराकार परमेश्वर, कसा सगुण - साकार होता हे सांगताना तुकारामांनी हाच दृष्टांत असा योजला –

*नाही काष्ठाचा गुमान, गोवी भ्रमरा सुमन*
*प्रेम प्रीतीचे बांधलें, तें न सुटे काही केलें*

दुष्टांना आपले हित कशात आहे हे कळत नाही' हे स्पष्ट करून सांगताना शंखाचा दृष्टांत दिलेला आहे. समुद्रासारखा बाप, चंद्रासारखा भाऊ, लक्ष्मीसारखी बहीण आणि प्रत्यक्ष द्वारकेचा प्रभू त्याचा मेहुणा! परंतु एवढे असून शंख दारोदार भीक मागत फिरतो. 'डोळ्यावर अभ्रपटल आले की आत्मवस्तु विपरित भासते' हे सांगताना तुकारामांनी 'भोंवळ', 'शशी', 'हाक' असे दृष्टांत दिलेले आहेतः

तुकारामांचे दृष्टांत म्हणजे त्यांच्या प्रतिभेचा कल्पनाविलासच असतो पण त्याचा आधार त्यांची सूक्ष्म निरीक्षण शक्ती असते. 'नास्तिक-अभाविक लोकांना भक्तीचा उपदेश करू नये हे सांगताना तुकाराम आपला विचार कसा काव्यात्मकरीत्या पटवून देतात ते पहाण्यासारखे आहे.

*कावळ्याच्या गळां मुक्ताफळ माळा, तरी काय त्याला भूषण शोभे।*
*गजालागी केला कस्तुरीचा लेप, तिचे तो स्वरूप काय जाणे।*
*बकापुढे सांगे भावार्थवचन, वाउगाचि सीण होय त्यासी ।*
*तुका म्हणे तैसे अभाविक जन, त्यासी वांयां सीण करूं नये ।....*

तुकारामांनी आपल्या मनातील आतुरता व देवविषयक निष्ठा व्यक्त करताना एका गुर्जर स्त्रीचा फार चांगला दृष्टांत दिलेला आहे. तो असा –

*दुडीवर दुडी, चाले मोकळी गुजरी,*
*ध्यान लागो ऐसें हरी, तुझे चरणी तैशापारी,*
*आवंतण्याची आस, जैसी लागे दुर्बळास,*
*लोभ्या कळांतराची आस, बोटें मोजी दिवस मास*
*तुका म्हणे पंढरीनाथा, मजला आणिक नको व्यथा ....*

तुकारामांनी येथे एक दृगनुभव व्यक्त केलेला आहे. यातून एक

चित्रच डोळ्यासमोर उभे रहाते. हे चित्र आणि *'ध्यान लागो ऐसे हरी'* हा त्याचा उत्तरार्ध नेमक्या गोष्टीकडे अंगुलीनिर्देश करतो. पण पुढे नवे नवे दृष्टांत येतात. दृष्टांताची अशी 'दुडीवर दुडी' त्यांच्या अभंगकाव्यात वाचकांना वारंवार भेटते. असो.

तुकारामांच्या या दृष्टांत देण्याच्या काव्यप्रवृत्तीमागे आपला विषय संबंधिताना कळावा हाच उद्देश होता व त्याची त्यांना स्वतःला जाणीव होती.

'सात्विक प्रेमळ दृष्टांताच्या मते । बोलिलो बहुत कळावया ।।
असे एके ठिकाणी त्यांनी नमूद केलेले आहे.

तुकारामांनी दृष्टांत जसे योजले तसे काही ठिकाणी रूपकांचीही योजना केली. तुकारामांचा पुढील रूपकात्मक अभंग लक्षणीय आहे.

*पैल घरीं जाली चोरी, देहा करी बोंब.*
*हाबा हाबा करिसी काये, फिराऊनि नेय्यां वायें.*
*सांडुनियां शुद्धी, निजलासी गेली बुद्धी.*
*चोरीं तुझा काढला बूर, वेगळें भावा घातलें दूर.*
*भलतियासी देसी वाव, लाहेसि तूं एवढा ठाव.*
*तुका म्हणे अझुनि तरी, उरले ते जतन करीं.*

तुकारामांच्या अभंगांतून अनेक ठिकाणी विचारानुभव प्रकट झाले आहेत.एखाद्या विचारानुभवाचे प्रकटीकरण करताना ते नाविन्यपूर्ण रूपक वापरतात. पैल घरी झाली चोरी' हे तसे गद्यप्राय वाटणारे रूपक असले तरी त्यातील आध्यात्मिक अर्थ मनाला मोहविणारा आहे.

*आथिल्या भ्रतारें काम नव्हे पुरा, म्हणोनि व्यभिचारा टेकलिये.*
*रात्रंदिस मज पाहिजे जवळी, क्षण त्या निराळी न गमे घडी.*
*नाम गोष्टी माझी सोय सांडा आतां, रातले अनंता तुका म्हणे.*

तुकारामांनी व्यभिचारिणेचे रूपक घेऊन आपल्या मनातील आर्त भावना व्यक्त केलेल्या आहेत. संसारात इच्छापूर्ती नाही परंतु अनन्त परपुरूषाजवळ सर्व इच्छा पूर्ण होतात. लौकिक संसारापेक्षा अलौकिक संसाराचा बळकट आधार आपल्याला लाभला या भावार्थासाठी हे व्यभिचारिणीचे रूपक तुकारामांनी योजले आहे. व्यभिचारिणाच्या रूपकातून देव - भक्तांमधील अव्यभिचारिणी भक्ती प्रकट करण्यासाठी ही रूपक योजना तुकारामांनी केलेली आहे. तुकारामांची रूपके अशी अर्थपूर्ण असतात.

तुकारामांची एक अन्योक्तीही मोठी सुंदर आहे. ती अशी —

*माकडें मुठीं धरिलें फुटाणे, गुंतलें ते नेणें हात तेथें.*
*काय तो तयाचा लेखावा अन्याय, हित नेणे काय आपुलें तें.*
*शुकें नळिकेशीं गोवियेले पाय, विसरोनि जाय पक्ष दोन्ही.*
*तुका म्हणे एक ऐसे पशुजीव, न चले उपाव कांहीं तेथें.*

माकड फुटाण्याच्या लोभामुळे मडक्यात अडकलेला हात बाहेर काढत नाही; या मूर्खपणाचा फायदा पारधी घेतो. पोपट आसक्तीमुळे नळी सोडत नाही; व दूर उडून जात नाही. आपल्याला पंख आहेत याचा त्याला विसर पडतो. अशा पशुपक्ष्यांप्रमाणे या संसारात अनेक जीव असे आहेत की, मूर्खपणा व आसक्ती या कारणांनी एखाद्या क्षुद्र गोष्टीमुळे एखादी हितकारक गोष्ट ते विसरून जातात. असार अशा संसारापेक्षा काही एक श्रेष्ठ गोष्ट म्हणजे, परब्रह्म. त्याचा त्यांना विसर पडतो. संसारातच ते मग्न असतात. वास्तविक या पाशातून सुटण्याचे बळ मनुष्याजवळ आहे; मोहामुळे म्हणा किंवा अज्ञानामुळे म्हणा तो या पाशातून सुटत नाही. तुकारामांची ही अन्योक्ती सुंदर आहे.

तुकारामांनी काही मोजकेच अलंकार वापरले असले तरी त्यामुळेच त्यांच्या अभंगवाणीला एक प्रकारचे सौंदर्य प्राप्त झाले आहे.

तुकारामांच्या अभंगवाणीचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे त्यांची सुभाषित स्वरूपी पदरचना होय. विषय कोणताही असो तुकाराम त्यांना सैद्धांतिक स्वरूप देतात. लौकिक, पारलौकिक अशा कोणत्याही विषयासंबंधीचे विचार तुकोबांच्या अभंगवाणीत भावरूप होऊन अवतरतात हे खरे असले तरी त्याची मांडणी सैद्धांतिक - सूत्रबद्ध स्वरूपाची असते. त्यामुळे या सिद्धांतस्वरूप अभंग-चरणांना सुभाषितांचा दर्जा प्राप्त झालेला आहे. व्यवहारातील सुभाषिते त्यांनी काव्यात योजलेली नाहीत, तर आपल्या काव्यातून नवीन सुभाषिते लिहून ती त्यांनी लोकप्रिय केलीत. तुकारामांच्या अभंगातील केवळ शेवटचा चरण सुभाषितस्वरूपी आणि अवतरणक्षम असतो असे नाही तर त्यांच्या अभंगातील इतर चरणही अवतरणक्षम असतात आणि ही अवतरणे म्हणजे आशयाच्या घटकांचे सार असतात. शिवाय प्रतिपाद्य-विषयाशी ते एकजीव झालेले असतात. या अवतरणक्षम रचनेत पुष्कळदा दृष्टांतांची पखरण असते.

"महापुरे झाडे जाती । तेथे लव्हाळे वाचती"
"श्वान शीघ्रकोपी । आपणा घातकर पापी"
"तांबियाचे नाणे । न चले खऱ्या मोले"

असे कितीतरी दृष्टांत अवतरणक्षम आहेत पण ते दृष्टांत नाहीत तर अनुभवक्षेत्रातील सत्ये असतात. अलंकाररूपी सुभाषिते असतात. ती आत्माक्षरी विचारात्मक असून त्यांची भाषा भावनेची असते. यात व्यावहारिक सुभाषिते असतात तशी अध्यात्मप्रवण वृत्तीचीही सुभाषिते असतात. ती भावसत्ये असतात. 'वाऊग्ये निमित्त बोलु नये' ही धारणाही या अवतरणक्षम रचनेमागे असावी. सार्वकालीन सिद्धांत बांधता येणे ही जर महाकवीची कसोटी असेल तर तुकाराम हे या अर्थाने महाकवी ठरतात. त्यांच्या अवतरणक्षम रचनेमुळे त्यांच्या काव्यरचनांना भावसौंदर्य आणि विचारसौंदर्य अशा दोन मिती लाभल्या हे आपल्याला सहज लक्षात येते.

तुकारामांच्या काव्यातील सौंदर्य प्रतीतीचे कारण, त्यांच्या काव्यामागे असलेले आत्मनिष्ठेचे बळ होय. या आत्मनिष्ठेमुळेच या काव्याला काव्यात्मता आणि प्रत्ययकारित्व आलेले आहे. अनुभवांचे प्रांजलपण जसे सतत जाणवत रहाते तसेच त्यांच्या व्यक्तित्वाशी कवित्वाची असलेली एकरूपता जाणवताना दिसते. तुकारामांच्या अभंगवाणीचे सौंदर्य आणि सामर्थ्य त्यातील आशयाप्रमाणेच त्यांच्या लोकभाषाशैलीत आहे. वा. लं. कुलकर्णी यांनी एके ठिकाणी म्हटल्याप्रमाणे ही भाषा, "लोकभाषेची बोलण्याची पद्धती, त्या भाषेचे वाक्‌संप्रदाय, म्हणी, त्या भाषेतील बोलके

शद्ब घेऊन, ती बोलत असते." यामुळेच तुकारामांची कविता लोकवाङ्मयाच्या पातळीवर गेलेली आढळते. लोकगीताची अक्षुण्ण धारा जशी वहात असते त्याचप्रमाणे तुकोबांची काव्यधारा आजही टिकून राहिली आहे, याचे कारण सरलोक्ती हा तिचा गुण आहे, तर लोकव्यवहारातील प्रतिमासृष्टी हा त्यांच्या काव्यसौंदर्यात भर घालणारा व त्यांच्या अभंगवाणीला लोकवाणी करणारा घटक ठरला आहे. याच कारणाने गं. बा. सरदार यांनी, "कौटुंबिक प्रतिमानांतून तुकारामांच्या गृहजीवनातील जिव्हाळ्याची, व्यावसायिक प्रतिमानांतून कणखर निर्भयतेची ओळख पटते," असा निष्कर्ष काढला आहे तर डॉ. वि. भि. कोलते यांनी तुकारामांच्या कवितेतून सामाजिक, मानसिक प्रतिमासृष्टी कशी आढळते हे सांगताना, 'छिन्नी आणि मूर्ती', 'चंदन आणि त्याचा सुगंध , 'सोने आणि त्याचा कस', 'पाईक आणि त्याचे धैर्य', 'हिरा आणि ऐरण', 'खरे आणि खोटे माप' इत्यादीद्वारे नैतिक अढळपणा, आत्मनिष्ठा म्हणून वापरल्याचे म्हटले आहे.'

तुकारामांच्या अभंगांच्या काव्यसौंदर्याप्रमाणेच या अभंगांना एक विशिष्ट प्रकारचे संगीत सौंदर्यही आहे. खरे पहाता तुकारामांची शद्बकळा अनेकदा ध्वन्यानुकारी असते. अर्थवलये निर्माण करणारा शद्बक्रम हे तुकारामांच्या रचनेचे वैशिष्ट्य आहे. संगीताचा गुण घेऊनच ही शद्बकळा अविष्कृत होते. उदा. *'तूं माऊलीहून मायाळ । चंद्राहूनी शीतळ । पाणियाहूनि पातळ । कल्लोळ प्रेमाचा'* अशासारखा अभंग अंतःकरण द्रववून टाकणारा वाटतो याचे कारण त्यांची शद्बकळाच आहे. ही शद्बकळा पुन्हा लयबद्धही असते. दुसरे म्हणजे तुकारामांची रचना भावगीतस्वरूपी आहे. थोडे वेगळ्या शद्बांत आपण त्यांना 'भक्तिगीत' म्हणू शकतो. प्रासादिकता, आकारिक सौंदर्य, गेयतेची अपेक्षा अशी भावगीताची सारी लक्षणे तुकारामांच्या अभंगात आढळतात. ही भावोत्कटता अनन्यसाधारण आहे. ना.ग. जोशी म्हणतात त्याप्रमाणे, 'अन्य कवींप्रमाणे त्यांचे काव्य आध्यात्मिक रूपकांनी विद्ध झालेले नाही.' त्यांच्या आत्मपर अभंगातील कारुण्य व आर्तता ही त्यांच्या भक्तिगीताची वैशिष्ट्ये होत. या संदर्भात तुकारामांच्या काव्याविषयी कोलते लिहितात,

"या काव्यरचनेच्या मुळाशी तुकारामांचे उत्कट भावजीवन होते; व्यापक अनुभूती होती. त्यांचे हृदय खऱ्या कवीचे होते. ते अत्यंत बुद्धिमान पण कमालीचे सहृदय होते. त्यामुळे स्वतःच्या आणि समाजाच्या जीवनातील लहानमोठ्या प्रसंगांचा चटका त्यांच्या अंतःकरणाला तेव्हाच जाऊन पोचे आणि तो काव्यरूपाने बाहेर पडे." हेच एक महत्त्वाचे कारण आहे की ज्यामुळे त्यांच्या अभंगांमध्ये उत्कटता व गेयता हे गुण आपोआपच आलेले दिसतात. यातूनच त्यांच्या काव्यात सांगीतिक सौंदर्य निर्माण झालेले दिसते. त्यांच्या काव्यरचनेला तशीही संगीताची अपेक्षा असतेच. *'घेई घेई माझे वाचे । गोड नाम विठोबाचे';*

*'सुंदर तें ध्यान उभें विटेवरी । कर कटावरी ठेवुनिया'*
*'राजस सुकुमार मदनाचा पुतळा । रविशशिकळा लोपलिया'*
*'जन विजन झाले आम्हां । विठ्ठलनामाप्रमाणे'*

*'जे का रंजले गांजले'* असे कितीतरी अभंग गेयतेची अपेक्षा बाळगणारे आहेत. या अभंगाची शद्बकळा मृदु-मुलायम आणि संगीतानुकूल आहे. संगीताच्या जोडीने त्यांची गोडी अधिकच वाढते. अगदी साक्षात्काराची अनुभूती व्यक्त करणारा *'अणुरणीयां थोकडा । तुका आकाशाएवढा'* हा अभंग निर्मितीच्या पातळीवर सोबत संगीत घेऊनच जन्माला आला आहे असे वाटते. वास्तविक 'अणोरणियान्महतो महियान' या कठोपनिषदातील सूत्राचा अनुवादच तुकाराम येथे करीत आहेत असे वाटते, पण तरी त्यात काव्यमयता आलेली आहे. तुकारामांचे बहुतांश अभंग 'भजन' म्हणूनच आकारास आलेले असावेत. कीर्तनातही त्यांचा तेव्हा आणि नंतरही उपयोग होत राहिला. अनेक अभंग तर समयस्फूर्तही असण्याची शक्यता आहे. संगीतानुकूल गेय रचना हे त्यांच्या अभंगकाव्याचे वैशिष्ट्य आहे. चांगला संगीतकार आणि गायक तुकारामांच्या कोणत्याही अभंगाचे 'सोने' करू शकतो, हे उपरोल्लिखित उल्लेखांवरून दिसून येईल.

तुकारामांच्या 'गौळणी' ही मनोज्ञ आहेत. उदा.

*हरी तुझी कांती ते सावळी । मी रे गोरी चाफेकळी ।*
*तुझ्या दर्शने होइन काळी । मग हें वाळी जनमज ।*

यातील अनुप्रासामुळे एक 'लय' निर्माण होते. थोडा रचनेचा ठसकाही त्यात आहे. लोकसंस्कृतीच्या उपासकांवरील तुकोबांचे अभंग लोकशैलीच्या अंगाने गाता येतात. गीतरचना पद्धतीनेच ही सारी बांधणी तुकारामांकडून कळत नकळत झालेली आहे.

तुकारामांच्या या भक्तिकाव्यातील संगीतसौंदर्य दुहेरी स्वरूपाचे आहे. वर वर्णिल्याप्रमाणे त्यांच्या अभंगापैकी काही अभंग सौकुमार्य, माधुर्य गुणांनी युक्त आहेत तर काही अभंग सरळ, सडेतोड, फटकळ आणि कठोर शद्बकळा असणारे दिसतात. सांगीतिकदृष्ट्या अशा अभंगांचे स्वरूप 'अनवट' जाणवते. आज JAZZ संगीताचा गुण त्यात जाणवतो. तर काही अभंग केवळ कीर्तनात निवेदनाचा भाग म्हणून उपयुक्त ठरावेत असे आहेत.

तुकाराम *'संत सुमनें उत्तरें । मृदु रसाळ मधुरें ।*, असे काव्य श्रेष्ठ दर्जाचे मानतात. हे गुण त्यांच्याही काही अभंगांमधून आढळतात. *'आपुलिया मना उपजे आनंद । तैसे करू छंद'* असे तुकाराम एके ठिकाणी म्हणतात. आपल्या आनंदाची अभिव्यक्ती करण्यासाठी त्यांनी संगीतमय अभंग छंद लिहिले. केवळ संगीतमयच नव्हे तर वाङ्मयीन गुणवैशिष्ट्यांनी युक्त असे कलासुंदर अभंग मराठी रसिकांना दिले हे रसिकांचे दैवभाग्यच म्हटले पाहिजे.

**डॉ. मदन कुलकर्णी**
'गझल', ४, प्रशांतनगर, अजनी चौक,
वर्धा मार्ग, नागपूर ४४० ०१५.



# आनंदाच्या कोटी साठविल्या आम्हां पोटी

*विजय कुलकर्णी*

आनंद, सुख कोणाला नको आहे? आज विज्ञानयुगामध्ये सारे जग भौतिक गोष्टींच्या मागे धावत आहे. सर्वजण आपापल्या समजुतीनुसार योग्य साधने मिळविण्याचा प्रयत्न करीत आहेत. सर्वांना असे वाटते की, एवढी मनोकामना पूर्ण झाली की सुखी होईन, आनंदी होईन. तेवढं ईप्सित पूर्ण झालं की क्षणभर मी सुखी आहे असं वाटतं आणि पुढच्याच क्षणी दुसरी मनोकामना पुढे उभी राहते. असं सुख आणि आपण पाठशिवणीचा खेळ खेळत असतो. खरा आनंद सापडतच नाही.

*म्हणे देखिलं मृगजळ। तेथे धावते बरळ।*
*जळ नव्हे मिथ्या केवळ।*

अशी आपली स्थिती होते. आपण घर बांधतो, गाडी घेतो, टि.व्ही., फ्रिज घेतो. उदंड कष्ट करून धन, संपत्ती गोळा करतो. सारी सुखाची साधनं आपल्याजवळ असतात. पण त्यांत सुख कुठे हरवून जातं! ते आपलं आपल्यालाच कळेनासे होते. जसं क्षितीज लांब डोंगरावर कुठेतरी टेकल्यासारखं दिसतं तिथे जावं तर ते दुसऱ्या डोंगरावर टेकल्यासारखं दिसतं. तसच काहीसं आपलं सर्वाच होतं. ज्याला हे कळतं तो शाश्वत सुखाच्या म्हणजेच परमार्थमार्गाच्या वाटचालीला लागतो. ज्याला कळत नाही त्याच्या वाट्याला,

*सुख सुख म्हणता हे । दुःख दाटुनी आले ।*

असे होते.

सगळे संत कसे आनंदी, सुखी. कोणी विवेकानंद कोणी ब्रह्मानंद, कोणी स्वरूपानंद.

*ते आनंदाचे अनुकार । सुखाचे अंकुर ।*
*महाबोधे विहार । केले जैसे ॥*

जणु आनंदच त्यांच्या रूपांनी साकार झाला आहे. त्यांचं जीवन म्हणजे जणु आनंदाच्या डोही आनंद तरंग असं असतं. त्यांना होणारा आनंद आंत चित्तामध्यें मावत नाही. मग तो उचंबळून बाहेर येतो. त्यांच्या स्पर्शातून, पाहण्यातून, बोलण्यातून आणि प्रत्येक कृतीतून सर्वसामान्यांनासुद्धा तो जाणवतो, दृग्गोचर होतो. साखर जशी सर्वांगानी गोड, नवनीत जसं सर्वांगानी मृदु, दीप जसा सर्वांगानी दैदीप्यमान तसं त्यांचं जीवन होतं. संताचं जीवन असं नित्यसुखी, आनंदी, आणि आपण कसे तर सदा सर्वकाळ दुःखी, कष्टी, जणु जगातलं सारं दुःख आपल्याच वाट्याला आले आहे. असं का व्हावं? थोडसं अंतर्मुख झालं, थोडसं संतांच्या जीवनाचं अवलोकन केलं तरी आपली चूक लक्षात येते. साधुसंत ज्या मार्गावरून गेले, म्हणजे ज्या पद्धतीने त्यांनी साधना केली, जीवन जगण्याचा, जीवनाकडे पाहण्याचा जो दृष्टीकोन त्यांनी अंगिकारला तो त्यांनी चोखाळलेला मार्ग सोडून आपण जीवन जगत आहोत.

संतश्रेष्ठ तुकाराम महाराजांचं जीवनकार्यच मुळी आपल्या सारख्या वाट चुकलेल्या वाटसरूंना या परमार्थ मार्गावर आणण्याचं आहे. त्यांच्या एका अभंगात ते स्पष्ट सांगतात.

*"आम्ही वैकुंठवासी । आलो याचि कारणासी ।*
*बोलीले जे ऋषि । साच भावे वर्ताविया ॥*
*झाडू संतांचे मार्ग । आडरानी भरले जग ।*
*उच्छिष्टांचा भाग । शेष उरला तो सेवूं ॥*
*अर्थे लोपली पुराणे । नाश केला शब्दज्ञानें ।*
*विषयलोभी मनें । साधने बुडविली ॥*
*पिटू भक्तिचा डांगोरा । कळीकाळासी दरारा ।*
*तुका म्हणे करा । जयजयकार आनंदे ॥ तु. गा. २२२*

तुकोबा परमार्थाचं नेमकं मर्म, त्यांच्या जीवींच गुज सांगत आहेत. ते म्हणतात 'तुम्हांला जर तुमचा आनंद पाहिजे असेल तर साधुसंतांच्या मार्गाने वाटचाल करा. त्यांचा मार्ग म्हणजे अज्ञानाकडून ज्ञानाकडे, मृत्यूकडून अमृततत्वाकडे, अंधःकारातून प्रकाशाकडे जाण्याचा मार्ग. या मार्गात भक्ति असते, ध्यान असतं, विहीत कर्माचरण असतं, मुख्य म्हणजे या सर्वांना ज्ञानाची जोड असते. स्वानुभवाची जोड असते. त्यांच्या मार्गात साधना असते, विवेक असतो, निर्व्याज प्रेम असतं, शांती असते, त्यांच्या विश्वात जग हे उपभोग्य साधन नसतं तर परमेश्वराचं सगुण रुपडं असतं. या मार्गावरून गेलं तर कुठे अडकून पडत नाही. थेट परमेश्वर प्राप्तीच्या दिशेनी वाटचाल होते. त्यापेक्षा वेगळा मार्ग म्हणून कोणी सांगत असेल त्याच्या नादी लागू नका. आडरानामध्ये जाऊ नका. पूर्वी ऋषि-मुनींनी परमार्थ मार्ग दाखवून दिलेला आहे. संतश्रेष्ठ तुकाराम महाराज, ज्ञानेश्वर महाराज, समर्थ रामदास स्वामी, एकनाथ महाराज आदी संतांनी त्या रस्त्याचं रूपांतर पक्की डांबरी सडक करण्यामध्ये केलं आहे.

*श्रुती - स्मृतिंचे अर्थ । स्वये आपणची होऊनी मूर्त ।*
*अनुष्ठोनी जगा देत । वडील जे ।*

असे आपले परमार्थमार्गीचे पथदर्शी, अशी ही संत मंडळी, त्यांना मार्ग तयार करण्याचे कष्ट होते. आपण फक्त चालायचे आहे. सुखानी त्यांच्या कृपा छत्राखाली छायेत.

*आनंदाच्या पाऊली । येईजे जयाचिया भेटी ।*

इतकं सोप आहे.

संतांनी दाखविलेला मार्ग चुकला, आडरानात गेलो तर मात्र

कोणाच्या तावडीत सापडू ते सांगता येत नाही. काम, क्रोध, लोभ, मोह, दंभ, अहंकार आपली साधना संपविण्यासाठी यातल एक देखिल पुरे आहे.

*काम, क्रोध आड ठाकले पर्वत । राहिला अनंत पैलीकडे ।*
*नुलंघवे मज न सापडे वाट । दुस्तर हा घाट वैरीयांचा ।*

अशी आपली स्थिती होईल. म्हणून आपण कशालाही बळी न पडता संतश्रेष्ठ तुकोबा ज्या मार्गानी साधना करून संतश्रेष्ठ झाले. त्या मार्गानी जाण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

तुकाराम महाराजांचे जीवन देखील आपल्यासारखे सुखदुःखमिश्रीतच होते. आपल्या सारखं संसारी जीवन ते देखील जगत होते. तथापि केवळ संसार करून जीवन धन्य होत नाही. त्यानी काही शाश्वत सुख प्राप्त होत नाही. जीवनाची धन्यता ईश्वर प्राप्तीमध्ये आहे. आत्मदर्शनात आहे. हे त्यांना उमगत होतं त्यामुळेच त्यांच्या जीवनात भक्तिचा, प्रेमाचा सुगंध दरवळू लागला. ते एकांतात 'वृक्षवल्ली आम्हा सोयरी वनचरी' अशा वातावरणात गावापासून लांब भंडारा डोंगरावर जाऊ लागले. तासन - तास आत्मचिंतनात तल्लीन होऊ लागले. आपण भंडारा डोंगरावर नेमकी कोणती साधना करत होतो. याबाबत एका अभंगात ते म्हणतात.

*ऊर्ध्वमुखे आळविला सोऽहं शब्दाचा नाद ।*
*अरूप जागविला दाता घेऊनिया छंद ॥*
*घेऊनी आला दान निजतत्व निजबोध ।*
*स्वरुपीं मेळविले नांव ठेवियला भेद ॥*

खरंतर ही सोऽहं साधना, ही नाथसंप्रदायाची साधना. आपल्याला वाटतं तुकोबा भक्तिमार्गीचे अध्वर्यु, भक्ताचार्य. आपण संतांना देखील आपल्यासारखं मर्यादित करण्याचा प्रयत्न करतो. कोणाला भक्तिमार्गी म्हणतो, कोणाला योगमार्गी तर कोणाला ज्ञानमार्गी. आणि त्यांना पुढे करून आपली एकांगी साधना मोठ्या अभिमानाने गौरवतो.

*आपुलाली उपासना । अभिमान लागला जना ।*

पण त्यामुळे संत थोडेच त्यामध्ये जखडले जाणार ! मोठ्या प्रेमानी हरिपाठ सांगणारे ज्ञानोबा गीतेच्या सहाव्या अध्यायाचं विवरण करतांना त्यांचा योगसाधनेचा अनुभव कथन करून जातात. त्यांचा बोध, ज्ञान तर ज्ञानेश्वरीच्या ओवींओवींतून प्रकट होते. ज्यांच्यापासून सारे योगमार्गाचे संप्रदाय सुरू होतात, ते आदिनाथ कंठामध्ये रामनाम मोठ्या दिमाखाने भूषवतात. तसंच मोठ्या प्रेमानी विठ्ठल - विठ्ठल म्हणत, पंढरीची वारी नियमीतपणे करणारे तुकोबा सोऽहं ध्यानसाधनादेखील तितक्याच आवडीनी करत असत. तुकोबा म्हणजे भक्ति - योग - ज्ञान यांचा त्रिवेणी संगमच होते.

सोऽहं ध्यान नेमकं कसं करावं, कुठे करावं, त्यामुळे काय होतं. याचं सविस्तर वर्णन त्यांच्या अभंगात दिसतं. ते म्हणतात "ध्यान एकांतात करावं." एकांतात हा सोऽहं शब्दाचा नाद, ऊर्ध्व मुखानी कसा करावा ते तुकोबांसारख्या कोणा अधिकारी व्यक्तीकडून समजून घेणंच अधिक हितकर होईल. सांप्रत पुण्यासारख्या शहरामध्ये सद्गुरू परमहंस स्वामी माधवनाथ महाराज हे अधिकारी सत्पुरुष सोऽहं ध्यानसाधना सांगून अनेक मुमुक्षू साधकांचे जीवन धन्य करीत आहेत. ऊर्ध्व मुखांनी सोऽहंचा, नाद आळवून मग त्रिकुट शिखरी म्हणजे दोन भुवयांच्या मध्ये साक्षी भावानी पहात राहायचे. तिथे आयत म्हणजे सहज स्वरुपाचं, मोक्षाचं दान मिळते. तिथे पहाता - पहाता सर्व वृत्ती - निवृत्त होतात. साक्षीत्वानी सर्व वृत्ती मावळतात. मी - माझे हे सर्व भाव हरपून जातात.

*साक्षीत्वे वृत्ति माघारी वळे । तव दृष्य असताच वोसरे ।*

सगळ्या बाजुनी मनाला आवरावं तेव्हा कुठे ते स्वाधीन होत असतं. स्वाधीन झालेले मन सहजच अंतर्मुख होतं. स्वरूपाच्या ठिकाणी स्थिर होतं. मी कोण यांचा बोध होतो. आत्मदर्शन होते.

ऐहिक दृष्टींनी तुकोबांची स्थिती खूपच हालाखीची होती. अशा परिस्थितीत कोणीही व्यक्ती हताश होऊन नशिबाला दोष देत बसली असती. पण तुकोबा मात्र ऐहिक सुखाला नाशिवंत सुख म्हणतात.

*कोण पाहे सुखा नाशीवंताकडे । तृष्णेचे बापुडे नव्हे आम्ही ।*

त्यांनी शिवाजी महाराजांनी पाठविलेला मौल्यवान वस्त्र अलंकाराचा नजराणा देखील परत पाठविला. ज्यांचे हात अभय, सेवा, दान यांनी विभूषित झालेले होते, ज्यांचे कान हरिनामांनी तृप्त झालेले होते, ज्यांचे डोळे विठ्ठल रूप पाहून संतोष पावले होते –

*सर्व सुख ल्यालो सर्व अलंकार । आनंदे निर्भर डुल्लतसे ।*

असे तुकोबा थोडेच वस्त्र - अलंकारांना मोहीत होणार होते?

*किंबहूना सोये । जीव आत्मयाची लाहे ।*
*तव जे होये । तया नांव सुख ।*

जीव जेव्हा आत्मरुप होतो तेव्हाच तो खरा सुखी होतो., खरा आनंदी होतो. तुकोबांना असे खरे आत्मसुख प्राप्त झालं होते. त्यामुळेच जीवनात कोणत्याही परिस्थितीत, सुखदुःखाच्या कोणत्याही प्रसंगात त्यांचा आनंद अबाधित, अखंड राहू शकला.

असं म्हणतात की तरूण, बलवान, विद्वान, संपत्तीयुक्त साऱ्या पृथ्वीचा स्वामी, त्याचा जो आनंद तो एक मानुष - आनंद, त्याच्या शंभर पट गंधर्वांचा एक आनंद, त्याच्या शंभर पट देवांचा एक आनंद, त्याच्या शंभर पट इंद्राचा एक आनंद, त्याच्या शंभर पट तो ब्रह्मानंद.

अनंत सुखाच्या डोही । एक सरा तळुची घेतला जिही ।
मग स्थिरावोनि तेही । तेचि जाहले ।

असे आत्मानंद, ब्रह्मानंद प्राप्त झालेले तुकोबा त्यांचा अनुभव सांगत आहेत.

*"आनंदाच्या कोटी । साठविल्या आम्हां पोटी ।"*

अशा या आनंदरुप झालेल्या संतसम्राटाच्या चरणीं कोटी कोटी प्रणाम ।

**विजय रामचंद्र कुलकर्णी**
ब/ १३, प्रेमानंद सोसायटी,
राजेंद्र नगर, पुणे - ३०.

# श्री तुकोबांचा पंचम पुरुषार्थ(भक्तिप्रेमसुख)

डॉ. शंकर चतुरकर.

*भक्तिप्रेमसुख नेणवे आणिका । पंडित वाचकां ज्ञानियांसी ॥१॥*
*आत्मनिष्ठ जरी झाले जीवन्मुक्त । तरी भक्ति सुख दुर्लभ त्यां ॥२॥*
*तुका म्हणे कृपा करील नारायण । तरिच हे वर्म पडे ठायीं ॥३॥*

शास्त्रात चार पुरुषार्थ दर्शविले आहेत. 'धर्म, अर्थ, काम, मोक्ष'. या चतुर्विध पुरुषार्थातील मोक्ष हाच परमपुरुषार्थ असून शाश्वत - नित्य आहे, तर इतर तीन पुरुषार्थ अनित्य आहेत. ती, सुखरूप नसून सुखाची साधने मात्र आहेत. परंतु आत्मतत्त्व किंवा मोक्ष साक्षात् सुखस्वरूप - आनंदमय आहे. यास्तव परमपुरुषार्थ म्हणजे मोक्ष.

या चार पुरुषार्थाप्रमाणेच प्रेमभक्ति हा पंचम पुरुषार्थ आहे. ही ज्ञानोत्तर अवस्था असून अभेदभक्तीचा परमानंद तो हाच होय. आणि भगवंताला प्रिय असलेला हा पंचमपुरुषार्थ तुकोबांनी साध्य केला. *'तुका म्हणे मुगुटमणि हरि भक्ति । आणिक विश्रांती आरतिया ॥'* हरिप्राप्तीच्या सर्व साधनात हरिभक्ति मुगुटमणि असून त्यायोगे परमभक्ताला याच देही मोक्षरूपी विश्रांती अर्थात जीवनमुक्ती मिळते. म्हणूनच तुकोबा खरे पुरुषार्थी आहेत. भक्तिप्रेमसुखापुढे त्यांनी मोक्षाचा अव्हेर केला.

*मोक्ष तुमचा देवा । तुम्ही दुर्लभ तो ठेवा ॥*
*मज भक्तीची आवडी । नाही अंतरी ते गोडी ॥*

आपल्या भक्तिप्रेमानंदापुढे त्यांनी ब्रह्मज्ञान, आत्मस्थिती, सायुज्यमुक्ती, मोक्षसुख सारे कांही तुच्छ मानले.

*नको ब्रह्मज्ञान आत्मस्थितीभाव । मी भक्त तूं देव ऐसें करी ॥*
*मुक्तिवरील भक्ति जाण । अखंड मुखी नारायण ।*
*मग देव भक्त झाला । तुका तुकी उतरला ॥*

मुक्तीनंतर पंचमपुरुषार्थरुप भक्ती कोणती असेल, तर ती मुखाने अविरत नारायणाचे चिंतन करणे होय. तुकोबा स्वतः ग्वाही देतात कीं, या पंचमपुरुषार्थरूप नामभक्तीने नामधारक भक्तच स्वयं देवरूप होतो.

**प्रेमभक्ती म्हणजे काय –**

*सदा नामघोष करूं हरिकथा । तेणे सदा चित्ता समाधान ॥१॥*
*सर्व सुख ल्यालों सर्व अलंकार । आनंदे निर्भर डुल्लतसे ॥२॥*
*असों ऐसा कोठे आठवचि नाही । देहींच विदेही भोगूं दशा ॥३॥*
*तुका म्हणे आम्ही झालों अग्निरूप । लागों नेदुं पापपुण्य अंगा ॥४॥*

कर्म आणि ज्ञान हे दोन्ही भक्तियोगाचे दोन कक्ष आहेत. कर्मयोग हे साध्य नसून 'सर्वात्मक ईश्वराची पूजा' करून त्याला प्रसन्न करून घेण्याचे एक महत्वपूर्ण साधन आहे. ईश्वरार्पण बुद्धीने केलेले कर्म हीच परमेश्वराची परमभक्ती होय. जीवाच्या अज्ञानग्रंथी तुटून मोक्ष प्राप्ती व्हावी हे मानवी जीवनाचे परमसाध्य मानले आहे. व तो मोक्ष ज्ञानाने प्राप्त होतो. 'ज्ञानप्राप्ती होण्यापूर्वी केलेली भक्ती, ज्ञानप्राप्तीसाठी केली जाते, परंतु ज्ञान प्राप्त झाल्यावर मोक्षलाभ झाला तरी त्याची चाड न धरिता केवळ भक्तिसुखासाठी जी केली जाते ती प्रेमभक्ती होय. तिलाच 'ज्ञानोत्तर प्रेमभक्ति' म्हणतात. ती साधनरूप न राहता तिला साध्याचे रूप प्राप्त होते.

भक्ती म्हणजे परमात्म्याच्या ठिकाणी नितांत प्रेम. "सात्वास्मिन परमप्रेमरूपा" (ना.भ.सू.२) किंवा *"द्रुतस्य भगवध्दर्माद्धारावाहिकतांगता। सर्वेशे मनसो वृत्तिर्भक्तिरित्यभिधीयते"* (भक्तिरसायन -मधुसूदन सरस्वती) ते प्रेम कसे? तर त्या प्रेमाची व्याख्या मात्र करता येत नाही. श्री तुकोबा म्हणतात, *'प्रेम नये सांगतां बोलतां दावितां । अनुभवे चित्ता चित्त जाणे॥'* हे प्रेम अनिर्वचनीय आहे. पण ते कसे? *"मूकास्वादनवत्॥"* (ना.भ.सू. ५२) ते मुक्याने साखर खाल्ल्याप्रमाणे आहे. तुकोबा म्हणतात, *'गोड लागे परी सांगताचि नये ॥'* अशा या प्रेमाला म्हणतात भक्ती. *'पढियंते सदा तेचि । परी भोगी नवी नवी रूचि ॥'* (अमृ १०/३३) भक्ताच्या अंतःकरणात वाहणारा हा प्रेमाचा झरा सदैव अखंड वाहतो. "गंगेचे उदक समुद्रात मिळून जसे आणखी एकसारखे मिळतच असते, त्याचप्रमाणे भक्ताच्या अंतःकरणातील वृत्ती एकसारख्या भगवंताला विषय करणाऱ्या उठतात." (ज्ञाने १२/३६-३८) *'विषय तो त्यांचा जाला नारायण।'* तुकोबांचा स्वानुभव हाच आहे.

"परमात्मा शुद्धस्वरूप परमप्रेमास्पद आहे म्हणून ज्ञानाने अविद्या कार्य व देहादिकांचा अभिमान सोडून, ज्ञान गिळोनि गावा गोविंद गा ॥' या तुकोबांच्या वचनोक्तीप्रमाणे बिंबभूत परमात्म्याशी एकरूप होऊन विश्वात्मक परमात्म्याचे ठिकाणी सतत प्रेमवृत्तीने अनुसंधान करणे हीच ज्ञानोत्तर प्रेमभक्ती होय." *'अहो ऐक्याचे मुद्दल न ढळे । आणि साजिरेपणाचा लाभ मिळे । तरी स्वतरंगाची मुकुळें । तुरंबु का पाणी ॥'* (अमृ १/५९) श्री एकनाथ महाराजांनी या प्रेमभक्तीचे सुंदर वर्णन केले आहे.

*गंगा सागरीं मीनली मिळे । मीनली त्याचीच त्यावरी लोळे ।*
*तैसा भक्त मिळोनि भावबळे । माझे भक्तीचे सोहळे मजमाजी भोगी ॥*
*कां सत्रावीचे गोडपण । चंद्र जाणे आपुले आपण ।*
*तेवीं मी होऊनि माझे भजन । भक्त सज्ञान जाणती ॥*
*चहु पुरूषार्थांतें त्यागिती । चारी मुक्ती उपेक्षिती ।*
*पंचम पुरूषार्थाची भक्ती । मज पढयती उद्धवा ॥*
(ए. भा. २४/३६६, ६८,७२)

ब्रह्मरसाचे रसपान करून तृप्त झालेले तुकोबाराय आपल्या प्रेम भक्तीच्या अवस्थेचे वर्णन करतात -

*विषयी विसर पडीला निःशेष । अंगी ब्रह्मरस ठसावला ॥१॥*

*माझी मन झाली अनावर वाचा । छंद या नामाचा घेतलासे ॥२॥*

*तुका म्हणे गंगासागर संगमी । अवध्या झाल्या उर्मी एकमय ॥३॥*

'धगधगीत वैराग्याच्या आधारे विषयांचा पूर्णत्वाने विसर पडला. अंतःकरणात ज्ञानाने ठसावलेला ब्रह्मरस अनुभवाला आला. नामामृत प्राशनाने पुष्ट झालेली वाणी अनावर होऊन तिला हरिनामाचा निरंतर छंद लागला. मी ब्रह्मनंदाने अंतर्बाह्य नाहून निघालो, तरी पण हरिभक्तीचा प्रेमानंद अधिकाधिक मिळावा या हव्यासाने माझी वाणी हरिनामचिंतनात निमग्न झाली आहे. गंगासागर संगमी उसळणाऱ्या लाटा एकरूप झालेल्या असतात, त्याप्रमाणे भक्तीप्रेमाने मी ब्रह्मानंदात तद्रुप झालो.' म्हणजेच देव-भक्ताचा आनंद एकरूप झाला.

**प्रेमभक्तीचे स्वरूप**

*'अनिर्वचनीयं प्रेमस्वरूपम् ।* अशा गोड शब्दात नारदांनी या अनन्यभक्तीचे वर्णन केले आहे. प्रेम आणि परमात्मा यांच्यात अंतर नाही. *'शान्तिरूपात्परमात्मानन्दरूपाश्च ॥'* (ना.भ.सू. ५१,६०) ही प्रेमभक्ती, शांतिरूप व परमानन्द स्वरूप आहे. शांती आणि परमानन्द हे साक्षात् परमात्म्याचेच स्वरूप आहे. देवामुळे भक्ताला भक्तीप्रेमसुख भोगता येते व भक्तामुळे देवाला आनंद सोहळा भोगता येतो. एकाच ब्रह्माच्या ठिकाणी देव आणि भक्त ही दोन रूपें मायोपाधिक स्वामीसेवक कल्पितपणा निर्माण झाला. तुकोबाराय म्हणतात -

*एका अंगी दोन्ही झाली हें निर्माण । देवभक्त पण स्वामी सेवा ॥*

*तुका म्हणे येथे नाही भिन्नभाव । भक्त तोचि देव, देव भक्त ॥*

*भक्ति प्रेम गोडी बैसली जिव्हारी । आनंद अंतरी येणे झाला ॥*

*पुसिले पडळ तिमिर विठ्ठलें । जगचि भरले ब्रह्मानंदे ॥*

*'ज्ञेयं ज्ञाननिष्ठा आर्तादित्रयापेक्षया परा चतुर्थी - भक्तिरित्युक्ता। अतो ज्ञाननिष्ठालक्षणया भक्त्या'* ज्ञानाची परानिष्ठा हीच ज्ञानोत्तरभक्ती, असे आचार्यांनी गीताभाष्यात दाखविले आहे. जीव - आत्मा भेदाची जाणीव निःशेष संपल्यावर अभेदज्ञान प्रकाशाने, भेदरूपी अज्ञान अंधःकार नाहीसा होऊन पुढे अभेदज्ञानाचीही जाणीव जेव्हा भक्तीने नाहीशी होते; या सहजावस्थेत ज्ञान व भक्ती यांचा भेद रहात नाही. ते शुद्ध ज्ञान व ती परमभक्ती दोन्हीही शुद्ध ब्रह्मस्वरूपाच्या ठिकाणीच होतात. प्रेमभक्तिमध्ये ज्ञानाचा परिपाक झाला तरच त्या ज्ञानाला मूल्य आहे. *'ज्ञान सकळामाजी आहे हे साच । भक्तीविण तेंच ब्रह्म नव्हे ॥'* तुकोबांनी हे आपल्या अनुभवाने सिद्ध करून दाखविले. 'शुद्ध तुपांत तळलेली जिलेबी चांगली खरी, पण साखरेच्या पाकात घोळल्यावर तिला अजून विशेष गोडी येते.' त्याप्रमाणे स्वरूपज्ञान चांगले पण ते प्रेमभक्तीच्या पाकांत घोळलेले असेल तर त्याला पूर्ण म्हणता येईल.

*गोड नावें क्षीर । परी साखरेचा धीर ॥*

*तैसे जाणा ब्रह्मज्ञान । बापुडें ते भक्तीवीण ॥*

*तुका म्हणे तारा । नांव तंबुऱ्याच्या सारा ॥*

*'आनंदो विषयानुभवो नित्यवं चेति सान्ति धर्मा ब्रह्मणोऽ पृथक्त्वेपि पृथगिवावभासन्ते ॥'* (पंचपादिपाकार ३/१९) ज्ञानात ज्ञानवृत्तीच्या प्राधान्यामुळे आनंदांशाचा अभिभव असतो, त्यामुळे व्युत्थानकाळात प्रारब्धभोग मुळीच भासू न देण्याचे सामर्थ्य नाही. पण भक्तीत आनंदांशाचे प्राधान्य होत असल्यामुळे व्युत्थानात भक्ताला प्रारब्ध मुळीच भासू न देण्याच्या बाबतीत ती जास्त सामर्थ्यवान आहे. म्हणून योग्याला समाधीत जे सुख, तेच सुख अखंडपणे भक्तांना व्युत्थानांत देखील असते. भक्ताला जीवन्मुक्ती व विदेहमुक्ती यात मुळीच फरक नसतो.

*न किंचित्साधवो धीरा भक्ता ह्येकांतिनो मम ।*

*वांछन्त्यपि मया दत्तं कैवल्यमपुनर्भवम् ॥*(श्रीमत् भाग. ११/२०/३४)

ज्ञानोत्तर भक्तीला परम निरतिशय पुरुषार्थ म्हटले आहे. भक्तिरसास्वादन करणाऱ्या परमभक्ताला, सर्वश्रेष्ठ असा पंचमपुरुषार्थ प्राप्त करून घेतलेल्या ज्ञानीभक्ताला, चौथा पुरुषार्थ 'कैवल्यमोक्ष' गौण वाटतो. *"जयां भक्तीची येतुली प्राप्ती । जे कैवल्यातें परीते सर म्हणती । जयांचिये लीलेमाजी नीति । जियाली दिसे ॥* (ज्ञाने. ९/१९२) भक्तीप्रेम सुखाच्या अलभ्य लाभापुढे तुकोबांनासुद्धा कैवल्यमोक्ष नको आहे.

*मोक्षपद तुच्छ केलें याकारणें । आम्हां जन्म घेणे युगायुगी ॥१॥*

*विटे ऐसें सुख नव्हे भक्तिरस । पुढतापुढती आस सेवावे हें ॥२॥*

मोक्षासारख्या अनुपमसुखापेक्षाही तुकोबांना सगुणप्रेमसुख श्रेष्ठ आहे. निर्गुण साक्षात्कारी आत्मनिष्ठ जीवन्मुक्तांना हे श्रीहरिचे सगुण भक्तिप्रेम दुर्लभ आहे. ज्ञानाच्या निर्गुणानंदात व्यक्त स्वरूपाचा सगुण प्रेमानंद नाही, परंतु भक्ताच्या अभिनव सगुण परमानंदात निर्गुणानंदाचा आस्वाद आहे. *'तुका म्हणे मोक्ष भक्ताचिया मना । नये हा वासना त्याची करी ॥'* ज्ञानोत्तर सगुणभक्तीशिवाय आत्मनिष्ठ जीवन्मुक्तांना व्युत्थानात भक्तिप्रेमाचा अनुभव येत नाही.

ज्ञानोत्तर ज्ञानीभक्तांची सगुण प्रेमभक्ती लोप पावत नाही, ती नित्य नूतन असते. किंबहुना प्रेमभक्ती करणे हा त्यांचा स्थायी स्वभावच होऊन जातो. ब्रह्मसंपन्न झाल्यावरही तुकोबा म्हणतात –

*परम अमृतें रसना ओलावली । मनाची राहिली वृत्ति पायी ॥१॥*

*सकळही तेथें वोळली मंगळे । वृष्टि केली जळें आनंदाच्या ॥२॥*

*सकळ इंद्रियें झाली ब्रह्मरूप । ओतले स्वरूप माजी तया ॥३॥*

*तुका म्हणे जेथे वसे भक्तराव । तेथें नांदे देव संदेह नाही ॥४॥*

'हरिनाम परमामृताने रसना ओलावली आणि मनोवृत्ती हरीपायी स्थिर झाली. त्या महान भगवत्भक्ताजवळ विश्वातील सर्व मांगल्ये येतात आणि त्यावेदर नित्यानंदरूपी जलाचा वर्षाव करतात.' तुकोबा म्हणतात, 'अजून काय सांगू? सर्व इंद्रिये ब्रह्मरूप झाली, जणु काय त्या इंद्रियात ब्रह्मस्वरूप ओतले आहे. देव भक्त वेगळा भाव नाही.' *'धालो सुखें ढेकर देऊं । उमटे जेवूं तोवरी । क्रिडा करूं निरंजनी । न पुरे धणी हरीसवें॥*

तुकोबा म्हणतात, भक्तिज्ञानामृत सेवनाने आम्ही आकंठ तृप्त झालो, आता परमसुखाने ढेकर देऊ, आणि या तृप्ततेची लक्षणें देहावर उमटतील तोपर्यंत या ज्ञानामृताचे सेवन करू. मुक्तिवरील भक्ती करणे हा तुकोबारायांचा मुक्त स्वभाव होता. परमभक्ताच्या पराभक्तितील या सहजावस्थेला श्रुतीने परागति म्हटले आहे. . . . . . . . . . . . .

"... *सा काष्ठा सा परा गतिः॥*" (कठ. उप. १/३/ ११)

सर्वात्मस्वरूप परब्रह्माचा साक्षात्कार झाल्यानंतरही तुकोबांनी भावपूर्ण अंतःकरणाने पांडुरंगाच्या सगुणस्वरूपाची एकनिष्ठ प्रेमभक्ती केली. आणि या ज्ञानोत्तर सगुणप्रेमभक्तिचा आपुल्या माहेरी परत जाईपर्यंत प्रचारही केला. आत्मस्वरूपाचे प्रत्यक्ष - अपरोक्षज्ञान झाल्यामुळे ते जीवन्मुक्त झालेच होते. पण ज्ञानस्वरूप - परब्रह्मरूप कैवल्यमुक्ती त्यांना नको होती. त्यांना पाहिजे होती मुक्तीनंतरही प्रेमभक्ती.

*हाचि परमानंद आळंगीन बाही । क्षेम देतां ठायी द्वैत तुटे ॥१॥*
*तुका म्हणे तो हा विठ्ठलचि व्हावा । आणिक या जीवा चाड नाही ॥२॥*

या आनंदमय अवस्थेतच मुक्तीसह भक्तीचे सुख आहे. अंतःकरणात देवाचे निर्गुण म्हणून अव्यक्त रूप आणि बाहेर दृष्टीपुढे सगुण म्हणजे व्यक्त स्वरूप पाहून तुकोबांचे चित्त प्रेमभक्तिसुखाने वेडावून गेले होते. अद्वैतात प्रेमभक्ती म्हणजे परमप्रेमास्पद आत्मरूपाने आपलेच आपण प्रेम करणे. ज्ञानोत्तर प्रेमभक्ती ती हीच होय. या अद्वैत-भक्तीच्या आनंदाने अंतर्बाह्य एकरूप झालेल्या भक्ताच्या सहजस्थितीचे वर्णन करतांना श्री तुकोबा म्हणतात -

*गोडपणे जैसा गुळ । तैसा देव झाला सकळ ॥१॥*
*आतां भजी कवणे परी । देव सबाह्य अंतरी ॥२॥*
*उदका वेगळा । नव्हे तरंग निराळा ॥३॥*
*हेम अलंकार नामी । तुका म्हणे तैसे आम्ही ॥४॥*

ज्ञानोत्तर भक्ती करणारा भक्त हा सर्वश्रेष्ठ भक्त आहे. कारण तो ईश्वराला स्वतःसह सर्वस्व समर्पण केल्यामुळें ईश्वरच होतो. ही भक्तीची पराकाष्ठाच आहे. या ज्ञानभक्तांची भक्तीनिष्ठा म्हणजे ते भक्तीसुखापुढे 'मोक्षालाही पलिकडे हो' असे म्हणतात.

*जया भक्तीची येतुली प्रीति । जें कैवल्यातें परौते सर म्हणती ।*
*जयाचिये लीलेमाजी नीति । जियाली दिसे ॥* (ज्ञाने ९/११२)

खरे भक्तीसुख एकत्वातच आहे. म्हणूनच श्रुतीमध्ये 'शिवंभूत्वा शिवंयजेत्' असे सांगितले. ब्रह्मस्वरूपी प्रस्थान ठेवल्यावाचून भक्तीसुख प्राप्त होत नाही. ही गोष्ट अधिक स्पष्ट करतांना श्रीतुकोबा सांगतात,

*यज्ञभूतांच्या पाळणा । भेदकार्या कारणा ।*
*पावावया उपासना । ब्रह्मस्थानी प्रस्थान ॥*

ज्ञानीभक्त हा स्वभावसिद्ध ब्रह्मरूप झाला आहे. त्याला जे कांही स्फुरण होते तें ब्रह्मस्वरूपानेच होते, म्हणून त्या भक्ताच्या देहाकडून होणाऱ्या क्रिया म्हणजे भगवंताचे सहज पूजनच आहे.

भक्तीप्रेमसुख मोक्षसुखाहून अधिक श्रेष्ठ आहे. '*चहूं पुरूषार्थांते त्यागिती । चारी मुक्ती उपेक्षिती । पंचम पुरूषार्थाची भक्ती । मज पढयंती उद्धवा ॥*' (ए.भा. २४/३७२) तुकोबांनी हाच पंचमपुरुषार्थ साधला. ज्ञानोत्तर प्रेमभक्ती करणाऱ्या तुकोबांचे भक्तीप्रेमसुख हाच पंचमपुरूषार्थ त्यांनी साधला.

**डॉ. शंकर चतुरकर**
दर्यापूर. जि. अमरावती.

# संतश्रेष्ठ श्री तुकाराम महाराज-भक्तिचा आगळा पुतळा

डॉ. प्रभाकर म. अुपाध्ये

वारकरीपंथात श्रीज्ञानेश्वर व श्रीतुकाराम यांचे अद्वितीय व अढळ स्थान आहे. आजच्या विसाव्या शतकांतही या दोन श्रेष्ठ संतांचे चरित्र व वाङ्मय भाविक लोक तन्मयतेने वाचतात, त्याचे कारण असे की या दोन भगवद्भक्तांनी संसारी माणसाला आदर्श जीवनाचा प्रत्यक्ष पुरावा म्हणून स्वतःचे जीवन तसे करून दाखविले. त्यांतल्या त्यांत श्रीतुकाराम महाराजांचे जीवन तर साधकाला क्षणोक्षणी अध्यात्मजीवनाचा अभ्यास करताना स्फूर्ति देणारे ठरते असे अनेक साधकांना वाटते. श्रीतुकारामांच्या जीवनांत काय काय प्रसंग आले - जननिंदा सोसावी लागली, उपासमार सहन करावी लागली. घरातही युद्ध व बाहेरही युद्ध - अशा जीवनांत पांडुरंगाचे नाम हे एकच साधन व साध्य होते. यावर त्यांचे सर्व अध्यात्मजीवन आधारीत आहे असे दिसून येते.

सोळाव्या शतकांत श्रीतुकाराम जन्मले. अवघे ५० - ५२ वर्षांचे आयुष्य जगले पण तेच संत होऊन विदेही झाले. ते म्हणतात, *"तुका म्हणे देही । संत जाहले विदेही ॥"* या साध्यासाठी त्यांना 'काळोखी रात्र' सहन करावी लागली. त्यानंतरच अध्यात्माची पहाट सुरू झाली. श्री तुकारामांना आपल्या दोषांची तीव्र जाणीव होती. ते म्हणतात -

*मी तंव अन्यायी अपराधी । कर्महीन मतिमंद बुद्धि ।*
*तुज म्यां आठविलें नाहीं कधीं । वाचे कृपानिधि मायबापा ॥*
*नावडे पुराण केली बहुत परनिंदा.. । नाहीं दया आली पीडितांपर।*
*करू नये तो केला व्यापार ..."॥*

अशा शद्बांत ते विठोबाला सांगतात. यांत भक्ती, शरणागति, तळमळ, प्रामाणिकपणा इत्यादी सद्गुण दिसून येतात. वस्तुतः ते जरी स्वतःविषयी असे सांगत असले तरी खऱ्या साधकाला काय वाटते व वाटावे याचे हे सुरेख विवेचन आहे असे वाटल्याविना साधक पुढे जाऊ शकत नाही.

तुकाराममहाराजांना नाममंत्र मिळाला तो सुद्धा स्वप्नांत. बाबाजी चैतन्य या महापुरुषांनी त्यांना 'राम कृष्ण हरि' हा मंत्र दिला. त्यावर दृढ श्रद्धा ठेऊन त्यांनीं साधना आरंभली व शेवटी कळस गाठला. त्यांच्या अभंगांतून त्यांचे वस्तुनिष्ठ अध्यात्म - आत्मचरित्र स्पष्ट होते. अभंगांत ते म्हणतात -

*'न मिळो खावया न वाढो संतान । परि हा नारायण कृपा करो॥'*
*'अवघ्या दशा येणें साधती । मुख्य उपासना सगुणभक्ति ॥'*
*'एक पुरे नाम विठोबाचें ॥'*
*'वेद पुरुष नारायण । योगियांचे ब्रह्मशून्य ।*
*मुक्त आत्मा परिपूर्ण । तुका म्हणे सगुण भोळ्या आम्हा ॥'*

ते पुनः म्हणतात, *"हाचि माझा नेमधर्म । अवघें विठोबाचें नाम ॥ हेचि माझी उपासना ..... सकळ धर्म मज विठोबाचें नाम । .... तुका म्हणे आम्हा ऐसा भरंवसा । विठ्ठल सरिसा चालतसे ॥ .... तुका म्हणे माझ्या जीवनाचें जीवन । विठ्ठल निधान सांपडलें ॥"* अशी तुकारामांची नामनिष्ठा होती. विठ्ठलच सर्वस्व असल्याने त्यांना हे सर्व जगच विष्णुमय झाले होते. विठ्ठलाला त्यांनी प्रेमबंधनाने बांधून टाकले. ते इतके, की त्यांचा अनुभव असा झाला की *"जेथें जातों तेथे तू माझा सांगाती । चालविसी हाती धरूनियां ॥"* असे त्यांना म्हणता आले.

विठ्ठलाच्या नामाबरोबरच त्यांना संतसंगतीची ओढ होती. ते म्हणतात-*"काय सांगूं मी या संतांचे उपकार । मज निरंतर जागवीती ॥ सहज बोलणें हित उपदेश । करूनि सायास शिकविती ॥"* ते म्हणतात *" संतांचिये गांवीं प्रेमाचा सुकाळ । नाही तळमळ दुःखलेश ॥ .... संतांचें भोजन अमृताचें पान । करिती कीर्तन सर्वकाळ ॥"* देवाजवळ याचना करतांना ते मागतात -

*हेचि दान देगा देवा । तुझा विसर न व्हावा ॥*
*गुण गाईन आवडी । हेचि माझी सर्व जोडी ॥*
*नलगे मुक्ति आणि संपदा । संतसंग देई सदा ॥*
*... करूं नका कांही । संतसंग धरा...*

इत्यादी शद्बांत ते संतसंगमाचे महत्त्व सांगतात.

तुकारामांच्या अंगी नम्रता हा स्थायीभाव होता. त्यांच्या भाषेत जोश असला तरी भक्तिभावाचा उमाळा आहे. नम्रतेने ते म्हणतात, - *"ऐका हें वचन माझें संतजन । विनवितों जोडून कर तुम्हां ॥"* दुसऱ्या एका अभंगांत ते सांगतात -

*"परोपकारासाठीं सांगितलें देवा । प्रासादिक मेवा ग्रहण करा ॥*
*येणें भवव्यथा जाईल तुमची । सख्या विठ्ठलाची आण मज ॥*
*माझे दंडवत तुम्हां सर्व लोकां । ...॥"*
*"अहो बोलिले जें लेंकरूं । वेडे वाकडे उत्तरूं ॥*
*क्षमा करा अपराध । महाराज तुम्ही सिद्ध ॥*
*अहो नाहीं विचारिला । अधिकार म्यां आपुला ॥*
*तुका म्हणे ज्ञानेश्वरा । राखा पायापें किंकरा ॥"*

या शद्बांत नम्रता साकार झाली आहे. थोर पुरुषांचे लक्षण असते की ते नम्रच असतात. सोने मऊ असते पण लोखंड जड व कठीण असते. तुकाराम महाराज म्हणजे आंतून बाहेरून सोन्याचा गोळा.

तुकाराम महाराजांनी वारंवार देवाची करुणा भाकली आहे. कधी प्रेमाने तर कधी रागावून - शिव्या देऊन सुद्धां - देवाला विनविले आहे. त्या विनंतीमध्ये त्यांनी आपला प्राण ओतला, तळमळ व्यक्त केली,

देहभान हरपून चिंतन केले, मगच देवाचे दर्शन झाले. दर्शन झाल्यावर त्यांचे मन कायेसह बदलत गेले, अध्यात्माचा अनुभव येऊ लागला. त्यामुळे ते समाधानी झाले. त्यांच्या अनुभवाविषयी सांगता येणे कठीण आहे. तुकारामांच्या शद्वांत सांगावयाचे झाल्यास *"तुका म्हणे अंगे व्हावें जैं आपण । तरीच महिमान कळों येई ॥"* साधूची योग्यता कळण्यास प्रत्यक्ष त्याप्रमाणे झाले पाहिजे. असे असले तरी तुकारामांचे अनुभव आपल्याला शद्वांत तरी कळू शकतील असे वर्णन त्यांनीच केले आहे. देहभाव हरपला या संदर्भात ते म्हणतात -*"आपुलें मरण पाहिलें म्यां डोळां । तो जाला सोहळा अनुपम्य ॥"* तसेंच ते म्हणतात -*"वेद आम्हांवरी रुसोनियां गेला । आम्ही त्याच्या बाला धरिलें कंठीं ॥" "आम्ही वैकुंठवासी । आलों याच कारणासी । बोलिले जे ऋषि । साच भावें वर्ताया ॥... पिटूं भक्तीचा डांगोरा ।... तुका म्हणे करा । जय-जयकार आनंदें॥"* त्यांचा अनुभव असा की *"अणूरेणुयां थोकडा । तुका आकाशायेवढा ॥" "तुका म्हणे आतां । उरलों पर-उपकारापुरता ॥"* अशी विशालता त्यांना प्राप्त झाली. नामाने (एरवी) असाध्य असा परमार्थ त्यांनी प्राप्त करून घेतला. त्याचा अभ्यास केला. *"असाध्य तें साध्य करितां सायास। कारण अभ्यास तुका म्हणे ॥"* साधकाला हे उपयोगी पडणारे आहे. न कंटाळता, श्रद्धेने, प्रयत्नपूर्वक नामस्मरण करावे असे ते सांगतात.

*शांति संदर्भात ते प्रतिपादन करतांना म्हणतात की*
*शांतिपरतें नाहीं सुख । येर अवघेंचि दुःख ॥*
*म्हणऊनी शांति धरा । उतराल पैलतीरा ॥*
*... तुका म्हणे त्रिविधताप । जाती मग आपेंआप ॥*

पांडुरंग हा त्यांनी अंगी मुरवला. ते म्हणतात - *"पांडुरंग मनी/ पांडुरंग ध्यानीं । जागृती स्वपनीं पांडुरंग ॥ पडिलें वळण इंद्रियां सकळां। भाव तो निराळा नाहीं दूजा ॥"* यापेक्षा सुंदर अध्यात्मिक अनुभव कोणत्या शब्दांत वर्णन करून सांगणार? देवाची सेवा हाच ते धंदा मानतात. *"तुका म्हणे करूं देवा । तुझी सेवा धंदा तो ॥"* त्यांचा अनुभव असा की *"विठ्ठल गीतीं विठ्ठल चित्तीं । विठ्ठल विश्रांति भोग जया ॥ विठ्ठल आसनीं विठ्ठल शयनीं । विठ्ठल भोजनीं ग्रासोग्रासीं ॥ विठ्ठल जागृति स्वप्न सुषुप्ति आन । दुसें नेणती विठ्ठलेंवीण ॥"*... असा त्यांचा दिव्य अध्यात्मिक अनुभव होता. हाच अनुभव एका अभंगांत दिसून येतो - *"बोलावा विठ्ठल पाहावा विठ्ठल । करावा विठ्ठल जीवभाव ॥ तुका म्हणे देह भरिला विठ्ठलें । काम-क्रोधे केलें घर रितें ॥"* अनाहत नादाचा अनुभव सांगतांना ते म्हणतात - *"अनुहातीं गुंततां नेणें बाह्यरंग । वृत्ति येतां मग बळ लागे ॥"... तें सुख बोलतां आश्चर्य वाटे या जना । विपरीत मना भासतसे ॥ तुका म्हणे बाह्यरंग तो विठ्ठल । अंतर निवालें ब्रह्मरसें ॥* देवाशी समरस झाल्यावर त्यांना असे वाटू लागले की *"जाऊं देवाचिया गांवा । देव देईल विसांवा ॥ देवा सांगों सुख दुःख । देव निवारील भूक॥ घालूं देवासीच भार । देव सुखाचा सागर ॥"* संताविना असा अनुभव कोणाला येणार? वेदांचा अर्थ - त्यांतील मर्म - साधूंनाच जाणतां येते. तुकाराम महाराज म्हणतात की *"वेदाचा तो अर्थ आम्हांसीच ठावा । येरांनीं वहावा भार माथां ॥"* म्हणूनच प्रथम वैर करणारे पण तुकारामांच्या दैदीप्यमान चारित्र्यामुळे प्रभावित झालेले रामेश्वर भट्ट भक्तिभावाने त्यांच्यासंबंधी म्हणतात की *"तैसा नव्हे तुका वाणी व्यवसायी। भाव त्याच्या पायीं विठोबाचे ॥ अमृताची वाणी वरुषला शुद्ध। करी त्या अशुद्ध ऐसा कोण ॥... भक्तिज्ञानें आणि वैराग्यें आगळा । ऐसा नाहीं डोळां देखियेला ॥ जप तप यज्ञ लाजविलीं दानें । हरिनाम कीर्तनें करूनियां ॥"* असे जे समर्पक वर्णन आहे ते तुकारामांनाच शोभून दिसेल, इतर सामान्यांना नाही.

तुकाराम महाराजांच्या मते *"आडमार्गी कोणी जातील जे जन । त्यांतुनी काढील तोचि ज्ञानी ॥ तोचि ज्ञानी खरा तारी दुजीयांसी ॥ आपण तरेल नव्हे तें नवल । कुळें उद्धरील सर्वांचीं तो ॥"* असा ज्ञानी *"जैसी गंगा वाहे तैसें त्याचें मन ।"* असा असतो. त्याचें साधन नाम, पण ते घेताना *"शुद्ध करा मन देहातीत व्हावें । वस्तूसी ओळखावें तुका म्हणे॥"* भूतमात्रावर दया असावी - *"अंतरीं वसावी भूतदया । साक्षात्कार झालिया सहज समाधि ॥"* - असा त्यांचा अनुभव आहे आणि तो सदासर्वदा ब्रह्मामध्ये निमग्न असतो. त्यांचा दुसरा अनुभव असा की *"विठोबाचे भेटीं हरेल बा चिंता ।"* त्यांचे प्रामाणिक मत असे की ते (स्वतः) अभंग बोलत नसून विठ्ठलच त्यांच्याकडून तो बोलवून घेतो. *"बोलविता धनी वेगळाचि"* अशी त्यांची श्रद्धा आहे.

तुकारामांची सामाजिक नीति ही अध्यात्मनीति होय - *"परविया नारी रखुमाईसमान"* अशी त्यांची दृष्टी आहे. *"जे कां रंजले गांजले । त्यांसी म्हणे जो आपुलें ॥ तोचि साधु ओळखावा । देव तेथेंची जाणावा॥"* अशी साधूची व्याख्या ते सांगतात. ते स्पष्ट पणे सांगतात की *"भिक्षापात्र अवलंबणें । जळो जिणें लाजिरवाणें ॥"* तसेंच ते सांगतात, *"तुका म्हणे सर्प विंचु नारायण । वंदावे दुरोन शिवों नये ॥"* शिवाजी महाराजांनी तुकारामस्वामींस धन पाठविले तेव्हां ते म्हणतात, *"मान दंभ चेष्टा । हे तों शूकराची विष्ठा ॥ राजगृहा यावें मानाचिया आसें । तेथें काय वसे समाधान ॥"* आजच्या काळांत हे वचन कसे सार्थ आहे याची साक्ष पटेल. *"परद्रव्य परनारी । जाती विषाचिये परी ॥"* दुसऱ्याचे धन त्यांना विषाप्रमाणे वाटे, जणूं काय गोमांसच किंवा पाप. याविषयी खूपच लिहिता येईल पण मर्यादा सांभाळणे आवश्यक असल्याने थोडक्यातच तुकारामांची मते सांगितली आहेत.

महाराष्ट्राचे सौभाग्य म्हणजे पूज्य तुकाराम महाराज; त्यांची वाणी - देह पुण्यवंत. त्यांच्याच शद्वांत वर्णन करावयाचे झाल्यास *"पवित्र तो देह वाणी पुण्यवंत । जो वदे अच्युत सर्वकाळ ॥ तुका म्हणे देवभक्तांचा संगम । तेथें ओघ नाम त्रिवेणींचा ।"*

श्रीतुकाराम महाराजांच्या अध्यात्मजीवनांत संसाराचा स्पर्श असूनही ते अलिप्त रहातात, हेच त्यांचे मर्म आहे. त्यांचा अनुभव संसारांत गांजलेल्या साधकांना उपयोगी पडणारा आहे तसेच साधनास प्रवृत्त करणारा आहे. त्यांच्या सर्व चरित्रांत भावना, नीति, भक्ति - प्रतिभा, नामाचें प्रेम, सगुणनिर्गुणभक्ति, समाजाविषयी जिव्हाळा, खरा धर्म -

स्वधर्म सांगणारा सुधारक इत्यादी गोष्टींचा सुंदर मिलाफ होऊन त्यांचे चरित्र नटलेले आहे. त्यांच्या अभंगांत त्यांचे सर्व जीवन साठविले आहे. कधींही भंग न पावणारे असे ते अभंग आजच्या काळांतही हजारोंच्या तोंडांतून बाहेर पडतात व पुढेही पडतील असा तो अमोल वाङमयीन ठेवा मराठी भाषेत आहे. त्यांच्या जीवनाचा परिणाम अनेक साधुसंतांच्या जीवनांत प्रतिबिंबित झालेला दिसतो. प.पू. गुरूदेव रानडे यांच्या हिंचगिरि संप्रदायांत तुकारामांचे अभंग नित्य नेमावली म्हणून वाचले जातात. ज्ञानेश्वरांबरोबर ज्ञानोबा - तुकाराम हा नामघोष करीतच वारकरी कष्ट सोसून पंढरीरायाच्या दर्शनास जातात. याच दृष्टीने तुकाराम महाराज जिवंत आहेत. त्यांची अभंगवाणी स्फूर्ति देणारी आहे. त्यांचे ध्येय असे आहे की संतांचा मार्ग आम्ही जगाला दाखवूं. तोच झाडूं. सामान्य जन आडमार्गात अडकले आहेत, शास्त्रांचा अर्थ लोपत आहे. जग विषयी झाले आहे. म्हणून आम्ही भक्तीचा डांगोरा पिटू. त्या आवाजाने कलिकाळास थरकांप उत्पन्न होईल. मग ईश्वराच्या नामसंकीर्तनात जग निमग्न होऊन आनंदी होईल. याच ध्येयाकडे तुकारामांनी जीवन अर्पित केले. ते स्वतः सुखी झाले व त्यांनी इतरांनाही सुखी केले. हाच तो त्यांचा आदर्श होय. तुकाराम महाराज म्हणजे भक्तिचा आगळा पुतळा होय. अशा श्रेष्ठ संतशिरोमणी तुकाराम महाराजांनी आम्हांला वरदान द्यावे.

*हेचि दान देगा देवा । तुझा विसर न व्हावा ॥*
*गुण गाईन आवडी । हेचि माझी सर्व जोडी ॥*
*नलगे मुक्ति आणि संपदा । संतसंग देई सदा ॥*
*तुका म्हणे गर्भवासीं । सुखें घालावें आम्हांसी ॥*

**प.पू. गुरुदेव चरणदासानुदास**
**डॉ. प्रभाकर म. उपाध्ये**
१०, स्नेहवर्धिनी, गोरेगांव, पूर्व, मुंबई - ४०० ०६३.

---

## श्री सद्‌गुरु

श्री गुरु चरणी अेकची प्रार्थना
सत् संगतीचा घावा लाभ
सत् पदी राहो माझे मन
गुरू विण तळमळ नाही जाणार
रूप तुझे मनी असावे
रात्रंदिन तुझा विसर न व्हावा
मद् भाग्यास नाही उणे
दान वृत्त तुझ्याच पायी
सदा चरणाने राहो वृत्ती
स्वामी माझे हे अेकची मागणे
श्री मी जावो गळूनी
मन राहो तुझे चरणी
" जय जय रघुवीर समर्थ "

**सौ. अनुराधा ढवळे**

## भारतीय संस्कृती

एक षोडशा पुशी सखीला
भारतीय संस्कृती म्हणजे काय
सांग सखे तू सांग मजला.
चहुबाजूचा हा भ्रष्टाचार
हुंडाबळी सती अत्याचार
स्त्री जातीशी 'नीच' व्यवहार
हाच का संस्कृतीचा आधार
संस्कृती म्हणजे का कर्मकांडे
संस्कृती म्हणजे का जातीभेद तंटे
भारतीयाशीच भारतीय भांडे
सीमाप्रश्न असो वा प्रकरण भुखंडे
सखी मग सांगे तिजला
हा ग फक्त 'वर्तमान' झाला
भारतीय संस्कृतीची थोरवी
कशी सांगू वर्णुनी तुजला
दिग्गज तपस्वी म्हणजे आपली संस्कृती
स्वातंत्र्यसेनानी अन् बुद्धांची महती
सर्व शास्त्रविद्याशाखेत आपली ख्याती
वेदशास्त्रपुराणांची होती येथे भरती
भाषा प्रांत जाती जमाती
बहु असुनही एकात्मता होती
खनिज वन अन बुद्धिसंपत्ती
पराक्रमांचीही लयलूट होती
परकीयांनी मग आक्रमिला देश
पेटून उठले मग सारे प्रदेश
स्वार्थसुखाचा केला होम
स्वातंत्र्याचा तिरंग्याचा चढला जोम
स्वातंत्र्य मिळाले अन् सगळे संपले
नेत्यांचे पुढाऱ्यांचे 'संदर्भच' बदलले
स्वार्थी भ्रष्टाचारी सारे बनले
संस्कृतीचे 'खोटे देव्हारे' माजविले
खरी संस्कृती नाही कुणा कळली
संस्कृतीच्या नावाखाली ही जाळपोळ चालली
आता आपण सारे जागे होऊ या
आपल्या 'खऱ्या' संस्कृतीचा अभिमान बाळगूया
तिची जपणूक करणे हे प्रथम ध्येय आपुले
संवर्धन करण्या तिचे 'ज्ञान' पाऊल पहिले

**क्षितिजा सोमण**

# ॥ राखा पायांपे किंकरा ॥

डॉ. प्रा. सौ. नीला जोशीराव

*तुका म्हणे संत ।*
*सोशी जगाचे आघात ॥*

श्री तुकोबाप्रमाणेच सारे संत मंडळ सामान्य जीवाच्या सुखासाठी जगाचे आघात - प्रत्याघात सहन करते, आणि मानवी मनात सुखाचा, समाधानाचा, वसंत फुलविते. संत हेच चालते बोलते भगवंत, *'संत हे तो रूपडी माझी'* असा निर्वाळा श्री माऊली देते. तर श्री तुकाराम *'माऊलीहूनी मायाळ । चंद्राहूनी शितळ । पाणियाहुनी पातळ ।'* अशा 'प्रेम कल्लोळाला' जीवा - भावाने शरण जातात. संतत्व हा मानवतेचा प्राणवायू आहे. जगाच्या कल्याणासाठी या संत - विभूती देह कष्टवितात, रात्रंदिवस परोपकारात मग्न असतात.

श्री. तुकाराम महाराज म्हणजे भागवत धर्म मंदिराचा भावभक्तिचा लखलखणारा सुवर्ण कळस. दूरवरची वाटचाल करून शिणलेल्या पांथस्थाला हा विसावा देतो. जन्मोजन्मींच्या भयव्याकुळ जीवाला तो 'अभय' देत असतो. ही अभयता प्रदान करणारी निर्भयता अंगी बाणली म्हणून तर तुकोबा

*तीक्ष्ण उत्तरे ।*
*हातीं घेऊन बाण फिरे ।*

असा जीवनाशी संघर्ष करायला उभे ठाकले. 'आम्ही वैकुंठवासी' ही त्यांची मूळची वस्ती ते कधीच विसरले नाहीत; पण त्याचबरोबर 'अर्भकाचे साठी' पंतोजीची भूमिका वठवायलाही ते मुळीच चुकले नाहीत. त्यांची मानवी जीवनाची मुळाक्षरे, धुळाक्षरे बघतां बघतां, सोन्यासारखे जीवन उजळून टाकतात - 'दया -क्षमा - शांती' हीच देवाची वस्ती म्हणूनच या गुणांचा दरवळ दानवाचा देव करतो हे त्यांनी जाणले आणि जाणकारांना त्याच गुणांची जाणीव करून दिली. दैवी गुणांनी पृथ्वीवर स्वर्ग निर्माण होईल ही त्यांची खात्री, पण त्यासाठी थोर संत परंपरेचा प्रयत्नपूर्वक कित्ता गिरविला पाहिजे. संतांच्या पाठशाळेत तुकोबांनी एक दिव्य पाठ ग्रहण केला. आपल्या सर्व भावंडांसह श्री माऊली व तिचा सर्व संत मेळा दुःखाचे विष पचवून जगावर अमृताचा वर्षाव करतात. तो संतकृपाघनाचा अमृतवृष्टी करणारा सोनियाचा दिवस तुकोबांनी संतांबरोबर बाळक्रीडा खेळता खेळता प्रत्यक्ष अनुभवला.

या खेळातील 'खेळिया' ची त्यांना मोठी अपूर्वाई वाटते. म्हणून तर *'खेळ खेळूनिया निराळाचि राही'* अशा या खेळियाची कथा ते आपल्या गाथेत गुंफतात. या जगावेगळ्या खेळात दमदार गडी 'संत नामदेव महाराज'. संतकृपेचा फड ते अहोरात्र जागवितात - *'सिंपियाचा पोर एक खेळिया नामा'* त्या खेळात *'ज्ञानदेव, मुक्ताबाई, वटेश्वर चांगा। सोपान आनंदे खेळती रे ॥'* त्यांनी नामदेवा प्रमाणेच 'कान्हो गोवारी' मध्ये घालून फेर धरला. त्या भक्तिरिंगणात 'कबीर' खेळिया अन् 'राम' बसवंत निवडला तर -

मराठीचे अन् महाराष्ट्राचे पढियंते 'संत एकनाथ' या खेळात पुढे आले - 'ब्राह्मणाचा पोर 'एका' खेळिया भला' या पोराने तर अवघा जनच आपल्या सारखा खेळकर केला. 'जनार्दन' बसवंत करून त्याने वैष्णवांचा मेळा मिळविला आहे. हमामा - हुंबरी - पावा - टिपरी अशा शेकडो खेळांचा क्रीडामहोत्सव ऐन रंगात आला आहे. वर्णाभिमान विसरून, क्रोध - अभिमान सोडून ते सारे खेळगडी एकमेकांच्या पाया लागतात. त्यांची निर्मळ चित्ते निवून नवनीत झाली आहेत - ते 'मुदु सबाह्य नवनीत' चित्त पाहून पाषाणाला पाझर फुटले आहेत. भवसागर तरून जाण्यासाठी ही सोपी पायवाट झाली आहे. या खेळण्याच्या नादी लागलेले योगी, ज्ञानी, पंडित, महानुभाव, सिद्ध, साधक सारे आले आहेत. इथे टिपऱ्या दोन, नाद एकच आहे तुकोबा सांगतात

*दोन्ही टिपरी, एकचि नाद ।*
*सगुण निर्गुण नाही भेद रे ॥*

सगुण - निर्गुणाचे न उलगडणारे कोडे या तुकोबांच्या क्रीडांगणात सहज उलगडते. चंद्रभागेच्या वाळवंटी हा रात्रंदिवस खेळ रंगला आहे. हा संतमेळा हरिनामाचा गजर करीत, नाचत, गात, हसत, खेळत, पंढरीला निघाला आहे. सहा शास्त्रे, चार वेद, अठरा पुराणे यांना जो आकळला नाही त्या 'बाप रखुमादेवी वरू' ला डोळे भरून पाहण्यासाठी हा रात्रंदिवस आनंद सोहळा चालू आहे. या सोहळ्यात पक्षी, चारा - पाणी विसरले, जीव, देहभाव विसरला, तो आनंद सांगण्यासाठी मुका बोलका होतो. जन्मजन्मांतरीचा बहिरा ऐकू लागतो, आंधळ्याला डोळे; पांगळ्याला पाय लाभतात. या पटांगणावर 'जन्म - मृत्यू - जरा - व्याधी सारे विरले - उरले ते *'आनंदाचे डोही आनंद तरंग ।'* आहेत.

श्रुती ज्याला 'नेऽति' म्हणून मौनात विसावल्या तो हा तुकोबांचा 'गोविंद' आनंदाचा कंद, परमानंद, आनंद - काला वाटतो, त्या आनंदात हे विठोबाचे वेडे बागडे जीव *'गाऊ नाचू वाहू टाळी'* असे प्रवृत्ती - निवृत्तीच्या टाळ्यांच्या तालावर गोविंदाचा छंद घेऊन नाचताहेत. 'नित्य दिपवाळीचे प्रकाशाचे राज्य इथे नांदते आहे.' उभे जीवनच सण आहे. जन्म - मरणाचा धाक संपला, आता जगाला अभय देणारे ते, निर्भय जीवनाचे वरदान साधुसंतांना लाभले कारण एकच आत्यंतिक 'श्रद्धा - विश्वास'

ही श्रद्धा - विश्वासाची अनादी जोडी आहे. संत तुलसीदासजी

सांगतात. -

*भवानी शंकरी वन्दे ।*
*श्रद्धा - विश्वास रूपिणी ।*
*याभ्यांविना न पश्यन्ती ।*
*सिद्धाः स्वान्तस्थनिश्वरम् ॥*

श्री तुकोबा लिहितात -

*विश्वासाची धन्य जाती*
*तेथे वस्ती देवाची ॥*

या देवाच्या वस्तीत तुकोबांना भेटते 'इंद्रायणी काठी देवाची आळंदी.' हे गाव नव्हे, हा तर पुण्यभूमी ठाव आहे. इथे चौसष्ट सिद्धांचा सिद्धबेटीं मेळा मिळाला आहे. हा सर्व आसमंत सिद्धेश्वराशी सुखसंवाद करतांना, तुकोबा ते अप्रूप बघतात, ऐकतात.

त्यांना देहूत राहूनही आळंदीच्या इंद्रायणीची, माऊलीची वारंवार सय येते. तिथे चाललेला टाळ वीणांचा गजर ऐकू येतो. माऊलीची 'अक्षर पूजा' ते एकटक बघत बसतात. *'नव्हते अभ्यासीं चित्त आधी'* असे ते स्वतःच सांगतात. पण श्री माऊलीची अमृतवाणी वीणेच्या झंकारात झंकारते 'ॐ नमो ऽ जि आद्या'... हा आत्मानंद 'स्वधर्म सूर्या' ची प्रसन्न पहाट बघतो; धन्य होतो लख्ख सूर्यप्रकाशात माऊलीची अक्षर दिवाळी तळपू लागते -

*जैसी पूर्व दिशेच्या राऊळी ।*
*उद्या येतांचि सूर्य दिवाळी ।*
*येरी हि दिशा तयेचि काळी ।*
*कालिमा नाही ॥*

अशा या अखंड दिवाळीच्या आनंदात, श्रोता - वक्ता त्या स्वानंद-साम्राज्यात नांदताहेत.

*सूर्ये अधिष्ठिली प्राची ।*
*जगा राणीव दे प्रकाशाची ॥*

सूर्य - चंद्राच्या सूर्य ज्योती - चंद्र ज्योतीने विश्वात्मक देवाला ओवाळणी करणाऱ्या माऊलीची महापूजा संतश्रेष्ठ तुकारामांनी अत्यंत विनम्र - पाईक भावाने बांधली.

*ज्ञानियांचा राजा । गुरू महाराव ।*
*म्हणती ज्ञानदेव । तुम्हां ऐसे ॥*
*मज पामरासी । काय थोरपण ।*
*पायींची वाहाण । पायीं बरी ॥*
*ब्रह्मादिक जेथे । तुम्हां वोळगणे ।*
*इतर तुळणे । काय पुढे ॥*
*तुका म्हणे नेणे । युक्तीची जे खोली ।*
*म्हणोनी ठेविली पायीं डोई ॥*

श्री तुकोबांसारखा सत्शिष्य तुकोबाच.

मराठीने अन् महाराष्ट्राने हा भाव अंगी बाणवला तरच श्री माऊली आणि तिची 'अमृतांते पैजा जिंकणारी' अमृतवाणी मराठी समाजाला वरदान ठरेल.

श्री तुकोबांची अनन्यभक्ति - संपूर्ण शरणागती मोठी विलक्षण आहे. भक्तिमार्गावर वाटचाल करीत असता सामान्य जीव भांबावून जातो. सगुण सुटत नाही (मी - जग) अन् निर्गुण (त्रिगुणातीत गुरू) भेटत नाही. अशा वेळी 'मी मी ' म्हणणारे हतबल होतात. ज्ञानोबांची मुक्ताई सांगते -

*भवनदीचे पाणी गड्या रे ।*
*फारचि वोढिते ।*
*भल्या भल्या पोहोणारांना ।*
*उलथून खालीच पाडिते ॥*
*॥ उलट उलट माघारा ॥*

अशा वेळी संतश्रेष्ठ तुकाराम श्रीहनुमंताला पुनःपुनः शरण जातात -

*शरण शरण हनुमंता ।*
*तुज आलो रामदूता ।*
*काय भक्तीच्या त्या वाटा ।*
*मज दावाव्या जी सुभटा ॥*

भक्ति मार्गात केवळ बाहुबळ उपयोगी नाही; तर ज्याची भक्ती - बुद्धी - युक्ती - शक्ती - सारे श्रीराम समर्पित आहे; अशा अनन्य शरणागतीची तुकोबांना आठवण येते. ते म्हणतात -

"ज्ञानाचे ज्ञान - मूर्तीमंत ज्ञान अशी माझी ज्ञानाई, तीच ज्ञाननिष्ठांची गुरूमाऊली आहे. या माऊलीमधेच 'गुरूत्व आणि माऊलीपण' सामावलेले आहे. उभ्या महाराष्ट्राचा, मराठीचा सद्‌गुरू माझा ज्ञानदेव."

श्री नामदेवांच्या चरण चिन्हांचे अनुसरण करीत श्री तुकोबा ज्ञानोबांची आळवणी करतात "माऊली! ज्ञानराजा! आपण योग्यांची माऊली, आपणच निगमवल्ली प्रगट केली. ज्ञानेश्वरी नावाचा गीतालंकार ही ब्रह्मानंद लहरीच प्रकट केली आहे. या गीता भाष्यातून छप्पन भाषांचा गौरव केला. दुस्तर भवसागरातून तारून नेणारी नामशक्तिची नावच आपण उभारली आहे. केवळ श्रवणाचे मिषाने या, श्री ज्ञानदेवीच्या चरणी मिठी घाला अन् बघा काय चमत्कार होईल; स्वानंद साम्राज्याचे तुम्ही चक्रवर्ती व्हाल. पण त्यासाठी मायबाप श्रोत्यांनो! एकच काम करा

*एक तरी ओवी अनुभवावी ।*

एवढे सामर्थ्य माऊलीच्या मंत्रवाणीत आहे. ज्ञानदेवीची ही मंत्रशक्ति ज्या तुकोबांनी नामदेव कृपेने अनुभवली ते माऊलीला कळवळून विनवणी करतात -

"बापा ज्ञानेश्वरा! मी पामर आहे. आपल्याला तो थोरपणा शोभतो, माझ्यासारखी वहाण आपले चरणापाशीच जागा मिळावी एवढीच आशा बाळगून असते. आपण जी सत्रावी जीवनकळा प्रकट केली, तिची गूढ, गहनता आकलन होत नाही. आपले 'नित्य नवे' श्वास प्रबंध होतात, आणि हा प्रबंध साधकाला समाधीची समधातता देतो.

आपली ती सुवर्णाक्षरे अनुभवणे हेच ज्ञानदेवीचे ऐश्वर्य; पण आपल्या ऐश्वर्य योगाची युक्ती कळत नाही म्हणूनच माऊली मी आपल्याला वारंवार दंडवत घालतो."

तुकोबांची विनम्र वाणी माऊलीच्या पायावर डोई ठेवून धन्य होतांच श्री ज्ञानदेवांचा पारमार्थिक अधिकार गाऊ लागली. -

*जयाचिये द्वारीं सोन्याचा पिंपळ ।*
*अंगीं ऐसे बळ रेडा बोले ।।*
*करील तो काय नोहे महाराज ।*
*परी पाहे बीज शुद्ध अंगी ।।*
*जेणे हे घातली मुक्तीची गवांदी ।*
*मेळविली मांदी वैष्णवांची ।।*
*तुका म्हणे तेथे सुखा काय उणे ।*
*राहे समाधाने चित्ताचिया ।।*

गाता गाता - आळंदीच्या सोन्या - पिंपळाची सळसळ ऐकू लागली, त्याला श्री माऊलीच्या माऊलीने हजारो प्रदक्षिणा घातलेल्या पाहू लागली, अंगणातले ते कैवल्याचे झाड - तुकोबांची जन्मांतरीची सावली झालेले ते डोळ्यात साठवू लागले.

'रेड्यामुखी वदविलेले वेद' ऐकतां ऐकता तुकोबांचा शब्देविन संवाद, आळंदीशी केलेलं हृदयसंवाद देहूची इंद्रायणी काना - मनात साठवू लागली. स्थल - काळाची सीमा भक्तिच्या भावविश्वात उरतच नाही. म्हणूनच की काय माऊलीने घातलेली मुक्तीची गवांदी (इच्छाभोजन) तुकोबांना भावली. त्या वैष्णवांच्या मांदियाळीत तुकोबा पोटभर जेवले व तीच तृप्ती त्यांनी मराठी अभंगगाथेला हजारो हातांनी भरविली. आता तुकोबांच्या सुखाला आकाश ठेंगणे झाले.

अभंग लिहिता लिहिता, गाता, गाता तुकोबा गहिवरले, जाणता अजाणता का होईना, माऊली! माझ्या लेखणी - वाणीची, बोलण्या - चालण्याची, काही ना काही चूक झालीच आहे. आपण तर *'जीवातळी अंथरीतु आपुला जीवु ।'* इतके दयार्द्र अन् मी - माझी वाणी किती राठ म्हणूनच हे अपराध क्षमापन स्तोत्र स्विकारावे, महाराज! -

*बोलली लेकुरें । वेडी वांकुडी उत्तरे ।।*
*करा क्षमा अपराध । महाराज तुम्ही सिद्ध ।*
*नाही विचारिला । अधिकार म्यां आपुला ।*
*तुका म्हणे ज्ञानेश्वरा । राखा पायांपे किंकरा ।।*

'माझ्या योगीराजा! मायबापा!'

आपणांसारखे महासारस्वत महाराष्ट्र शारदेची महापूजा बांधतात - हरिपाठ, ज्ञानदेवी - अभंग, विराण्या, अमृतानुभव, चांगदेव - पासष्टी असे जडावाचे अलंकार घडवितात. आम्ही ही 'अक्षर पूजा' गाभाऱ्याच्या बाहेर, महाद्वाराशी पायरीवर बसून लक्ष्यपूर्वक पाहू का? माझी मर्यादा मी जाणतो

*तुझ्या दारचा कुतरा ।*
*नको मोकलू दातारा ।।*

असे परोपरीने आर्जवे करतात. 'गाभारा - गर्भगृह' हे भगवंताचं हृदय; तिथे अक्षर पूजा बांधण्याचा मान माऊलीचा. दुरून का होईना, या डोळ्यांना आपल्या पूजेचा गर्भश्रीमंत वसंतोत्सव पाहू द्या.

माझे वेडेवाकुडे बोल आपण ऐकावे, महाराज आपण 'सिद्ध' अहात, माझ्यासारख्या पाईकाला क्षमा करा. माझा पारमार्थिक अधिकार न जाणता मी आपल्या चरणाशी आलो खरा; पण आपणांसारखी नामामृत संजीवनी मी कुठून आणू? माझे बरळणे आपण नीट नेटके करालच कारण -

*निमित्य मापासी बैसविलो आहे ।*
*मी तों काही नोहे ।*
*स्वामी सत्ता ।।*

आपल्या सत्तेतच मी शद्बपूजा बांधणार; 'बोलविता धनी वेगळाच' आहे हे मी अनुभवतो आहे. तो जन्मोजन्मीं देहाच्या गेहात राहणारा 'धनी' मी ओळखलो. आपल्या रूपाने मी त्याच्याच पायावर लोळण घेतो आणि माऊली! जीवाच्या आकांताने एकच विनवणी करतो -

*तुका म्हणे ज्ञानेश्वरा ।*
*राखा पायांपे किंकरा ।।*


**सौ. नीला जोशीराव**
प्रसाद, २९०, रामनगर,
नागपूर १०

# ॥ संत तुकारामांची सामाजिकता ॥

- डॉ. ल. का. मोहरीर.

संत तुकारामांनी सामाजिक समतेचा स्वीकार, पुकार आणि पुरस्कार सोळाव्या शतकात केला. त्यांच्या सामाजिक समतेचा पाया ज्या मूल्यांवर आधारीत होता, त्यांपैकी जातीपेक्षा व्यक्तीच्या गुणांना त्यांनी दिलेले महत्त्व, हे मूल्य अधिक महत्त्वाचे आहे. 'गुणा मोल आहे' हा त्यांचा सामाजिक समतेचा महत्त्वाचा सिद्‌धांत आहे. याचा अत्यंत संक्षेपाने विचार या टिपणात केलेला आहे.

**गुणा मोल आहे :-**

माणसांची जात महत्त्वाची नाही. त्याच्या गुणांना मोल आहे. मनुष्यकृत कृत्रिम जातींच्यापेक्षा त्या व्यक्तीतील गुण पूज्य आहेत. वैष्णव म्हणजे विश्वसेवक म्हणजे आपले काम नेकीने करणारा, कोणत्याही जातीचा असला तरी त्याला पूज्य मानावे - त्याचा आदर करावा; कारण पूज्यतेचा मक्ता समाजातील विशिष्ट जातीने घेतलेला नाही. कस्तुरीचा सहवास ज्या मातीला लाभला ती माती, परीसाचा सहवास ज्या लोखंडाला लाभला ते लोखंड, त्यांच्या गुणांमुळे खरे मौल्यवान ठरते. वस्तुतः माती, लोखंड यांचा दर्जा कस्तुरी, सोने यांच्या सापेक्षतेने कमी प्रतीचा असूनही 'गुणा मोल' या न्यायाने ते श्रेष्ठ ठरतात.

*कस्तुरी मिनली जये मृत्तिकेसी ।*
*तये आणिकासी कैसी सरी ॥*
*तुका म्हणे मी न वजे यातीवरी ।*
*पूज्यमान करी वैष्णवासी ॥* (अभंग. १७९२)

कस्तुरीचे रूप मातीसारखे निकृष्ट असले तरी सारभूत गुणांमुळे (सुगंधामुळे) त्याला मोठी किंमत मोजावी लागते. दिसण्यास कुरूप असलेल्या चंदनाच्या झाडांनाही गुणांमुळे मोल चढते. परीस देखील रूपाने फार चांगला नसतानाही तो लोखंडाचे सोने करतो, या सामर्थ्याने मौल्यवान ठरतो. उत्तम तलवार आटवली तर त्या लोखंडाला बारा पैसेही किंमत येत नाही; पण ती तळवार तशीच राहिली, तर आपल्या गुणांनी हजार रुपयांच्यावर किंमतीने विकली जाते. त्याप्रमाणे समाजात जातींना महत्त्व नसून गुणांना महत्त्व आहे. ज्याच्या मुखात 'नाम' म्हणजे 'ज्ञान' आहे तो धन्य आहे. (अभंग १२७७)

सोन्याच्या घागरीत (म्हणजे तथाकथित उच्च समजल्या जाणाऱ्या जातींत) दारू (अपप्रवृत्ती) भरली तर सोन्याच्या घागरीत (उच्च जातीत) आहे म्हणून तिला प्रमाण (समाज हिताला पोषक) मानावे काय? मातीची घागर (तथाकथित नीच जात) आहे आणि त्यात अमृत (समाजहित, पोषक तत्त्व) साठविलेले असेल तर मातीच्या घागरीत (तथाकथित नीच जातीत) आहे म्हणून ते अमृत (समाज पोषक तत्त्व) अपवित्र मानावे काय? याचा निर्वाळा संतांनी (विश्वसेवकांनी) समाजाचे व्यापक हित कशात आहे, हे लक्षात घेऊन ते सांगावे, ही संत तुकारामांची भूमिका आहे.

*सोनियाचा कळस । माजी भरिला सुरारस ॥*
*काय करावे प्रमाण । तुम्ही सांगा संत जन ॥*
*मृत्तिकेचा घट । माजी अमृताचा साठ ॥*
*तुका म्हणे हित । ते मज सांगावे त्वरित ॥* (अभंग. ८१०)

हरी हा विश्वरूप असल्यामुळे त्याचे गुणवाद माणसातील गुण महत्त्वाचे आहेत याविषयी भाष्य प्रतिभाष्य जो करतो तो तथाकथित नीच कुळातील असला तरी तथाकथित उच्च कुळातील लोकांनाही वंद्य आहे. प्रत्यक्ष देव (समाजातील थोर अधिकारसंपन्न विभूति) देखील त्याची पायधुळी डोक्यावर घेऊन वंदन करतो. (त्याला आदरपूर्वक मानसन्मानाने सामाजिक प्रतिष्ठा लाभल्यामुळे त्याचा गौरव होतो.) असा मनुष्य त्याच्या वंशाच्या परंपरेत दिव्यासारखा प्रकाशक असतो. अशांची जो निंदा करतो त्याच्या वाणीला कुष्ठरोग होईल. त्या निंदकाचे मुख परिटाच्या घरची कपडे धुण्याची सौंदणी (दगडी) होय. अशा शद्बांत गुणांना डावलून केवळ जातिव्यवस्थेचा पुरस्कार करण्याविषयी तुकाराम राग व्यक्त करीत आहेत.

*नीचिये कुळीचा उंचा वंद्य होय ।*
*हरीचे जो गाय गुणवाद ॥*
*देव त्याची माथा वंदी पायधुळी ।*
*दीप झाला कुळी वंशाचिये ।*
*त्याची निंदा करी त्याची कुष्टवाणी ।*
*मुख संवदणी रजकाची ॥* (अभंग. २०३७)

हिरा ऐरणीत रुतून बसला असेल तर तो हिरकणीचा स्पर्श होताच बाहेर निघतो. या न्यायाने जो ज्या जातीचा (गुणांचा) असतो तो आपल्या जातीकडे (गुणांकडे) धावत असतो, कारण एका जातीच्या (गुणांच्या) दोन चित्तांना (व्यक्तींना) एकमेकांचे वर्म कळत असते.

*धावे जातीपाशी जाती । खूण येरयेरा चित्ती ।*
*हिरा हिरकणी । काढी आतुनी आइरणी ॥* (अभंग ३८६)

**नाही लपो येत गुण :-**

अंगभूत गुण हे लपविता येत नाहीत. प्रत्येकाची स्वभाव-प्रकृती भिन्न भिन्न असल्यामुळे गुणही भिन्न भिन्न असतात. या गुणांच्या वैचित्र्याला जात हे कारण नसून प्रकृतिदत्त गुण हे मूळ आधार आहेत. *'एका ऐसे एक नाही । भिन्न पाहे प्रकृति ।'* (अभंग. १३६६) सहज (जन्मतः) प्राप्त झालेले शरीर-गुण कोणत्याही कारणांनी बदलत नाहीत, त्यांची स्थिती दृढ असते. *'सहज गुण जयाचिये देही । पालट तो काही*

*नव्हे तया ।'* (अभंग. ६६०).

सामाजिक समता दृढ करावयाची असेल तर जातींच्यावरून श्रेष्ठ कनिष्ठतेचे थादंग माजविणाऱ्या लोकांना दूर सारावे. नारायण (विश्व) व संत (विश्वसेवक) यांची पूजा व्हावयास हवी. त्यांचे विचार समाजात रुजवून सर्व जातींतील लोकांच्या गुणांची कदर (पूजा) समाजपुरुषाने करावयास हवी; कारण अशाच अन्नाचे सेवन करणे चांगले की, ज्याच्या तृप्तीने ढेकराच्या योगाने मुखावरही आनंद ओसंडतो; पण दारूला (सामाजिक स्वास्थ्य विघातक जातिव्यवस्थेला) दूध (समाज पोषक) मानणे योग्य नाही.

*सकळ पूजा स्तुती । करावी ते व्हावी याती ।।*
*म्हणऊनि वारा जन । संत पूजा नारायण ।।*
*सेवावे तेवरी । दावी उमटूनि ढेकरी ।*
*तुका म्हणे सुरा । दुधा म्हणता केवी बारा ।।* (अभंग. १४३४)

संत तुकारामांची समतेची ही दृष्टी अस्पृश्यता निवारणासाठी अधिक उपयुक्त, रसाळ आणि मूलगामी आहे. सर्वांना गुणकर्मानुसार समान अधिकार देणे ही एका अर्थाने सामाजिक दृष्टिकोनातून फार मोठी क्रांतीची गोष्ट होती. ही सामाजिक समतादृष्टी वेदवाङ्मयांत, सर्व शास्त्र ग्रंथांत, पुराणवाङ्मयांत, संत साहित्यात आहे, असे तुकारामांनी वारंवार मांडलेले आहे.

**डॉ. ल. का. मोहरीर.**
३, अनंत अपार्टमेंटस्
ज्योतिनगर, औरंगाबाद.

# 'श्री संत तुकाराम महाराजकृत श्रीनाममहिमा'

प्रा. योगेश्वर अभ्यंकर

श्री संत तुकाराम महाराज वारकरी पंथातील एक लोकप्रिय संत. विविध विषयावरील अभंगरचना करून 'अभंग तुकयाचा' अशी कीर्ति संपादन केलेले एक श्रेष्ठ महापुरूष. संत तुकाराम महाराजांचे अभंग काळावर मात करून खऱ्या अर्थाने अभंग ठरले. त्यांच्या अभंग रचनेची बीजे समाजात खोलवर रुजली आहेत. साध्या सोप्या शब्दातील अभंगांना सुविचारांचा दर्जा प्राप्त झाला आहे. वारकरी पंथामध्ये नामस्मरणाला महत्व प्राप्त झाले असल्याने विविध संतांनी नामस्मरणाचे बहुमोल महत्व स्पष्ट करण्यासाठी अभंगरचना केली आहे. अभंगरचना भजनाच्या निमित्ताने किंवा कीर्तनासाठी केलेली असली तरीसुद्धा काव्यातील अनेक गुण संतांच्या रचनेत आहेत. संत तुकाराम महाराज, नामस्मरणाचे साधन सोपे आहे हे स्पष्ट करताना म्हणतात–

*नामसंकीर्तन साधन पै सोपे ।*
*जळतील पापे जन्मांतरे ॥१॥*
*न लगती सायास जावे वनांतर ॥*
*सुखे येतो घरा नारायण ॥२॥*
*ठायीच बैसोन करा एकचित्त ।*
*आवडी आनंत आळवावा ॥३॥*
*रामकृष्णहरि विठ्ठलकेशवा ।*
*मंत्र हा जपावा सर्वकाळ ॥४॥*
*याविण आणिक असतां साधन*
*वाहातसे आण विठोबाची ॥५॥*
*तुका म्हणे सोपें आहे सर्वांहूनि ।*
*शहाणा तो धनी घेती येथे ॥६॥*

परमेश्वर प्राप्तीसाठी तपश्चर्या किंवा योगसाधना करण्याची जरूरी नाही कारण अशा गोष्टी सामान्य जनांना झेपणार नाहीत ते लक्षात येताच वारकरी पंथाने नामस्मरणाचा साधा सोपा मार्ग मुक्तीसाठी स्विकारावा असे आग्रहाने प्रतिपादन केले आहे, त्यामुळे जन्मोजन्मीची पापे नाहीशी होतात असे विश्वासाने स्पष्ट केले आहे. नामस्मरण करण्यासाठी संसार सोडून जाण्याची जरूरी नाही. घरी किंवा मंदिरी नामस्मरण करता येते त्यामुळे चित्ताची एकाग्रता साधता येते. श्रीसंत तुकाराम महाराजांनी, *"रामकृष्ण हरिविठ्ठल केशवा"* हा साधा सोपा मंत्र सदासर्वकाळ जपावा म्हणजेच नामसंकीर्तनाला मुहूर्ताची जरूरी नाही त्यासंबंधात म्हटले आहे,

*कामामध्ये काम ।*
*काही म्हणां रामराम ।*
*जाईल भवश्रम ।*
*सुख होईल दुःखाचें ॥१॥*
*कळो येईल अंतकाळी ।*
*प्राणप्रयाणाचे वेळी ।*
*राहती निराळी ।*
*रांडापोरें सकळ ॥२॥*
*जीतां जीसी जैसा तैसा ।*
*थोर आहे रे वोळसा ।*
*उगवुनी फांसा ।*
*काय करणे ते करी ॥३॥*
*केले होते याचि जन्में*
*अवघे विठोबाच्या नामें*
*तुका म्हणे वर्मे*
*जाणोनिया तरती ॥४॥*

एकीकडे काम चालू असताना दुसरीकडे रामराम म्हणता येते. अखेरच्या क्षणाला कोणीही कोणाचे नाही त्यावेळी फक्त रामप्रभूंचाच आधार ते लक्षात आल्यानंतर भवसागर तरण्यासाठी माणसाने विठ्ठलनाम घ्यावे. माणूस स्वतःच्या देहावर खूपखूप प्रेम करतो पण म्हातारपण जवळ येत चालले आणि एकेक गात्रे थकत चालली किंवा निकामी झाली की माणसाला धक्के बसायला सुरुवात होते. आपण अमर नसून मृत्यू केव्हाही गाठणार ते कळल्यानंतर माणूस जास्तच बेचैन होतो त्यासाठीच -

*नाशिवंत देह नासेल हा जाणा*
*का रे उच्चाराना वाचे नाम ॥१॥*
*नामेचि तारिले कोट्यान हे कोटी ।*
*नाम हे वैकुंठी बैसविले ॥२॥*
*नामापरते सार नाही त्रिभुवनी*
*ते कां तुम्ही मनी आठवाना ॥३॥*
*तुका म्हणे नाम वेदासी आगळे*
*ते दिले गोपाळे फुकासाठी ॥४॥*

आपल्या देहाचा नाश होणार आहे हे जाणून प्रत्येकाने श्रद्धायुक्त अंतःकरणाने नामस्मरण करावे. नामस्मरणाचा फायदा म्हणजे भवसागर तरण्यास मदत होते. त्याचा अनुभव अनेक जणांनी घेतलेला आहे. बरे त्या साधनासाठी काही पैसे मोजावे लागत नाहीत किंवा देहदंडही सोसावा लागत नाही.

श्री विठ्ठलनामाचा महिमा वर्णन करताना संत तुकाराम महाराज म्हणतात -

*विठोबाचे नाम ज्याचे मुखी नित्य ।*
*त्या देखिल्या पतित उद्धरती ॥१॥*
*विठ्ठलविठ्ठल भावे म्हणे वाचे ।*
*तरी तो काळाचि दात ठेची ॥२॥*
*बहुत तारिले सांगो किती आतां ।*
*ऐसा कोणी दाता दुजा नाही ॥३॥*
*तुका म्हणे म्यां ही ऐकोनिया कीर्ति*
*धरिला एकान्ती हृदयामाजी ॥४॥*

श्री विठ्ठलनामाचे स्मरण करणारा भक्त पुण्यवान असतो ते तर सत्यच आहे पण त्याशिवाय त्याच्या सहवासात येणारे पतित त्याच्याबरोबर बोलण्यातून, चालण्यातून आणि वागण्यातून अनेक गोष्टी शिकतात त्यामुळे त्यांचा उद्धार होतो. विठ्ठलनामापुढे काळाचीही डाळ शिजत नाही. विठ्ठलाच्या कृपादृष्टीमुळे अनेकजण तरले. त्याचे दातृत्व ध्यानात घेऊनच तो विठ्ठल आपल्यालाही निश्चित तारणार अशा विश्वासामध्ये एकांतात हृदयरूपी मंदिरात श्रीविठ्ठलाची स्थापना करून नामस्मरणात रंगण्यात मला खरेखुरे समाधान वाटते. त्यानंतर पाखंडी माणसावर कोरडे ओढतांना ते पुढे म्हणतात -

*वाचे विठ्ठल नाही । तोचि प्रेतरूप पाहि ॥१॥*
*धिग त्याचें ज्यालेपण । भार न साहे मेदिन ॥२॥*
*न बैसे कीर्तनी । गुण नाइके जो कानी ॥३॥*
*जातां कंटाळे देऊळा । तोचि सुना मुखकाळा ॥४॥*
*हरिभक्तीविण । जळो त्यांचे शहाणपण ॥५॥*
*तुका म्हणे तेणे । वंशा आणियेले उणे ॥६॥*

जो नामस्मरण करीत नाही तो माणूस जिवंत नसून प्रेतासारखाच आहे. अशा माणसांचा मी धिक्कार करतो. जो माणूस देवाला मानत नाही आणि अभिमानाने पछाडलेल्या अवस्थेत कथाकीर्तनाची टिंगलटवाळी करतो किंवा ज्या भजनात देवाजीचे गुणगायन रंगलेले असते त्या भजनाचा तिटकारा वाटतो, इतकेच नाही तर मंदिरात देवदर्शनास जावे असेही त्याला वाटत नाही. अशाप्रकारे नामस्मरणाची ज्याला गोडी नाही त्याच्या शहाणपणाला काही अर्थ तरी आहे का? असा करंटा माणूस समाजात बदनामच होतो. खरे म्हणजे आपल्या धर्मशास्त्रानुसार वासनांच्या इच्छेसाठी किंवा काही पाप घडले म्हणून पुन्हा जन्माला यावे लागते त्यासंबंधात -

*जन्मा येणे घडे पातकाचे मूळ ।*
*संचिताचें फळ आपुलीया ॥१॥*
*मग वायांविण दुःख वाहो नये ।*
*रुसोनिया काय देवावरी ॥२॥*
*ठाउकाचि आहे संसार दुःखाचा ।*
*चित्तीं क्षीण त्याचा वाहो नये ॥३॥*
*तुका म्हणे नाम त्याचें आठवावे ।*
*तेणे विसरावे जन्मदुःख ॥४॥*

गेल्या जन्मातील आपल्याच कर्मसंचिताचे फळ आपल्यालाच पुढील जन्मी भोगावे लागते. त्यातून कोणाचीच सुटका नाही त्यामुळेच प्राणी जन्ममृत्यूच्या - फेऱ्यात सापडतो. त्याविरूद्ध कोणाचीच काही मात्रा चालत नाही अशा अवस्थेत देवावर रुसण्यात तरी काही अर्थ आहे का? संसारात सुखाचा उपभोग घेत असताना माणसाला दुःखाचा तीव्र तडाखा बसला की जाणवते. संसारात सुखाबरोबर दुःखही भोगावे लागते. अशा अवस्थेत मनस्ताप करण्यात काही अर्थ आहे का? संसारातील दुःख अटळ आहे पण त्या दुःखाची तीव्रता थोडीफार कमी करण्यासाठी एकमेव साधन म्हणजे नामस्मरण. त्या नामस्मरणात भक्त एकाग्रचित्ताने रंगला म्हणजे दुःखाचा आपोआप विसर पडतो.

श्रीविठ्ठल संकटकाळी भक्ताच्या मदतीला धावून जातो -

*हाकेसरसि उडी । घालूनियां स्तंभ फोडी ॥१॥*
*ऐसी कृपावंत कोण । माझे विठाईवांचून ॥२॥*
*करितां आठव । धावोनियां घाली कव ॥३॥*
*तुका म्हणे गीतीं गाता । नामे द्यावी सायुज्यता ॥४॥*

भक्त प्रल्हादाची कथा सर्वांना परिचीत आहे. बालभक्त प्रल्हाद हिरण्यकश्यपूच्या म्हणजेच दानवाच्या पोटी जन्माला आला. देव आणि दानव एकमेकांचे शत्रू, अशा अवस्थेत नारायणाच्या भजनात प्रल्हाद रंगलेला पाहून हिरण्यकश्यपूने संतापाने नामस्मरणापासून प्रल्हाद परावृत्त व्हावा म्हणून कठोर उपाययोजना केली. पण बालप्रल्हादाची नारायणासंबधीची श्रद्धा वाढतच गेली. त्यामुळे तो नामस्मरणात अधिकच रंगत चालला इतकेच नाही तर हिरण्यकश्यपूने केलेल्या कठोर शिक्षा भोगत असतांनासुद्धा त्याने नामस्मरण कधीच सोडले नाही. शेवटी भक्ताची कसोटी पाहिल्यानंतर देवाला त्याची दया आली. हिरण्यकश्यपूने प्रल्हादाला विचारले "तुझा नारायण कुठे आहे?" तेव्हा प्रल्हाद शांतपणे म्हणाला, 'जळी, स्थळी, काष्ठी, पाषाणी सर्वत्र मला नारायणाचेच रूप दिसते आहे.' त्याचे तऱ्हेवाईक उत्तर ऐकून संतापलेल्या अवस्थेत हिरण्यकश्यपूने विचारले, 'त्या खांबात नारायण आहे का?' प्रल्हाद हसत म्हणाला, 'अर्थात निश्चित असणारच.' हिरण्यकश्यपू खांबाकडे त्वेषाने धावला आणि नरसिंह रूप प्रगट करून नारायणानेच त्याचा वध केला. नारायण म्हणजेच विठ्ठल. त्याच्या कृपेचे काय वर्णन करावे. त्याचे स्मरण केले तरी सुद्धा भक्ताच्या संरक्षणासाठी तो धाव घेतो. विठ्ठलमाऊलीला गाणं खूपखूप आवडतं त्यामुळेच भजनात रंगलेल्या भक्ताला सायुज्यता प्राप्त होते. विठ्ठल भक्ताचे दुःख दूर कसा करतो यासंबधी वर्णन पहा-

*भक्त करुणा बहुत तुझिया अंतरा ।*
*मज विश्वंभरा कळो आले ॥१॥*
*पक्षीयासी तुझे नाम जे ठेविले ।*
*तये उद्धारिले गणिकेसी ॥२॥*
*कुंटिणी ते दोष बहु आचरली ।*
*नाम घेतां आली करुणा तुज ॥३॥*
*हृदय कोमल तुझे नारायण ।*

*ऐसे बहुतां जनां तारियेले ॥४॥*
*तुका म्हणे सीमा नाही तुझे दये ।*
*कोमळ हृदय पांडुरंगा ॥५॥*

श्रीविठ्ठलाच्या अंतःकरणात भक्तासंबधीची करुणा खूप मोठ्या प्रमाणात असते ते मला कळले आहे. एखाद्या पक्षाला तुझे नाव ठेवले तर त्यामुळे गणिकेचा उद्धार होतो किंवा कुंटिणीने दोषपूर्ण आचरण केले तरी तिच्या नामस्मरणावर सुद्धा खूष होऊन तिचाही उद्धार तो करतो. कोमल अंतःकरणाच्या नारायणाने आजपर्यंत अनेकजणांना तारले. खरोखरच देवाच्या दयेला सीमा नाही.

श्रीविठ्ठल नामस्मरणामुळे भक्तजनांचा कसा फायदा होतो ते पहा-
*तुटे भवरोग । संचित क्रियमाण भोग ॥१॥*
*ऐसे विठोबाचे नाम । उच्चारितां खंडे जन्म ॥२॥*
*वसों न सके पाप । जाय त्रिविध तो ताप ॥३॥*
*तुका म्हणे माया । होय दासी लागे पाया ॥४॥*

जन्माला आलेल्या मनुष्याला सुखाबारोबर दुःख भोगावेच लागते. त्यावेळी भवरोगाने हैराण झालेला माणूस "नको हा संसार" असे आर्तस्वराने म्हणतो. खरोखरच त्याला संसाराचा तिटकारा वाटत असेल तर त्याने श्रद्धेने श्रीविठ्ठल नामस्मरण करावे. तोच एक रामबाण उपाय जन्ममृत्यूचा फेरा चुकविण्यासाठी आहे. त्यामुळे पापाची बाधा होत नाही आणि त्रिविध तापही सोसावा लागत नाही.

श्रीसंत तुकाराम महाराज विनम्र भावे आग्रहाने म्हणतात -
*लागोनिया पाया । विनविती तुम्हाला ।*
*करे टाळी बोला मुखे नाम ॥१॥*
*विठ्ठल विठ्ठल म्हणा वेळोवेळा ।*
*हा सुखसोहळा स्वर्गी नाही ॥२॥*
*कृष्ण विष्णु हरि गोविंद गोपाळा ।*
*मार्ग हा प्रांजळ वैकुंठीचा ॥३॥*
*सकळांसी येथे आहे अधिकार ।*
*कलियुगी उद्धार हरिनामे ॥४॥*
*तुका म्हणे नामापाशी चारी मुक्ति ।*
*ऐसा बहुतां ग्रंथी बोलियेले ॥५॥*

साधुसंतांचा अवतार भोवतालच्या अज्ञानी जनांचा उद्धार करण्यासाठी असतो. दुराचारी पापी माणसाने सुधारावे म्हणून साधुसंत त्याला प्रार्थना करून विनम्रभावाने त्याच्या चरणावर माथा ठेवून त्या दुर्जनाच्या स्वभावात कौशल्याने बदल घडवून आणतात. श्रीविठ्ठल नामस्मरणाच्या सुखसोहळ्यातील आनंद प्रत्येकाने स्वतःच लुटायचा आहे. नुसत्या वर्णनाने त्याची कल्पना येणार नाही. श्रीविठ्ठलाच्या दरबारात सकलांना समान अधिकार आहे म्हणजेच उच्चनीचपणा किंवा पुण्यवान आणि पापी, पतिव्रता आणि गणिका असा भेदभाव त्याच्यापाशी नाही. कलियुगात स्वतःचा उद्धार करण्यासाठी एकमेव साधन म्हणजे श्रीहरीचे नामस्मरण. एका नामस्मरणामुळे चारी मुक्तींचा लाभ होतो असा विचार अनेक ग्रंथांमध्ये मांडलेला आहे, त्यासाठीच -
*यालागी आवडी म्हणा रामकृष्ण । जोडा नारायण सर्वकाळ ॥१॥*
*सोपे हे साधन लाभ येतो घरा । वाचेसी उच्चारा राम हरि ॥२॥*
*न लागती कष्ट नलगे सायास । करावा अभ्यास विठ्ठलाचा ॥३॥*
*न लगे तप तीर्थ करणे महादान । केल्या एक मन जोडे हरि ॥४॥*
*तुका म्हणे काही न वेचिंता धन । जोडे नारायण नामासाठी ॥५॥*

त्यासाठीच तुम्ही रामकृष्ण म्हणा आणि नारायणाशी संबंध जोडा. श्रीरामहरी उच्चारण्यातच खरा लाभ आहे. त्यासाठी काही विशेष प्रयत्न करावे लागतात किंवा कष्ट सोसावे लागतात असे नाही. उलट श्रीविठ्ठलनामाचा अभ्यास केल्याने जन्म धन्य होतो. श्रीहरीशी जवळचे नाते जोडावयाचे असेल तर तपश्चर्या किंवा तीर्थयात्रा किंवा महादान करण्यात काही अर्थ नाही त्यापेक्षा एकाग्रचित्ताने नामस्मरण करावे -
*विठ्ठल विठ्ठल येणे छंदे । ब्रह्मानंदे गर्जावे ॥१॥*
*वाये टाळ टाळ्या टाळी । होईल होळी विघ्नाची ॥२॥*
*विठ्ठल आदि अवसानी । विठ्ठल मनी स्मरावा ॥३॥*
*तुका म्हणे विठ्ठल वाणी । वदा कानी आइका ॥४॥*

थोडक्यात म्हणजे श्रीविठ्ठलाचे नामस्मरण एकाग्रचित्ताने करावे त्याचसंदर्भात -
*गर्जत जावी नामावळी । प्रेमे टाळी वाहोनि ॥१॥*
*येणे सुखे पुढती धावे । भेटी सवे गोपाळ ॥२॥*
*लोटांगण घाला तळी । वंदा धुळी संताची ॥३॥*
*तुका म्हणे विठ्ठल लाहो । ऐसा बाहो उभारा ॥४॥*

शेवटी नामस्मरणामुळेच भक्ताच्या जीवनात कसा बदल घडून येतो ते पहा -
*फुकाचे ते लुटा सार । व्हा रे अमर सदैव ॥१॥*
*नाही गर्भवास पुढती । गिर जळती दोषांचे ॥२॥*
*उदंड भावे उदंड घ्यावे । प्रेम गावे आवडी ॥३॥*
*तुका म्हणे घरिच्या घरी । देशाउरी न शीणीजे ॥४॥*

श्रीविठ्ठल नामस्मरण म्हणजे सर्वांचे सारच आहे. त्यामुळे अनेक भक्त अमर झाले आहेत म्हणजेच जन्ममृत्यूच्या फेऱ्यातून सुटले. नामस्मरणामुळे दोषांचे पर्वत जळतात पण त्या नामाचे भजन आवडीने केले पाहिजे.

**प्रा. योगेश्वर अभ्यंकर**
४२२, दातार अपार्टमेंट,वकील वाडी,
नासिक ४२२ ००१

दया क्षमा शांति । तेथे देवाची वसती ॥१॥
पावे धांवोनिया घरा । राहे धरूनियां वारा ॥२॥
कीर्तनाचे वाटे । बराडिया ऐसा लोटे ॥३॥
तुका म्हणे घडे । पूजा नामें देव जोडे ॥४॥

# साक्षात्काराची 'स्वप्न' ही जाणिवेची स्थिती. संतश्रेष्ठ तुकारामांना झालेला साक्षात्कार.

ले. केशवचंद्र गंगाधर भडभडे.

**प्रस्तावना :** व्यास म्हणजे 'बोधिसत्व.' यांचे जगत्‌गुरू पदाच्या अधिकारावरचे कार्य पूर्ण होऊन ते बुद्ध या पदवीवर आरूढ झाल्यावर, त्यांच्या अभिनव धर्माचा, भारतभर पायी फिरून, ४५ वर्षे धर्मोपदेश केल्यावर ते समाधिस्थ झाले व जगद्‌गुरू पदाची जबाबदारी भगवान मैत्रेय यांच्यावर सोपवली. जगद्‌गुरू पदावर आल्यावर पहिला जन्म मातेच्या उदरातून घ्यावा लागतो असे कळते. त्याप्रमाणे त्यांनी बालकृष्ण या स्वरूपात वृंदावनात तो जन्म घेतला व सातवर्षे ते वृंदावनाबाहेर गेले नाहींत असा उल्लेख आहे. अर्थात त्यानंतर त्यांनी तो देह हिमालयाच्या दक्षिण उतरणीवरच्या त्यांच्या आश्रमात नेला असावा.

त्यानंतर जीजस् या शिष्याच्या देहाचा उपयोग करून भक्तिप्रधान ख्रिश्चन धर्माचे उद्‌घाटन केले. महाराष्ट्रात मुकुंदराय व ज्ञानेश्वरापासून प्रारंभ होऊन भक्तीचा अत्युच्च उत्कर्षाक, तुकारामांच्या पर्यंत कळसाला पोचला असे दिसते. *ज्ञानदेवे रचिला पाया । तुका झालासे कळस ॥*

जाणिवेच्या जागृत स्वप्न, सुषुप्ती व तुरीया अशा चार अवस्था सांगितल्या आहेत. पार्थिव देहाने मनुष्य भूलोकी जे व्यवहार करतो ते 'जागृत' या स्थितीत होतात. जाणिवेची "स्वप्न" ही स्थिती भुवर लोकांत भावनादेहाने केलेल्या व्यवहाराची निदर्शक आहे. 'सुषुप्ती' ही अवस्था मनोलोकात म्हणजे 'स्वर्ग' लोकात मनोदेहाने (मनाने) केलेला व्यवहार निर्देशित करते. 'तुरीया' ही चतुर्थ अवस्था महर्लोकात, महर्लोकाच्या बुद्धिदेहाने केलेल्या व्यवहाराला लागू असेल. समर्थ रामदास स्वामींनी 'उन्मनी' म्हणजे उत् + मनी - मनाच्या पलीकडच्या जाणिवेच्या अवस्थेचा निर्देश केला म्हणजे ती 'तुरीया' अवस्था असावी.

घराला जसे मजले असतात तसे जाणिवेचे हे चार मजले. प्रत्येक मजल्यावर मनुष्य वेगळ्या देहाने व्यवहार करतो, वेगळे ज्ञान मिळवतो, परिस्थिती वेगळी असते.

जनसेवेचे व ईश्वरप्राप्तीचे ध्येय पुढे होऊन संत जीवनाला शिस्त लावतात. चित्तशुद्धी करून, सद्‌गुरूंच्या सहाय्याने, भक्ती व ध्यानधारणा करून जाणिवेच्या उच्च पायऱ्या चढण्याचा प्रयत्न करतात. जाणीव उच्चलोकात गेली म्हणजे तिच्यात विशालता येते व ती जास्त व्यापक होते.

संत तुकारामांच्या सद्‌गुरूंनी तुकारामांचा शिष्य म्हणून अंगीकार केल्याची हकीकत तुकारामांनी दिली ती अशी :

*संतगुरुराये कृपा मज केली । परी नाही घडली सेवा काहीं ॥*
*सांपडविले वाटे जातां गंगे स्नाना । मस्तकी तो जाणा ठेविला कर ॥*
*भोजना मागती तूप पावशेर । पडिला विसर स्वप्ना माजीं ॥*
*काहीं कळे उपजला अंतराय । म्हणोनिया काय त्वरा झाली ॥*
*राघवचैतन्य केशवचैतन्य । सांगितली खूण माळिकेची ॥*
*बाबाजी आपलें सांगितले नाम । मंत्र दिला रामकृष्ण हरी ॥*
*माघ वद्य दशमी पाहुनि गुरूवार । केला अंगिकार तुका म्हणे ॥*

**अर्थ :** – माझ्या हातून पुरेशी सेवा न घडतांही सद्‌गुरूंनी मजवर कृपा करून माझा शिष्य म्हणून अंगिकार केला. माझ्या प्रगतिपथात काहीं विघ्न आले होते म्हणून माझा शिष्य स्वीकार करण्याची माझ्या गुरूंनी घाई केली. त्या विधीच्या प्रसंगी त्यांनी माझ्या डोक्यावर हात ठेवला, स्वतःची गुरूपरंपरा सांगितली. बाबाजी असे स्वतःचे नाव सांगितले. मला मंत्र दिला 'रामकृष्णहरी.' हा सर्व विधी स्वप्न नावाच्या स्थितीत झाला. शिष्यस्वीकार अनेक दर्जाचे असतात. प्रत्येकाचे वेगळे विधी असतात. त्यातल्या बराचशा गोष्टी इतरास सांगण्यास बंदी असते. तुकारामांच्या परंपरेतल्या लोकांना समजावे म्हणून तुकारामांनी हा अनुभव लिहून ठेवला. सद्‌गुरू शिष्याच्या मस्तकावर हात ठेवतात त्यावेळी एक शक्तीप्रवाह सद्‌गुरूच्या हातातून त्याच्या देहात घालतात. त्यामुळे त्याचा सूक्ष्मदेह आकाराने विस्तारतो व त्यातील सद्‌वृत्तीचे सामर्थ्य वाढते. दिलेल्या मंत्राच्या जपाने स्वीकाराच्यावेळी घडलेल्या प्रक्रियांना उत्तेजन मिळते व त्याच्या प्रगती पथावर त्याला सहाय्य मिळते व मिळत रहाते.

**बाबाजी कोण होते?** (२) परमहंस योगानंद यांनी, 'ऑटो बायॉग्राफी ऑफ ए योगी' नांवाचे पुस्तक प्रकाशित केले होते. त्यांचे गुरू युक्तेश्वर, युक्तेश्वरांचे गुरू लाहिडीमहाशय, व त्यांचे गुरू बाबाजी होते असे त्या पुस्तकात लिहिले आहे. बाबाजी हे महान योगी असून शेकडो वर्षे हयात आहेत. पण ते अगदी तरूण दिसतात असे योगानंदांनी लिहिले आहे. त्यांचा देह कित्येक शतके टिकून आहे. पृथ्वीवर अंतरंगाच्या भूमिकेवर जे कार्य चालते, त्यातले अधिकारी आपला देह असाच टिकवून कार्यक्षम राखतात. पुनःपुनः देह बदलण्यानें त्यांच्या कार्यात सातत्य टिकवणे कठीण असते. व देह चिरतरूण राखण्याचे तंत्र त्यांना अवगत असते.

शिष्यत्वाच्या टप्याशी मनुष्य कसा येतो याचे वर्णन माउली श्री ज्ञानेश्वर महाराज असे करतात. (३) :

*जैसे धरवणीचे सरे । तैसे भोग प्राचीन (पूर्वकर्म) पुरे ॥*
*नवे तव नुपकरे । काहींचि करू ॥*
*ऐसी कर्मे साम्यदशा । होयते वीरेशा ॥*
*मग श्रीगुरू आपैसा भेटेचिगा ॥*

शिष्य होणाऱ्याचे वर्तन असे झाले पाहिजे की, त्याच्या बंधनकारक कर्मात नवी भर पडत नाही व जुने बंधनकारक कर्म भोगून संपत आले आहे. अशा वेळी शिष्याची वाट पहाणाऱ्या सद्गुरूंशी ऋणानुबंध जडतो.

स्वतः शिष्य करून घेऊन त्यांवर अनुग्रह करण्याचा अधिकार पुढे तुकारामांनाही प्राप्त झाला. त्यांची भावी शिष्या बहिणाबाई त्यावेळी कोल्हापुरास होत्या. तुकाराम महाराजांची कीर्ती त्यांच्या कानावर गेली होती व तुकारामांबद्दल एक भक्तिभाव व प्रेमादरही निर्माण झाला असेल. तुकाराम त्यावेळी देहूला होते. त्यांना बहिणाबाईंनी प्रत्यक्ष पाहिलेही नव्हते. पण तुकारामांनी स्वप्नात दर्शन देऊन बहिणाबाईवर अनुग्रह केला. बहिणाबाई त्या विषयी लिहितात (४) -

*ठेउनिया कर मस्तकी बोलला । मंत्र सांगितला कर्णरंध्री ॥*
*कर्तिक वद्य पंचमी रविवार । स्वप्नीचा विचार गुरुकृपा ॥*
*आनंदले मन चिद्रूप कोंदले । उठोनि बैसले चमत्कारें ॥*
*मंत्र आठवती तुकोबा स्वरूपें । स्वप्नामाजी पूर्ण कृपा केली ॥*

त्यानंतर बहिणाबाई देहूस गेल्या असतानां, देवळात तुकाराम महाराज कीर्तन करत होते त्यांना प्रत्यक्ष पाहिले. त्या लिहितात :

*स्वप्नी जो देखिला तेंचि ध्यान तेथ । देखिले नेमस्त पूर्ण दृष्टि ॥*
*तुकोबांचे ध्यान पूर्वी कोल्हापुरीं । जे स्वप्नामाझारी देखियले ॥*
*तेचि ध्यान डोळां प्रत्यक्ष देखोनी । आनंद लोचनी हेलावत ।*

स्वप्नात दर्शन दिलेले तुकाराम महाराज हेच अशी खात्री पटली. म्हणजे स्वप्न खरे होते असे सिद्ध झाले.

कचेश्वर ब्रह्मे यांस, तुकाराम महाराजांनी स्वप्नात अनुग्रह दिला. (५) त्यावेळी दोघेही देहूसच होते. त्यांना प्रत्यक्ष भेटून अनुग्रह करणे सहज शक्य होते. तरीही तुकारामांनी त्यांना स्वप्नात, दोघेही सूक्ष्म देहात असताना, अनुग्रह देऊन शिष्य केले. शिष्याला स्फूर्ती देण्यास स्वप्नस्थिती व सूक्ष्मदेह ही साधने जास्त प्रभावी असतात असे दिसते. अनुग्रहीत शिष्याला सकाळी स्वप्न आठवून तो ते लिहून ठेवितो. अनुग्रहा संबंधी कचेश्वर लिहितात :

*ठेवियला माझ्या माथ्यावरी हात । स्वयें झाला गुप्त स्वप्नामाजी ॥*

म्हणजे अनुग्रहासंबंधीची माहिती त्यांनीं त्यावेळी लिहिली नाही.

भारतरत्न भगवान दासानी 'मिस्टिक एक्स्पीरियन्सेस' नावाचे पुस्तक लिहिले आहे. त्यात ४थ्या अध्यायात प्रारंभीच 'लीलाख्यान' आहे. ते समजण्यासाठी डॉ. ॲनी बेझेंट यांनी काहीं सूचना केल्या आहेत. त्यात त्या म्हणतात :

'आपली जाणीव भूलोकातून भुवर्लोकात भावनादेहात गेली की पृथ्वीवरच्या काहीं क्षणांच्या अवधीत स्वप्न या जाणिवेच्या भूमिकेवर अनेक वर्षांचा अनुभव घेता येतो'. कारण भुवर्लोकातली कालगणना भूलोकातल्या कालगणनेपेक्षा जास्त जलद असते.

एका अवलियाला एका सुलतानाने सांगितले 'मला चमत्कार दाखव' अवलियाने एक पाण्याने भरलेले घंगाळ दरबारात आणवले व सुलतानाला त्यात तोंड बुडवायला सांगितले. अवलियाने सुलतानाचे तोंड पाण्याखाली दाबून ठेवले. सुलतानाचा जीव घाबरा झाला. त्याने तोंड बाहेर काढताच अवलियाने विचारले 'तुला काय वाटले?' सुलतान म्हणाला 'मी महालातून बाहेर पडून खूप दूर गेलो. तेथे मला एक लावण्यवती भेटली. मी तिच्या प्रेमात पडलो व तिच्याशी निकाह लावला. १४ वर्षे आम्ही संसार केला. आम्हाला चार मुले झाली इतक्यात मी दरबारात जागा झालो व सर्व संसार स्वप्नवत् झाला'. एवढा सर्व अनुभव तोंड पाण्यात बुडाल्याच्या काहीं क्षणात आला. या वरून स्वप्न या जाणिवेच्या कालगणनेची थोडीशी कल्पना येऊ शकेल. या पुढच्या सुषुप्ती, तुर्या या जाणिवेच्या अवस्था खूपच विस्तृत कालावधीच्या असाव्यात.

भुवर्लोकात, आपण रोज झोपेत जातो व मृत्यूनंतर पुष्कळ वर्षे आपले भावनिक अनुभव आत्मसात करून त्यांच्यापासून शहाणपण शिकतो. मग भावनिक अनुभव संपल्यावर भावनादेह विरून जातो व जाणीव स्वर्गलोकात केंद्रित होते. तिथे सर्व वैचारिक अनुभव आत्मसात करून त्यापासून शिकण्याजोगे शिकून व योग्यता अर्जित केल्यावर या सर्व अनुभवांचे साररूप, कारणदेहाच्या खजिन्यात संग्रहीत केले जाते. हा कारणदेह मनुष्यजन्म मिळाल्यापासूनच्या सर्व अनुभवांचा खजिना असतो. यानंतर *'क्षीणेपुण्ये मर्त्य लोकं विशंती.'*

पृथ्वीवर सुख दुःखाचे अनुभव घेऊन अत्यंत कंटाळलेला मनुष्य सुद्धा पुनः अनुभवाची भूक लागल्यामुळे - *'तुका म्हणे गर्भवासी, सुखे घालावे आम्हासी'*, या स्थितीला येऊन बालकरूपाने पुनःजन्म घेतो व एका नवीन जन्माला येऊन नवीन उमेदीने नवीन अनुभवांना सामोरा जातो.

'जागृत' नंतर 'स्वप्न' या जाणिवेविषयी, तुकाराम महाराजांनी त्यांना मिळालेल्या साक्षात्काराविषयी व त्यांनी शिष्यांवर केलेल्या 'स्वप्न' या भूमिकेवरच्या अनुग्रहाविषयी थोडीशी कल्पना वाचकांना आली असावी असे वाटते. भुवर द्रव्याचा भावनादेह अत्यंत सूक्ष्म व तरल असल्यामुळे, त्या देहाने पृथ्वी प्रदक्षिणा करायला एकादे मिनिट पुरेसे होते. पृथ्वीवरच्या काहीं क्षणातच साक्षात्कार व अनुग्रह हे संपन्न होतात. पण ते इतके परिणामकारक असतात की ते कधीच विस्मृत होऊ नयेत. इत्यलम् ।

**सद्गुरूविषयी महात्मे काय म्हणतात?**

**श्री समर्थ रामदास स्वामी** .... सद्गुरु तो अमर्याद.

**श्रीमत् शंकराचार्य** - दक्षिणामूर्ती स्तोत्रः

गुरोस्तु मौनं व्याख्यानं शिष्यास्तु छिन्न संशय :-१२.

मौनं व्याख्या प्रकटित परब्रह्म तत्वं युवानम् :- १५.

**भगवान पतंजलि.**

क्लेश कर्म विपाका शयै रपरामृष्ट : पुरुषविशेष ईश्वर : १-२४

पूर्वेषामऽपि गुरू : कालेनानवच्छेदात् १ - २६

**डॉ. जॉर्ज एस्. अरंडेल** - थिऑसॉफिकल सोसायटीचे तिसरे आंतरराष्ट्रीय अध्यक्ष

भगवान चाक्षुष मनूंचे स्वप्रभूमिकेवर दर्शन.

मध्य चीनमधील त्यांच्या किल्लेवजा आश्रमात प्रवेश झाल्यावर त्यांच्या प्रभामंडलात बसले असतानां निःशब्द नीरवशांततेत त्यांच्या कडून आवश्यक संदेश मनोमन मिळाला. अर्थातच त्या आदेशाची पूर्तता अविलंब झाली.

प्रत्येक मन्वंतराला एक मनु असतात, व एका महामानव वंशाच्या निर्मितीपासून त्याच्या अंतापर्यंत त्या मानव वंशाच्या उत्क्रान्तीची संपूर्ण जबाबदारी त्यांच्यावर असते. ५व्या म्हणजे आर्य वंशाचे मनु भगवान वैवस्वत आहेत. चौथ्या पीतवर्णी महामानव वंशाचे (चिनी, जपानी, नेपाळी, ब्रह्मी, भूतानी आदिंचे) मनु भगवान चाक्षुष मनु आहेत. यांची माहिती पुराणान्तरी आहे. पृथ्वीवर या मानववंशाची लोकसंख्या सर्वजास्त आहे.

तुकाराम महाराज प्रश्नांची उकल किती सहज करत असत.

*कोणे केली बाळा दुग्धाची उत्पत्ती?*
*वाढवी श्रीपती सवे दोनी ।*
*'जन हे सुखाचे, दिल्या घेतल्याचे ।*
*बा अंत काळचे कोणी नाहीं ॥*

लेखातले संदर्भ - महाराष्ट्रातील संत व त्यांचे साक्षात्कार ले. राजाराम सखाराम भागवत. ठाणे. (आवृत्ती २री १९६१)

१) तुकाराम महाराज. ४ - तुकाराम गाथा आवटे क्र. ३७०९ जोग ३४२७ (गाथापंचक)

२) बाबाजी कोण होते? पृ. ५७ - तळटीप १

३) शिष्यत्वाच्या टप्प्याशी मनुष्य कसा येतो? ज्ञानेश्वर - पृ.५३ ज्ञानेश्वरी (१९२७ - साखरे यांची आवृत्ती १८, ९६५ - ९६६).

४) बहिणाबाईवर स्वप्नात अनुग्रह : पांगारकरकृत मराठी वाङ्मयाचा इतिहास. (खंड ३ पृ. १६ - १७).

५) कचेश्वर ब्रह्मे - अनुग्रह : पांगारकर कृत मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड ३. पृ. ३३.)

**केशवचंद्र गंगाधर भडभडे.**
२०२, गंगातारा अपार्टमेंट,
९१७/७, गणेशवाडी,
डे. जि. पुणे. ४११ ००४.

# श्रीरामनामाचा १३ कोटी जप व श्रीरामदर्शन

डॉ. वा. रा. अंतरकर

श्री ज्ञानेश्वर महाराजांनी ज्ञानेश्वरीचे शेवटी 'पसायदान' मागितले आहे. त्याचप्रमाणे श्रीसमर्थांनी देह सोडण्यापूर्वी थोडा वेळ (माघ व ९, शके १६०३ = सन १६८१) श्रीरामरायाजवळ एक मागणे मागितले. 'पसायदाना' इतकेच तेही प्रसिद्ध आहे. ते पुढीलप्रमाणे आहे:

*आज्ञेप्रमाणें परमार्थ । केला जाण म्या यथार्थ ॥*
*आतां देहाचा कंटाळा । आला असे जी दयाळा ॥*
*आतां एकचि मागणें । कृपा करुनियां देणें ॥*
*ज्याची दर्शनाची आशा । त्याची पुरवावी इच्छा ॥*
*ऐक सखया वचन । त्यासी देईन दर्शन ॥*
*तेरा अक्षरी मंत्राचा । जप करील जो साचा ॥*
*गणना होतां तेरा कोटी । त्यासी भेटेन मी जगजेठी ॥*
*भय न धरावें मनीं । बहु बोलिलों म्हणुनी ॥*
*नलगे आसनीं बैसावें । नलगे अन्नही त्यागावें ॥*
*येतां जातां धंदा करितां । जपसंख्या मात्र होतां ॥*
*तेरा कोटी गणना तेचि । पापें निरसती जन्मांतरींची ॥*
*त्यासि देईन दर्शन । तत्काळचि मुक्त होणें ॥*
*ऐसा वर होतां जाण । दास झाला सुखसंपन्न ॥*

यात श्रीरामदर्शन केव्हां व कसे होईल ते सांगितले आहे. *"श्रीराम जयराम जयजयराम"* या त्रयोदशाक्षर मंत्राचा १३ कोटि जप जो पूर्ण करील त्याला ती संख्यामात्र पूर्ण होतांच श्रीरामदर्शन होईल व त्यानें त्याचीं जन्मजन्मांतरींची सर्व पापे नष्ट होऊन तो तत्काल मुक्त होईल असे श्रीरामरायाचे अभिवचन यांत आहे.

या वचनांत (जप करील जो) 'साचा' असा एक शब्द आहे. 'साचा' म्हणजे 'सत्य' म्हणजे 'बरोबर' किंवा 'योग्य' (पद्धतीने) असा अर्थ होतो. परंतु, 'योग्य' म्हणजे नेमके काय हे स्पष्ट होत नाही. मात्र, याला (म्हणजे १३ कोटी जपाला) कोणतेही (उदा. गायत्रीमंत्राच्या जपाला बन्धने असतात त्याप्रमाणे) बन्धन नाही. तो येता जाता कसाही केला तरी फक्त जपसंख्या पूर्ण होणे ही एकच अट त्यांत सांगितली आहे.

श्रीसमर्थांनी स्वतः टाकळी येथें सकाळी सूर्योदयापासून दुपारी १२ वाजेपर्यंत गायत्रीजप करून त्यानंतर त्रयोदशाक्षर मंत्राचा १३ कोटी जप १२ वर्षांत पूर्ण केला असे त्यांचे चरित्रग्रंथावरून समजते. ते दर तासाला सहा हजार श्रीरामनामाचा जप करीत असत असे पुष्कळ वर्षांपूर्वी त्यांच्या संप्रदायांतील प्रसिद्ध गोसेवक श्रीचौंडे बुवांनी सांगितले असल्याचे आम्ही ऐकले आहे. श्रीसमर्थांसारख्या सर्वच प्रकारची (शारीरिक, मानसिक व बौद्धिक) असामान्य धारणा असणाऱ्या लोकोत्तर पुरुषांना काहीही शक्य आहे. परंतु सर्वसामान्य मनुष्य दर तासाला ३ ते ४ हजार इतकाच जप करू शकतो असे त्याविषयी एकदा पुष्कळच जप करणाऱ्यांच्या चर्चेत एकमत झाल्याचे आम्हास माहीत आहे. अर्थात अशा माणसाचे बाबतीत १२ वर्षांत १३ कोटी जप पूर्ण करण्याची अट मात्र नाही. ती संख्या तो कितीही वर्षांत पूर्ण करू शकतो. श्रीगोंदवलेकर महाराजांच्या संप्रदायातील दोन - तीन इसमांनी ही संख्या पूर्ण केली होती असे आम्ही ऐकले आहे. यापैकी दोघांचा तरी आम्हांस चांगला परिचय असूनही आम्ही त्यांना याबद्दल किंवा श्रीरामदर्शनाबद्दल प्रत्यक्ष विचारले मात्र नाही. त्यांचेच एक अतिशय अंतरंगांतील शिष्य (कै.) श्री. भाऊसाहेब केतकर यांनी सुमारे ११ कोटी जप पूर्ण केला होता असे प्रा. के. वि. बेलसरे यांनी आपल्या प्रवचनांतून सांगितलेले आम्ही ऐकले आहे.

सर्वांनाच १३ कोटी इतका जप करावा लागतो असेही नाही. श्री महाराजांचे (गोंदवलेकर) पट्टशिष्य श्रीब्रह्मानंद महाराज (मूळचे श्री. अनन्तभट्ट गाडगोळी किंवा अनन्तशास्त्री, विजापुरांतील जालिहाल येथील एक कानडी गृहस्थ) यांना श्रीमहाराजांनी फक्त दीड कोटी जपच करावयास सांगितला होता व त्यानेच त्यांचा ग्रंथिभेद झाल्याचे (म्हणजे त्यांनी परमार्थाचे साध्य गांठल्याचे) श्रीमहाराजांना पत्रद्वारा कळविले होते. तसेच, श्रीमहाराजांचाच फारसा प्रसिद्ध नसलेला असा श्री. नारायण नावाचा एक शिष्य याला त्यांनी (त्रयोदशाक्षर) मन्त्रोपदेश देऊन नरसोबावाडीला जाऊन दीड कोटी जप करून येण्यास सांगितले होते. त्याप्रमाणे करून तो गोंदवल्यास परत आला व त्यानंतर थोडे दिवसांतच तो तेथेच वारला. त्यावेळी तो सुमारे १७ - १८ वर्षांचा होता. तो गेल्यानंतर श्रीमहाराजांचे सांगण्यावरून त्याचे हातांत जपमाळ दिली असता ती ओढली जात असल्याचे अनेकांनी पाहिले. श्रीमहाराजांनी तेथे जमलेल्या सर्वांना 'तो जीवन्मुक्त आहे, त्याला सर्वांनी नमस्कार करावा' असें सांगितले.

श्री महाराजांनीच (गोंदवलेकर) दिलेल्या एका दृष्टांताप्रमाणें एखाद्या माणसाला १३ मैलांवर राहात असलेल्या एका गृहस्थास भेटावयाचे आहे व म्हणून त्या ठिकाणी जाण्याकरता जाणकारांकडून समजलेल्या मार्गाने तो जायला निघाला. परंतु साडेतीन मैलांवर तोच गृहस्थ स्वतः येऊन त्याला भेटला तर त्याला पुढे जाण्याचे कारणच नाही. परंतु असे अपवाद अगदी बोटांवर मोजण्याइतकेच असू शकतात. याचे उलट, १३ मैलांचे सर्व अंतर चालून गेल्यावरही जर तो गृहस्थ भेटला नाही तर रस्ता चुकला की त्या माणसाचा पत्ता बरोबर नव्हता अशासारख्या शंका उत्पन्न होणे स्वाभाविक आहे.

फार वर्षांपूर्वी (५० वर्षांपूर्वीही असेल) असे १३ कोटी जप पूर्ण केलेले परंतु त्यांना श्रीरामदर्शन न झालेले असे पुष्कळ लोक महाराष्ट्रांत आहेत असे केसरीत वाचल्याचे आमचे वडील सांगत असत. त्यांनी त्यांचे गुरू श्रीगोंदवलेकर महाराज यांना याबद्दल विचारले असता "त्यांची काहीतरी चूक झाली असली पाहिजे" इतकेच उत्तर त्यांनी दिले. व्यक्तिगणिक चूक वेगळी असूं शकते, म्हणून यापेक्षा वेगळे उत्तर देता येण्यासारखे नव्हते व नाही. जपांत होणाऱ्या संभाव्य चुकांचे बाबतीत पुढील गोष्टी लक्षात घेण्यासारख्या आहेत :

१) जप मोजण्याकरता बहुधा १०८ मण्यांची, ५०० मण्यांची किंवा १००० मण्यांची माळ वापरली जाते. परंतु पुष्कळ वेळा असे आढळून आले आहे की १०८ मण्यांची माळ ओढून पूर्ण होते परंतु तितक्या वेळा त्रयोदशाक्षर मंत्र उच्चारला जात नाही. अगदी काळजीपूर्वक जप करणाऱ्यांचे बाबतीतही ७५ ते ८० वेळाच मंत्र उच्चारला गेलेला असतो. याहीपेक्षा कमी वेळां मंत्र उच्चारणारे लोकही कमी नाहीत. ५०० मण्यांची माळ ३ मिनिटांत संपविणारे, म्हणजेच ताशी १०,००० जप पूर्ण करणारे व तसेच ताशी ८००० जप पूर्ण करणारे आम्ही प्रत्यक्ष पाहिले आहेत. त्याचप्रमाणे, पुष्कळ वेळा जप करतांना बोलले जाते परंतु माळ फिरवणे मात्र चालू राहाते. अशा प्रकारचा जप संख्येच्या दृष्टीने सदोषच म्हणावा लागेल. जे १०८ मण्यांच्या माळेच्या बाबतीत खरे आहे ते इतर माळांनाही लागू आहेच.

२) सज्जनगड येथील श्री. श्रीधरस्वामींची पत्रे प्रसिद्ध झाली आहेत. त्यांत एका इसमाने त्यांना रामदर्शनाबद्दल विचारलेल्या अशाच एका प्रश्नाचे त्यांनी पुढील आशयाचे उत्तर दिले आहे : जप चालू असता शक्तिसंचय होत असतो. परंतु त्या काळांत त्या माणसावर एकादा कठिण प्रसंग आला तर जपाचा संबंध लावला जातो व तो प्रसंग निवारण व्हावा अशी इच्छा उत्पन्न होते. त्याप्रमाणे तो निवारणही होतो. परंतु त्याकरतां केलेल्या जपापैकी कांही जप खर्च होतो व मग जपसंख्येत घट होते. १३ कोटी जप पूर्ण होईपर्यंत अशी घट किती झाली ही, किंबहुना अशी घट होत असेल हेही त्या माणसाला कळत नाही. परंतु रामदर्शन न होण्याचे संख्येच्या दृष्टीने ते एक महत्त्वाचे कारण असू शकते.

३) शास्त्रग्रंथांत निरनिराळ्या प्रकारची अनुष्ठाने व पुरश्चरणे सांगितली आहेत. ती करावयाच्या काळांत ते अनुष्ठान किंवा पुरश्चरण करणाऱ्या इसमाने पाळावयाचे असे नियम घालून दिलेले आहेत. त्यांतील कांही अंतरंगाचे तर कांही बहिरंगाचे असे आहेत. त्यांत त्या काळांत राग येऊ न देणे हा एक नियम होता. राग झाला व त्या भरांत तो कांहीतरी बोलून गेला तर ते खरे होऊन त्याची शक्ति खर्ची पडण्याची शक्यता असते व त्याच्या कार्यात खंड पडतो. पुराणांतरी ऋषी लोक तपश्चर्या करीत असता त्यात विघ्न म्हणजे शक्तिक्षयाने खंड पाडण्याकरता म्हणून इन्द्र त्याचेकडे अप्सरा पाठवीत असे, अशा कथा आहेत. त्यातील बीजही हेच आहे. एक तर कामवासनेला बळी पडून ऋषी भोगाला प्रवृत्त तरी होत असे किंवा रागाने शाप तरी देत असे. दोन्ही पक्षी शक्तिक्षय होऊन तपश्चर्येत घट होत असे व खंड पडत असे. शुक्राचार्यासारखा एखादाच दोहोंपैकी - काम व क्रोध - एकालाही बळी न पडता निर्विकार व अविचल राहात असे. एरवीसुद्धा, विशेष प्रमाणांत जप वगैरे करणाऱ्या माणसाला कांही निमित्ताने नुसता फार राग आला तर त्याचा परिणाम होऊन शक्ती खर्च होते असे धूतपापेश्वर येथील प्रसिद्ध सत्पुरुष श्री. काका पुराणिक व श्रीगोंदवलेकर महाराज यांनी सांगितले आहे. इतकेच काय परंतु अशा माणसाने अगदी सहज उच्चारलेली शुभवाणी कधीकधी अगदी अकल्पित रीतिने खरी होते. परंतु त्यामुळे त्याची शक्ती खर्च होतेच. यामुळेच विशेष साधना करणाऱ्या माणसाने अशा सर्वच बाबतीत अतिशय सावध राहाणे अगदी जरूर असते. श्रीमहाराजांनी 'काहीतरी चूक झाली असली पाहिजे' असे म्हटले त्यातील आशय अशाच प्रकारचा असला पाहिजे आणि तदनुषांगाने 'जप करील जो साचा' यांतील 'साचा' शब्दांतील भावार्थही अशाच प्रकारचा असला पाहिजे असे वाटते.

आतां जप होऊनही प्रत्यक्ष श्रीरामदर्शन न झालेल्यांबद्दल थोडेसे.

सन १९३३ मध्ये आम्ही (माझे आईवडील, माझा धाकटा भाऊ चि. प्रभाकर आणि मी ) सज्जनगडावर गेलो होतो. त्यावेळी आमचे वडिलांनी १३ कोटी जप केल्याने श्रीरामदर्शन झाल्याबद्दल अनुभव आलेला कोणी तेथे असल्यास किंवा त्यांना माहीत असल्याबद्दल तेथील एका गृहस्थांना विचारले तेव्हा त्यांनी पुढील हकिकत सांगितली :

१) दक्षिण हैद्राबादहून एक इसम काही काळापूर्वी तेथे आला होता. त्याचे म्हणण्याप्रमाणे त्याने एकूण त्रयोदशाक्षर मंत्राचा २७ कोटी जप पूर्ण केला होता आणि तरीही त्याला रामदर्शन झाले नव्हते आणि म्हणून तो त्याबद्दल स्पष्टीकरण मागण्याकरता तेथे आला होता. श्रीसमर्थांचे समाधीसमोर अन्नपाणी वर्ज करून समाधान होईपर्यंत तो बसणार होता. (त्या वेळी समाधीपर्यंत आंत जाऊ देत असत ). त्याप्रमाणे तो बसला असता पांचवे दिवशी अगदी पहांटे त्याला ग्लानि आल्यासारखे झाले आणि त्याचेसमोर श्रीमारुतिराय प्रकट झाले. ते त्याला म्हणाले, 'तुझा जप झाला आहे हे खरे आहे परंतु त्यांत चूक झाली आहे व म्हणून तुला रामदर्शन झालेले नाही'. तेव्हा तो त्यांना म्हणाला, "मी, एक अज्ञानी आहे परंतु तुम्ही तर ज्ञानी आहांत ना? मग चूक झाली तर ती मला वेळीच दाखवून देऊन दुरूस्ती करण्याचे काम तुमचे नव्हते का? २७ कोटी जप पूर्ण होऊन मी येथे येऊन ५ दिवस धरणे धरीपर्यंत तुम्ही काय करीत होता? आतां मला चूक झाली आहे असे सांगता.' तरी आता मी ऐकणार नाही." त्यानंतर श्रीमारुतिराय अदृश्य झाले. ९व्या दिवशी (किंवा ९ दिवसांनंतर) तो इसम बाहेर येऊन परत जाऊ लागला तेव्हा त्याला 'काय झाले' असे विचारले असता 'मी ज्याकरतां आलो होतो ते माझे काम झाले. यापेक्षा अधिक सांगता येत नाही' असे सांगून तो निघून गेला.

२) गोंदवल्यास श्री. कासेगांवकर या नावाचे एक वैद्य येत असत. ते अतिशय सात्त्विक गृहस्थ असून त्यांनी १३ कोटी जप पूर्ण केला होता. परंतु त्यांना रामदर्शन झाले नव्हते म्हणून त्यांनी त्याबद्दल श्रीमहाराजांना विचारले. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, 'दर्शन होण्याबद्दल श्रीसमर्थांचे वचन

आहे (माझे नाही). तरी त्यांना जाऊन विचारावे. परंतु रामदर्शन याचा तरी खरा अर्थ काय? राम हे अखंड समाधानाचे प्रतीक आहे, आणि खरे रामदर्शन म्हणजे अखंड समाधानाची प्राप्ति होय. तरीही सज्जनगडावर जाऊन यावे', त्याप्रमाणे ते गेले व परत आल्यावर आपले समाधान झाले असे त्यांनी श्रीमहाराजांना सांगितले.

३) "श्रीमहाराजांचे संप्रदायांत अतिशय जप करणारी ३/४ च माणसे आहेत व त्यांत तुमचे वडील एक आहेत" असें श्री. तात्यासाहेब केतकर एकदां खुद्द आमचे जवळ म्हणाले होते. त्यांचा जप १५ कोटीचे वर झाला होता असे ते म्हणत असत. तरीही रामदर्शन न झाल्याबद्दल त्यांनी एकदां श्रीमहाराजांना विचारले असता श्रीमहाराज म्हणाले, "जो इसम (पुरुष) दिसतो तो राम आहे असे वाटते का?" अर्थातच या म्हणण्याचा भावार्थ वडिलांचे लक्षांत आला नाही. जो जो मनुष्य दिसतो तो रामरूप दिसणे हे खरे रामदर्शन आहे असे त्यांचे म्हणणे असावे असे वाटते. सगुणरूप दिसणे हे अंतिम सत्य नाही. श्रीनामदेवांजवळ श्री पांडुरंग प्रत्यक्ष अनेकदां बोलत असूनही संतांच्या मेळाव्यात ते कच्चे मडकेच ठरले. किंबहुना सगुणदर्शनाची इच्छा ही सुद्धा वासनाच आहे आणि ती शिल्लक राहिली तर पुनर्जन्म अटळ आहे असे श्रीमहाराजांचे म्हणणे होते.

भक्तिमार्गात अभिप्रेत असलेल्या उपासनेचा नामस्मरण हा प्राण आहे. १३ अक्षरी श्रीरामनाममंत्राचा १३ कोटी जप हा त्या नामस्मरणाचा एक विशिष्ट प्रकार अथवा अविष्कार आहे. श्रीरामदर्शन हे त्याचे अपेक्षित फळ आहे. सर्वसामान्य माणसाला रामदर्शन होणे, म्हणजे श्रीरामाच्या सगुणरूपाचे दर्शनच फक्त माहीत असते व म्हणून तेवढेच अभिप्रेत असते. त्याप्रमाणे ते लोकांना होत असेलही. १९९४ च्या 'गजानन आशिष'च्या दिवाळी अंकात नासिक येथील श्री. भाऊराव करी या नांवाच्या गृहस्थांना अशा प्रकारचे श्रीरामदर्शन झाल्याचा तपशीलवार वृत्तांत दिला आहे. परंतु रामदर्शनाचा खरा आध्यात्मिक अर्थ वेगळा असून संतांच्या दृष्टीने तो काय आहे हे वर दिग्दर्शित केले आहे. किंबहुना एकंदर उपासनेचे किंवा आध्यात्मिक साधनेचे खरे फळ किंवा पर्यवसान कशात आहे हेही सामान्यांना परिचित नसते. म्हणून वरील विषयाशी अगदी प्रत्यक्ष संबंध नसला तरी ते काय म्हणून संतांना अभिप्रेत आहे याबद्दल कांही हकिकती उद्बोधक वाटल्यावरून पुढे देत आहे.

१) एकदां एक वारकरी श्रीमहाराजांना भेटू इच्छीत होता. त्याला त्यांना काही विचारावयाचे होते. भेट झाली तेव्हा तो श्रीमहाराजांना म्हणाला, "मी पंढरपुरचा वारकरी असून 'रामकृष्ण हरि' या षडक्षरी मंत्राचा मी जप करीत असतो. गेली २० वर्षे मी याप्रमाणे जप करीत आहे परंतु आजवर मला त्याचा काहीही अनुभव नाही, हे कसे?" तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, "तुम्ही परस्परविरूद्ध बोलत आहांत". परंतु त्यांच्या बोलण्याचा भावार्थ त्याचे लक्षांत आला नाही. तेव्हा श्रीमहाराज म्हणाले, "खरें म्हणजे देवाचे नांव तोंडून येणे ही त्याचीच कृपा असते. ते नांव तुमचे तोंडून २० वर्षे सतत येत आहे ही त्याची केवढी कृपा आहे? हा काय थोडा अनुभव आहे? आणि तरीही तुम्ही अनुभव नाही असें म्हणता हे कसे? यापेक्षा कोणता वेगळा अनुभव तुम्हांस पाहिजे? परंतु हा जप मी करतो असे तुम्हास वाटत असल्याने अनुभव येऊनही तो आला नाही असे तुम्हास वाटत आहे. नामाचा खरा अनुभव नामातच आहे व तो नामाव्यतिरिक्त जगांतील बाह्य गोष्टीत पाहाणे बरोबर नाही" येथे गीतेतील "सततं कीर्तयन्तो माम्" (९ : १४) या श्लोकावरील (हे भक्ताचे वर्णन आहे) याच शब्दांचे स्पष्टीकरण असलेली पण वरचेच तत्त्व सांगणारी ज्ञानेशांची पुढील ओवी प्रकर्षाने आठवते:

*जयांचे वाचेपुढां भोजें । नाम नाचत असे माझें ।*
*जें जन्मसहस्त्रीं वोळगिजे । एक वेळ मुखासि यावया ॥* ९:२०६

२) गदग येथील श्री. ब्रह्मानंद महाराजांचे पुतणे श्री. भीमराव गाडगोळी यांनी १३ कोटी जप पूर्ण केला होता असे ऐकले होते. जून १९६१ मध्ये त्यांचे गदग येथेच देहावसान झाले. त्या वर्षी एप्रिलमध्ये श्रीरामनवमीनंतर आम्ही काही दिवस त्यांचे घरी राहिलो होतो. तेथून मी हुबळीला जाऊन मग गोंदवल्यास जाणार होतो. निघण्याचे दिवशी दुपारी ३ चे सुमारास मी त्यांचा निरोप घेण्यास गेलो असता, मी गोंदवल्यास जाणार असल्याचे त्यांना सांगितले. तेव्हा ते म्हणाले, 'मग तेथें तुमची व श्रीमहाराजांची गाठ पडेलच.' मी 'हो' म्हटल्यावर ते म्हणाले, 'त्यांना माझा निरोप सांगा की 'भीमराव फार घाबरले आहेत व त्यांनी तुम्हांस इकडे लवकर बोलाविले आहे.' त्या प्रमाणे मी गोंदवलेस गेल्यावर निरोप सांगितला व श्रीमहाराजही जून महिन्यांत गदगला गेले. भेट झाल्यावर श्री. भीमराव त्यांना म्हणाले, 'अंतकाळी भगवंताचे स्मरण होईल की नाही याची भीति वाटते.' तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, 'ही भीति वाटणे हे उपासनेचे खरे फळ आहे. तुम्ही काळजी करू नये. राम तुमच्या उशाशी आहे. केव्हाही हाक मारावी.' त्यानंतर थोड्याच दिवसांत त्यांचे अगदी शांतपणे देहावसान झाले.

३) बंगलोरहून सुमारे ४० मैलांवर चिंतामणि या नांवाचे एक तालुक्याचे गांव आहे. तेथील त्यावेळचे रहिवासी श्री. गर्जूर वेंकण्णिया यांनी तेथे सन १९४९ मध्ये एक सुंदर श्रीराममंदीर बांधले आहे. ते बांधण्यापूर्वी त्यांनी स्वतः १३ कोटी व तेथील इतर लोकांकडून ९ कोटी असा एकूण २२ कोटी जप पूर्ण केला होता, असे त्यांनी मला स्वतः सांगितले. त्यांचा चेहरा वयापरत्वे अगदी सुरकुतलेला होता. परंतु त्यावर एक प्रकारचा विलक्षण शांततेचा भाव होता व त्यांचेजवळ बोलत बसावेसे वाटे. त्यांच्या गुरूंनी म्हणजे श्रीमहाराजांनी त्यांना एक छोटेसे पत्र पाठविले होते. त्यातील काही भाग असा आहे. "तुम्ही बहुत साधन केले. आता तुम्हांस करावयाचे उरले नाही. बाकीचे मी करीन. तुम्ही शक्य तेवढा जप करावा.... उपासना मंदिराची शोभा आहे. मनापासून नाम घेणे ही उपासना आहे. उपासना उत्तम चालवा. महात्मे मंदीर पाहून जातील."

कोणतेही साध्य गाठण्यास साधन अवश्य लागतेच. त्याशिवाय कोणतेच साध्य गाठता येत नाही. जसे साध्य असेल त्याप्रमाणे साधन असावे लागते. माणसाची सर्व धडपड निर्भेळ व शाश्वत समाधान मिळविण्याकरता असते. ते सुख वा समाधान तो जगातील दृश्य गोष्टीत

- त्यांना विषय म्हणतात – सतत शोधीत असतो. परंतु त्या सर्व गोष्टी सुखदु:खमिश्रित व थोडा काळ टिकणाऱ्या असल्यामुळे त्याचे उद्दिष्ट केव्हाही प्राप्त होत नाही. संतांच्या म्हणण्याप्रमाणे फक्त परमात्मा किंवा सद्वस्तु स्वतः शाश्वत व निर्मळ सुखस्वरूप असल्याने तोच माणसाला खरे हवे असलेले सुख अथवा समाधान देऊ शकेल. म्हणून परमार्थाचे साध्य परमात्मा आहे. तो अत्यंत सूक्ष्म आहे. (अतीव सूक्ष्मं परमात्मतत्त्वम्। श्रीशंकराचार्य - विवेकचूडामणि) त्यामुळे त्याचे साधनही अत्यंत सूक्ष्मच असले पाहिजे. तसेच, परमात्मा हा अशा रीतीने सर्वांचेच साध्य असल्याने ते सर्वांना खुले असले पाहिजे. त्याचप्रमाणे ते साधन आपल्याजवळ असले पाहिजे व परमात्म्याशी जोडलेले असले पाहिजे. संतांच्या सांगण्याप्रमाणे असे साधन फक्त एक नामच आहे. ते परमात्म्याला व आपल्याला - दृश्याला व अदृश्याला - सगुणाला व निर्गुणाला जोडणारा दुवा आहे. (अगुन सगुन बिचु नाम दुसाखी / कबीर).

आज आपण जें नाम घेतो त्या शब्दापासून खुद्द परमात्म्यापर्यंत नामाची व्याप्ति आहे. सर्व कांही नामाने व्यापलेले आहे, किंबहुना सर्व कांही नामच आहे. एका नामाने परमार्थाचे खरे व अखेरचे ध्येय गाठेल अशी खऱ्या अर्थाने म्हणजे अगदी अंतरापासून खात्री होणे ही फार भाग्याची गोष्ट आहे. नाम किती घेतले म्हणजे परमात्म्याचे - श्रीरामाचे - दर्शन होते ते श्रीसमर्थांनी सांगितले. याप्रमाणे श्रीरामदर्शन आजवर कोणाला तरी झाले असेल किंवा पुढेही होईल. आणि श्रीरामांनी सांगितल्याप्रमाणे त्याने तो मनुष्य तत्काळ मुक्त होईलच यात शंका घेणे योग्य नाही. परंतु हा विशेष नियम झाला. सामान्यतः संतांचे दृष्टीने सगुणदर्शन हा परमार्थातील साधनेचा खरा शेवट नाही. किंबहुना म्हणूनच रामदर्शन म्हणजे खरे काय याचेही स्पष्टीकरण श्रीमहाराजांनी केले आहे. खरे रामदर्शन म्हणजे अखंड समाधानाची प्राप्ति होय असे त्यांचे म्हणणे आहे. त्यालाच परमात्मप्राप्ति, ब्रह्मज्ञान किंवा आत्मज्ञान - प्राप्ति, शाश्वत सुख वगैरे नावे आहेत. परंतु सामान्य माणसाला या ध्येयाचे खरे स्वरूप काय आहे हे माहीत नसते. म्हणून या क्षेत्रातील खरे जाणकार असे जे संत त्यांचे शद्बावर पूर्ण विश्वास ठेऊन (मग कोणी त्याला अंधश्रद्धा का म्हणेना) प्रामाणिकपणे आपल्याला होईल तितके साधन - नामस्मरण - करावे. त्याचे फळ काय, केव्हा किंवा कसे मिळणार वगैरे गोष्टींची चिकित्सा करू नये. या सर्व गोष्टी गुरूवर सोपवाव्या. त्यांना योग्य ते, योग्य वेळी करतील ही खात्री बाळगून साधन हेच साध्य मानून ते करीत राहावे हेंच, साधन हेंच साध्य होणें आहे. १३ कोटी जपासारखे उद्दिष्ट आपल्यासमोर ठेवण्यास हरकत नाही. परंतु त्याच्या परिणामाचा आग्रह धरू नये. बहुतेक वेळी असे ध्येय ठेवून नामस्मरण करणाऱ्यांचे ध्येय शेवटी दृश्यातीलच राहाते असे दिसते. परंतु खरे ध्येय पलीकडेच असते. एरवीसुद्धा ठराविक संख्येचा नियम करायचा, तो सुद्धा कांही कमीत कमी जप हातून व्हावा, म्हणून असावा. शेवटी नामस्मरणात स्वतःच्या देहाचाही विसर पडावयाचा असतो. तेथे संख्या अनिवार्य असणे शक्य नाही. आणि वर म्हटल्याप्रमाणे सर्वांनाच १३ कोटीपर्यंत वाट पहावी लागेल असेही नाही. शेवट गाठेपर्यंत - तो गाठला की ते स्वतःचे स्वतःलाच समजते - साधन नामस्मरण करणे किंवा साधनांत - नामस्मरणांत राहाणे व शक्यतो त्याचे फळ बाहेरच्या जगांत न पाहाणे वा शोधणे, किंबहुना फळाचा विचारच न करता ते करीत राहाणे हेच फक्त सामान्य माणसाला करता येण्यासारखे व करण्यास योग्य असे आहे. अगदी मंदबुद्धि मनुष्यही कांहीतरी प्रयोजनावांचून कर्म करीत नाही. परमार्थसाधना - येथे नामसाधना - हेही एक कर्मच आहे. परंतु कोणत्याही प्रकारच्या फळाची (किंवा प्रयोजनाची) अगदी मोक्षाचीही इच्छाच समूळ नाहीशी होणे हेच त्याचे फळ किंवा प्रयोजन असते. असे नाम घेता घेता त्यातच गोडी उत्पन्न होते व त्या गोडीने अधिकाधिक नाम घ्यावे - घेत राहावे - असे अंतरातून वाटू लागते. इतकेच काय पण ती गोडी वाटू लागली - यालाच नामात रंगणे म्हणतात - की व्यवहाराचे काम करणे जरूर पडल्यास नको असे वाटते. पुढे ते इतके अंगवळणी पडते की कांहीही करताना जसा श्वास चालू राहातो तसे ते नाम चालू राहाते व अखेरच्या श्वासापर्यंत ते चालू राहाते. इतकेच नाही तर श्वास बंद झाला व प्राण गेला तरीही ते शिल्लक राहाते असे संतांचे सांगणे आहे. नामसाधनेचे हे खरे पर्यवसान आहे - सर्व जाते, नाम तेवढे शिल्लक राहाते. हेच खरे ज्ञान आहे, हाच खरा मोक्ष (दृश्यापासून संपूर्ण मुक्तता) आहे, हीच पराभक्ति आहे.

**डॉ. बा. रा. अंतरकर,**
ए - ३, तेजकिरण सोसायटी.
७९, राममंदिर रोड. विले पार्ले (पूर्व),
मुंबई - ४०० ०५७.

---

## जीवनात कधी –

जीवनात कधी हरायचे नसते.
फिनिक्स पक्षासारीखे उठून उभे राहायचे असते
जीवनात कधी हरायचे नसते १
मतभेद होतात परंतु सत्य कधी असत्य न होते
जीवनात कधी हरायचे नसते २
गगनी ते अभ्र येते क्षणी एक विरूनी जाते
जीवनात कधी हरायचे नसते ३
सत्यापाठी परमेश्वराचे अधिष्ठान
अंतरी असावे अत्यंत समाधान
जीवनात कधी हरायचे नसते ४
ठेविले अनंते तैसेचि रहावे
मुखी राम नाम सदा घ्यावे
जीवनात कधी हरायचे नसते ५

**सौ. फराटे**

# श्री. संत तुकाराम महाराज, अर्थात "संचिताची मिराशी"

**इंदिराबाई देशपांडे**

आपण ताजमहाल सारखी एखादी अप्रतिम सुंदर वस्तू पाहिली म्हणजे त्यातील संगमरवरी, घोटीव कलाकृति व शिल्पाने आपले मन हरखून जाते. या शिल्पातील दगड हा कांही जमिनीतून काढला तशा अनघास्थितीत आपण पहात नाही. मूळ स्वरूपावर कारागिरानीं किमया केलेली असते, त्याला घडविले असते. जी गोष्ट निर्जीव वस्तूंची तीच या जगांत जन्माला आलेल्या माणसांची असते. कोणत्याही मोठ्या माणसाचे जीवन आपण सूक्ष्मपणे पाहिले तर आपणास त्या जीवनाची जडणघडण फार मोठ्या प्रमाणावर झालेली दिसते. त्याला आपण संस्कार म्हणतो. संत तुकारामांनी जनमानसावर अभंगरूपातून संस्कार केले.

मराठी सारस्वतात संत तुकाराम महाराजांच्या अभंगांचे स्थान सर्वात वरचे असून ते सामान्यांच्या अंतरंगापर्यंत जाऊन पोहोचले आहे. ते आपल्या काव्यस्फूर्तीची कथा सांगतात -

*नामदेवे केले स्वप्नामाजी जागे । सवे पांडुरंगे येवोनिया ।*
*सांगितले काम करावे कवित्व । वाउगे निमित्य बोलो नये।*

नामदेवाकडून अपूर्ण राहिलेली अभंग लेखनाची प्रतिज्ञा त्यांनी पुढे चालवली.

*मना वाटे तैसे बोलिलो वचने । केली धीटपणे सलगी देवा।*

असे प्रारंभी सांगून

*काय म्या पामरे बोलावी उत्तरे । बोलविता धनी वेगळाचि ।*

अशा विनयाने सारे श्रेय विश्वंभरास देतात. ही अनासक्त कृती निरपेक्ष भावाने करतात.

आपल्या असंख्य अभंगातून त्यांनी संसाराची असारता पटविली आहे. हा केवळ अव्यक्ताचा उपदेश नव्हता तर अनुभव होता. ते म्हणतात "या संसाराचा मोह धरणे म्हणजे ढेकणाच्या बाजेवर शांत झोपेची अपेक्षा करण्याप्रमाणे व्यर्थ आहे." "*जन हे सुखाचे दिल्या घेतल्याचे*" आहेत. आणि सोयरी धायरी केवळ सुखाची आहेत. अंतकाळचे कुणीच नाही. "*धन मेळवून कोटी सवे न ये रे लंगोटी*" अशी सारी स्थिती आहे. "*आम्ही विठ्ठलाचे वीर, फोडू कळिकाळाचे शीर*" अशा दृढ विश्वासाने ते सांगतात "*बुडती जन हे देखवेना डोळा*" अशा कळवळ्यापोटी साऱ्या समाजाला उद्धाराचा मार्ग दाखवून जीवनाच्या वाटा उजळावयाच्या होत्या. त्यांचा पिंड भावनाप्रधान भक्ताचा होता, तसा परखड समाज सुधारकाचाही होता. बहुजनांच्या धर्मश्रद्धेला तत्वचिंतन आणि चित्तशुद्धीची जोड द्यावयाची होती.

जीवनातील सत्‌च्या पुरस्कारासोबत असत्‌चा निषेध त्यांना आवश्यक वाटे. यासाठीच "*धर्माचे पाळण । करणे पाखांडण । आम्हा हे कौतुक जगा द्यावी नीत । करावे फजीत चुकती जे ।*" असे ते बजावतात. "*दावूनि वैराग्याची कळा । भोगी विषयांचा सोहळा*" अशी ढोंगी संन्याशाची हजेरी पण घेतलेली आहे. शिवाय जे संतांचा मत्सर करणारे नास्तिक, अभक्त ब्राह्मण, गोसावी या सर्वांवर हल्ला चढविला आहे. सालोमालो सारख्या भुरट्या कवीने आपले कवित्व चोरून स्वतःच्या नावावर विकलेले पाहताच जे "*उष्ट्या पत्रावळी करोनिया गोळा । दाविलीसे कळा विद्वत्वाची*" अशा उपहासाने त्यांचा निषेध करतात. आणि

*विकेत तेथे विका । माती नाव ठेवुनी बुका ।*
*हा तो निवाड्याचा ठाव । खरा खोटा निवडे भाव ।*

असा निवाडा करण्यास सरसावतात. कारण "*तुका म्हणजे झरा । आहे मुळियाची खरा*" समाजातील ढोंगीपणावर -

"*पाया झाला नारू । तेथे न बांधावा कापुस ।*
*तेथे बिबव्याचे काम । अधमासि तो अधम ।*
*देवावरी विंचू आला । देवपूजा नावडे त्याला ।*
*तेथे पैजाराचे काम । अधमासि तो अधम ।*

असा जशास तसा न्याय सांगून "*दया तिचे नाव भूतांचे पाळण । आणिक निर्दाळण कंटकाचे*" अशी डोळस भक्ती आणि सामाजिक नीती त्यांनी शिकविली. सामाजिक जीवनात नीती हीच भक्ती मानली "*नेत्रीरूप मुखी नाम*" हे या भक्तीचे एक रूप तर "*दया तिचे नाव भूतांचे पाळण । आणिक निर्दाळण कंटकाचे*" ही तिची दुसरी बाजू. रूढ संकेताच्या, दांभिकपणाच्या आणि अंधश्रद्धेच्या विध्वंसनाने प्रथम समाजाची मनोभूमी नांगरून नंतर तिच्यातून प्रांजळ भक्तीभाव, नीती आणि समाजोद्धारकाचे विधायक बी पेरले. पोटासाठी ढोंग करणाऱ्याचे वाभाडे काढले.'*वेदांचा तो अर्थ आम्हासीच ठावा । येरानी वहावा भार माथा ।*' असे सांगून तथाकथित वेदविद्वानांना बाजूस सारले." *याति कूळ येथे असे अप्रमाण । गुणाचे कारण अंगी असे ।*" या शब्दात जन्मावर आधारित जातिव्यवस्थेला विरोध केला. याति वर्णहीन असल्यामुळे जन्मजात वर्णधर्माच्या ठेकेदाराकडून निंदा, द्वेष, निषेध, हाणमार या सारख्या आपत्तींना तोंड देऊन ब्रह्मवाद्यांनाही लाळ घोटावयास लावणारे श्रेष्ठत्व त्यांनी केवळ आपल्या स्वतःच्या प्रयत्नांनी प्राप्त करून घेतले. तो आदर्श बहुजन समाजासमोर ठेवला. हे सामाजिक कार्य आजच्या वर्तमानकाळात आचरणात जर आणले गेले तर संत तुकाराम महाराजांची शिकवण फळास आली असे म्हणावयास हवे. ही काळाची गरज आहे.

*आपल्या कर्तृत्वातून त्यांनी जीवन निष्ठा तर निर्माण केलीच पण*

*असाध्य ते साध्य करिता सायास । कारण अभ्यास तुका म्हणे*
असा विश्वास सर्वांना प्राप्त करून दिला. नामाचे महात्म्य सांगताना ते म्हणतात; प्रांजळ भावाने केलेली भक्ती श्रेष्ठ, जनी जनार्दन आहे, त्यासाठी *"नलगे सायास जावे वनांतर । सुखे येती घरा नारायण ।"* इतके ते जवळ आहे. हरिकथा आणि नाम संकीर्तन हे ईश्वर प्राप्तीचे सर्व श्रेष्ठ मार्ग आहेत. समाधीचे सुखही तीवरून ओवाळून टाकावे इतकी त्यांना श्रेष्ठ वाटते. *"यारे सारे लहान थोर । याति भलते नारी नर ।"* असे आवाहन करून भक्ति संप्रदायापुरते तरी त्यांनी जातिभेद मोडून काढले. व बहुता जातीचा अंगिकार केला. *"पराचिया नारी रखुमाई समान"* अशी सामाजिक नीती रुजविली, "विष्णुमय जग हा वैष्णवाचा धर्म" हे पटवून *शुद्धबीजापोटी । फळे रसाळ गोमटी"* निपजतात हे जनमानसावर ठसविले.

त्यांनी शद्बाविषयी अभंगात सांगितले. शद्बचि देवच मानलेला दिसतो *"आम्हाघरी धन शद्बाचीच रत्ने । शद्बाचीच शस्त्रे यत्न करू । शद्बचि आमुच्या जीवाचे जीवन । शद्बे वाटू धन जन लोका ।"* तसेच रोजच्या अनुभवातल्या आणि व्यवहारातल्या दृष्टांताची मदत घेऊन त्यांनी हे विचार सांगितल्यामुळे ते प्रभावी झाले आहेत.

*मुलाम्याचे गाणे । तुका म्हणजे नव्हे सोने*
*नव्हे वैद्य आम्ही अर्थाचे भुकेले । भलते धावे पाते भलत्या पाशी।*
*विती येवढेसे पोट । केवढा बोभाटा तयाचा ।*
*सुख पहाता जवापाडे । दुःख पर्वता एवढे ।*

यासारखे कांही अभंगातील चरण म्हणजे साक्षात जीवनानुभवाचे सारच असल्यामुळे ते अविस्मरणीय ठरले आहेत.

*मोले घालते रडाया । नाही आसू आणि माया ।*
*कोडियाचे गोरेपण । तैसे अहंकारी मन ।*
*गाढव शृंगारिले कोडे । कांही केल्या नव्हे घोडे ।*
*तुका म्हणे तोचि संत । सोशी जगाचे आघात ।*

इत्यादी अभंग चरणांनी तर सुंदर सुभाषितांचे स्वरूप धारण केले आहे. अल्पाक्षर रमणीयत्व हे तुकाराम महाराजांच्या लेखन शैलीचे वैशिष्ट्य आपणास दिसते. आणि मग वाटते की लोकांना सर्वसामान्य जनतेला शिकवण, मार्गदर्शन करण्याकरिता देव साधुसंताना मृत्यू लोकांत पाठवतो. अशा पुरुषांना आपण अवतार म्हणतो. श्री तुकाराम महाराज अशा अवतारी पुरुषांपैकी एक आहेत. हे साधुसंत मृत्यूलोकांत प्रसंगानुसार धर्माच्या रक्षणासाठी व मनुष्याच्या मागे लागलेले दुःख नाहिसे करून त्यांना शाश्वत सुखाचा मार्ग दाखवितात.

श्री तुकाराम महाराज आपले अवतारकार्य अभंगांतून सांगतात. अशा अभंगांपैकी २ अभंग

*आम्ही वैकुंठवासी । आलो याचि कारणासी ।*
*बोलिले जे ऋषी । साच भावे वर्ताविया ॥*
*झाडू संताचे मार्ग । आडराने भरले जग ।*
*उच्छिष्टाचा भाग । शेष उरला तो सेवू ॥*
*अर्थे लोपली पुराणे । नाश केला शद्बज्ञाने ।*
*विषय लोभी मन । साधने हे बुडविले ॥*
*पिटू भक्तीचा डांगोरा । कळीकाळासी दरारा ।*
*तुका म्हणे करा । जयजयकार आनंदे ।*
*धर्म रक्षावयासाठी । करणे आटी आम्हासी ।*
*वाचा बोले वेदनीति । करू संती केलेले ।*
*वर आणता स्थिति अंगी । कर्मत्यागी लेउतो ।*
*तुका म्हणे अधम त्यासी । भक्ति दूणी हरीची ।*

श्री संत तुकाराम महाराज वैकुंठवासी संत ! ऋषीनी आपल्या ग्रंथात जे सांगितले होते ते खरे आहे हे स्वतः आचरण करून लोकांना दाखविले. स्वार्थी शद्बपंडितानी लोकांना विषयलोभी बनविले. पारमार्थिक विचारापासून दुरावले. तळवारी गंजून पडाव्यात त्याप्रमाणे देवप्राप्तीची साधने बाजूला पडली. ती कशी वापरावी हे महाराजांनी स्वतः साधने आचरणात आणून दाखविले. सोप्या नामभक्तिच्या साधनाने कळिकाळाच्या दराऱ्यातून सोडविले. नुसता पोकळ उपदेश केला नाही. देव आपलासा कसा करावा याचं त्यांनी प्रात्याक्षिक करून लोकांना दाखविले. धर्माचे रक्षण करण्यासाठी आटाआटी करावी लागली. वैदिक ऋषींच्या व संतांच्या मार्गाने जाऊन त्यांनी धर्म रक्षणाचे कार्य केले. संन्यासी होण्याची अंगी स्थिती नाही त्यांना कर्ममार्ग दाखवून कर्म करीत असता हरिभक्तीची जोड दिली. कर्मत्यागाचा देखावा करणाऱ्यांवर आपल्या अभंगात कोरडे ओढले आहेत. सर्वात महत्वाची गोष्ट म्हणजे "आधी केले मग सांगितले" हे लोकांना प्रत्यक्षात दिसले तरच शक्य वाटते, विश्वास बसतो.

*अर्भकाचे साठी । पंते हाती धरिती पाटी ।*
*तैसे संत जगी । क्रिया करून दाविली अंगी ।*
*बालकाचे चाली । माता जाणोन पाऊल घाली ।*
*तुका म्हणजे नाव । जनासाठी उदकी ठाव ।*

जन्मभर पारमार्थिक साधनेचे कष्ट उपसले. *"बुडते जन हे देखवेना डोळा"* बुडत्या जनांना, स्त्री शुद्रांना भक्ती पंथात सामावून त्यांना उद्धाराचा मार्ग दाखविला. जगाचे आघात सोसल्याशिवाय संतपण नाही ही वास्तव जीवनाची कसोटी लावून सामान्यांना निडर बनविले. त्यांच्या अभंगातून संत, कवि आणि सुधारक तुकाराम तर दिसतातच पण अनेक ठिकाणी त्यांच्या व्यक्तिमत्वाचे रंगही पहावयास मिळतात. *"ओस झाल्या दिशा मज वाटे भिंगुळवाणे"* हा उदासपणा *"कन्या सासुरासि जाये मागे परतोनी पाहे"* अशी तळमळ *"भले ही देऊ कासेची लंगोटी । नाठाळांच्या माथा देऊ काठी"* असा निधडेपणा *"म्हणे विठ्ठल पाषाण । त्याच्या तोंडावरी वहाण ।"* हा सात्विक संताप *"उष्ट्या पत्रावळी करूनिया गोळा । दाविलेसी कळा विद्वत्वाची ।"* असा कठोर उपहास *"वृक्षवल्ली आम्हा सोयरे वनचरे । पक्षीये सुस्वरे आळविती ।"* हा स्थिरचराशी सुसंवाद आणि चित्ताचा हळूवारपणा, *"अणुरणीया थोकडा । तुका आकाशाएवढा।"* हा शद्बातीत अनुभव अशा असंख्य भावछटा या अभंग वाणीत

आढळतात. भावानुभवाची इतकी विविधता इतर कोणत्याही संताच्या कवितेत दुर्मिळच म्हटली पाहिजे. *"अमृत ते गोड काय आम्हा पुढे । विष ते बापुडेकडू किती ।"* हे त्यांचे उद्‌गार या दृष्टीने सार्थ आहेत.

संत तुकाराम हे प्राचीन मराठी साहित्यातील अखेरचे वारकरी, तो संत साहित्याचा कळसाध्यायच म्हणावा लागेल. ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथांचा वीणा त्यांनी पुढे चालविला. वंश परंपरेने आलेली विठ्ठल भक्तीची मिरास त्यांनी वाढविली. स्त्री शुद्रांपर्यंत पोचविली. नाममहिम्याने मोक्षाची पायवाट सोपी केली. *"आम्हा अलंकार मुद्राचे शृंगार । तुळशीचे हार वाहू कंठी"* असा भागवताचा अभिमान वाहिला. संत तुकाराम स्वतः श्रेष्ठ कीर्तनकार होते. *"कलियुगा माजी करावे कीर्तन । तेणे नारायण देईल भेटी"* । कीर्तनाचा मार्ग हा राजमार्ग आहे. कीर्तनाला अंतरंग शुद्धी महत्वाची असते. बाह्योपचाराची गरज नसते.

संत तुकारामानी एका अभंगात शंकराचार्यांचे अद्वैत तत्वज्ञान, परब्रह्माचे स्वरूप अश्वत्थ वृक्षाचे भव्य रूपक साकारले - विरहिणी, गौळणी, साक्या म्हणजेच दोहे व उत्तरादि पदेही रचलेली आहेत. लोकपरंपरा व खेळ यावरही रूपकात्मक काव्ये रचली. ही रूपके अत्यंत आशयगर्भ असतात. यात टिपरी, हमामा, फुगडी, विटीदांडू, ढुंबरी, दळण कांडण, पाळणा, आशिर्वाद, ललित, लखोरा ही पहिल्या प्रकारात तर दुसऱ्या प्रकारात गोंधळ, दसरा, सौऱ्या विराणी, दरवेस, मलंग, डोईफोडा, वैद्यगोळी, कोडे, जोहार, पांगुळ, आंधळा, एका खडी, ओव्या इत्यादींवर रूपके रचली आहेत. त्यांनी ओव्या पांडुरंगाला साक्षी ठेवूनच एकविध भावाने रचल्या -

*पहिली माझी ओवी ओवीन जगत्र । गाईन पवित्र पांडुरंग ।*
*दुसरी माझी ओवी दुजे नाही कोठे । जनी वनी भेटे पांडुरंग ।*

तुकारामांचे शंभर ओव्यांचे अंत्याक्षरी अभंगही आहेत. त्या सर्वांचेही सार पांडुरंगच आहे. कारण पांडुरंग हा *"कृपाळू हा देव अनाथा कोपसा"* असा आहे. त्यामुळे त्यांची प्रतिज्ञा एकच आहे.

*सुखाचा सागरू आहे विटेवरी । कृपादान करी तोचि एक ।*
*एक चित्तधरू विठोबाचे पायी । तेथे उणे काही एक आम्हा ।*

तुकारामांची अभंगवाणी म्हणजे रत्नभांडार आहे. अमूल्य व अलौकिक, प्रत्येक रत्न झळझळीत स्वयंप्रकाशित आहे. प्रत्येक रत्नाचे पैलूही अगणित आहेत. त्याचे तेज किती अनुभवावे तितके थोडेच. किमान शब्दरचना, आशय गर्भता, आत्मप्रचीतीची संपन्नता, वैराग्याची निस्पृहता आणि भक्तीची उदारता यामुळे तुकाराम 'वाणी' संपन्न झाली आहे. स्वतः पूर्ण ज्ञानी असूनही त्यांनी अन्य संतांप्रमाणेच सर्व सिद्धी, वैकुंठमुक्ती इत्यादी लाथाडून भक्तीचा आनंद मागितला आहे.

*न करी आस मुक्तीचे सायास । भक्ति प्रेमरस सांडूनिया ।*
*देवा ऐके हे विनंती । मज नको रे हे मुक्ति ।*
*सांडुनि सुखाचा वाटा । मुक्ति मागे तो करंटा ।*
*पायी गोविली वासना । तुच्छ केले ब्रह्मज्ञाना ।*
*काय उणे मज पांडुरंगा पायी । रिद्धि सिद्धि ठायी वोळगती ।।*
*कोण पाहे सुखा नासिवंताकडे । तृष्णेचे बापुडे नव्हे आम्ही ।।*
*स्वर्ग सुखे आम्ही केली पावटणी । पाप पुण्ये दोन्ही उलंडिली ।।*
*तुका म्हणे घरी आणिले वैकुंठ । वसविली पेठ वैष्णवांची ।*

असे सर्वांगीण सर्वस्पर्शी जीवनभाष्य करणारे, जनता जनार्दन शोधून मानवतेची द्वाही फिरविणारे संत तुकाराम महाराज - त्यांना दंडवत.

त्यांच्याच अभंगातील

*पुण्यवंत व्हावे घेता सज्जनांची नावे । नेघे माझी वाचा तुटी ।*
*महालाभ फुकासाठी विश्रांतीचा ठाव । पायी संताचिया भाव ।*
*माझी सर्व पापे जाती तुम्हाचिया जपे ।*

**इंदिराबाई देशपांडे**
२७५, शनिवार पेठ,गौरी अपार्टमेंट ,
ओंकारेश्वर देवळासमोर
पुणे ४११ ०३०.

# ॥ संतश्रेष्ठ तुकाराम : चरित्र ॥

ॐ. गो. श्रीदत्तोपासक

संतश्रेष्ठ तुकारामांचा जन्म पुण्याजवळ देहू येथे मोरे कुळीत आंबिले आडनावाच्या घराण्यात इ.स. १६०८ ला झाला. त्यांचा पिढीजात व्यवसाय वाण्याचा होता. तसेच या घराण्याकडे देहू गावाची महाजनकीही होती. त्यांच्या पित्याचे नाव बोल्होबा आणि आईचे नाव कनकाई असे होते. या घराण्याचे मूळ पुरूष विश्वंभर (इ.स. चे चौदावे शतक) हे विठ्ठलाचे उपासक होते. त्यांनी आपल्या घराजवळच विठ्ठलाचे मंदिर बांधलेले होते. त्यामुळे विश्वंभरापासून बोल्होबापर्यंत विठ्ठलभक्तीचा वारसा त्या घरात अविच्छिन्न चालत आला होता. अशा भक्तियुक्त वातावरणात वाढलेल्या तुकारामांच्या मनावर बाळपणापासूनच शुभ संस्कार घडले. *'शुद्ध बीजापोटी फळे रसाळ गोमटी'* हे त्यांचे वचन त्यांच्या बाबतीत पूर्णपणे लागू पडते. महाजनकीच्या वृत्तीमुळे लिहिणे व वाचणे ते लहानपणीच शिकले होते. संस्कृताचाही त्यांनी परिचय करून घेतला होता. गीता-भागवतादी देववाणीचे त्यांनी सखोल चिंतन केलेले होते. कथा-कीर्तनातून आणि भजनातून सतत कानी येणाऱ्या संतवाणीने ते बहुश्रुत बनले होते. सदाचाराची बैठक ढळू न देता व्यवहार कसा करावा, हे त्यांना घरीच शिकायला मिळाले होते. तुकाराम तेरा वर्षाचे होताच त्यांच्या वृद्ध पित्याने सावकारी, व्यापार व महाजनकी यांचा सर्व व्यवहार क्रमाक्रमाने तुकारामांवर सोपविला. तुकारामांचा थोरला भाऊ सावजी हा प्रथमपासूनच वृत्तीने विरक्त होता आणि धाकटा भाऊ कान्होबा त्या वेळी लहान होता. त्यामुळे वयाच्या तेरा ते सतरा वर्षापर्यंत पित्याच्या मार्गदर्शनाखाली तुकारामांनी घरातील सर्व व्यवहार जबाबदारीने पार पाडले. या पाच वर्षाच्या काळात तुकारामांची दोन लग्ने झाली. पहिली पत्नी रखमा ही त्यांच्या मामाच्याच घरची होती. ती दमेकरी निघाली. तिच्या हातून संसाराचा गाडा रेटला जाणार नाही, असे समजून तुकारामांच्या वडिलांनी पुण्याच्या अप्पा गुळवे नामक श्रीमंताच्या मुलीशी तुकारामांचे दुसरे लग्न लावून दिले. तिचे माहेरचे नाव आवडी आणि सासरचे नाव जिजा असे होते. तुकारामांच्या सुखी संसारावर दुःखाची छाया पसरू लागली. प्रथम त्यांचे वडील निवर्तले. त्यापाठोपाठ आई आणि थोरल्या भावाची पत्नी निवर्तली. आधीच विरक्त असलेला त्यांचा भाऊ पत्नीच्या निधनानंतर घर सोडून तीर्थयात्रेसाठी कायमचा निघून गेला. हे दुर्दैवाचे आघात झेलीत असतानाच इ.स. १६३० च्या सुमारास सर्वत्र मोठा दुष्काळ पडला आणि लोकांची दुरावस्था झाली. त्यामुळे तुकारामांचा व्यापार घटला, सावकारी संपली; घेणेकऱ्यांनी धरणे धरले आणि देणेकरी हात झटकून मोकळे झाले. अशातच त्यांची पहिली पत्नी आणि तिच्यापासून झालेला मुलगा यांनाही काळाने हिरावून नेले. घरची गुरेढोरेही मेली आणि अखेर नाईलाजाने तुकारामांना व्यवसायाचे दिवाळे काढावे लागले. या परिस्थितीत तुकाराम अंतर्मुख बनले. त्यांचे भक्तिसंस्कार जागे झाले. आणि *'विठो तुझे माझे राज्य । नाही दुसऱ्याचे काज'* या निश्चयाने भक्तिसुख अनुभविण्यासाठी त्यांनी घरचे विठ्ठलमंदिर दुरुस्त केले. श्रीपांडुरंगाची पूजाअर्चा नियमित होऊ लागली. दर्शनाकरिता गावकरी मंडळी पुनश्च येऊ लागली. या देवालयात श्रीमूर्तीसमोर उभे राहून तुकोबांनी कीर्तनसेवा करण्यास सुरुवात केली. मानदंभ घालवून लोकलाज सोडण्यासाठी हरिकीर्तन हे एक प्रमुख साधन आहे, हे वर्म लक्षात घेऊन तुकोबा कीर्तन करू लागले. कीर्तनात श्रोत्यांना जे सांगावयाचे त्याचा प्रथम स्वतःला अनुभव आला पाहिजे, नाहीतर ती नुसती बडबड होईल. परंतु तुकारामांच्या कीर्तनाला अनुभवाची जोड होती. त्यांच्या कीर्तनातील चौदा प्रमुख टाळकरी प्रसिद्ध आहेत.

दुष्काळाने विस्कटलेली संसाराची घडी पुनश्च नीट बसविण्याइतके कौशल्य अंगी असूनही या विपरीत काळात वित्त व जीवित यांची असारता प्रत्ययाला आल्यामुळे त्यांची वृत्ती संसारापासून विन्मुख झाली आणि विठ्ठलचरणी स्थिरावली. ते भामनाथ आणि भंडारा या डोंगरावर वृक्ष वेलींच्या सहवासात चिंतन, मनन आणि नामस्मरण करण्यात दिवस घालवीत असत. या एकांतातील चिंतनाच्या काळात त्यांनी ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत, नामदेव व एकनाथ यांच्या अभंगगाथा आणि अन्य अनेक संतांची वचने मनी-मुखी धारण केली आणि त्यांचा आपल्या अनुभूतीशी मेळ घालण्याचा प्रयत्न केला. तुकारामांची ही पारमार्थिक वाटचाल सुरू असताना त्यांना व्यावहारिक वृत्तीच्या कुटुंबियांप्रमाणेच समाजातील नानाविध वृत्तीचे लोक नावे ठेवू लागले. परंतु त्यांनी जननिंदेची पर्वा केली नाही. ज्याच्यावर विसंबून परमार्थाची वाट सुरक्षितपणे चोखाळता येईल असा कोणी मार्गदर्शक तुकारामांना भेटला नाही. 'संतांची उत्तरे' पाठ करता करता ते आपल्याच मनाशी संवाद करीत असत. अशाच अवस्थेत एक अद्‌भुत अंतःप्रेरणेचा क्षण आला आणि त्यांच्या मुखातून अभावितपणे अभंगवाणी बाहेर पडू लागली. या क्षणाचे वर्णन करताना तुकाराम म्हणतात,

*नामदेवे केले स्वप्नामाजी जागे । सवे पांडुरंगे येऊनिया ॥*
*सांगितले काम करावे कवित्व । वाउगे निमित्य बोलो नको ॥*
*माप टाकी सळ धरिली विठ्ठले । थापटोनि केले सावधान ॥*
*प्रमाणाची संख्या सांगे शतकोटी । उरले शेवटी लावी तुका ॥*

नामदेवांकडून कवित्वाचा स्वप्नदृष्टांत झाल्यानंतर तुकारामांनी विनम्र वृत्तीने अभंग रचायला प्रारंभ केला. तुकारामांना कवित्वाची प्रेरणा जशी स्वप्नात लाभली तसा गुरुपदेशही स्वप्नातच मिळाला. चैतन्य

परंपरेतील बाबाजी चैतन्य नामक सत्पुरुषाने, माघ शुद्ध दशमी, गुरुवार, शके १५६१ (दि. २३-१-१६४०) या दिवशी तुकारामांना स्वप्नात उपदेश केला. या घटनेचे सविस्तर वर्णन तुकारामांनी *'सद्गुरुरायें कृपा मज केली । परी नाही घडली सेवा कांही ।।'* या अभंगात केलेले आहे. राघव चैतन्य - केशव चैतन्य - बाबाजी चैतन्य अशी तुकारामांची गुरुपरंपरा ठरते. त्यांच्या पूर्वीच्या भक्तीवर गुरुने शिक्कामोर्तब केल्यामुळे ते अंतरी सुखावले.

तुकारामांचे प्रसन्न आणि प्रासादिक कवित्व पाहून काही उच्चवर्णीय सनातनी मंडळींना त्यांचा हेवा वाटू लागला. रामेश्वरभट्ट आणि मंबाजी बुवा हे त्या हेवा दावा करणाऱ्यात प्रमुख होते. त्यांनी स्वप्नबळाचा आश्रय घेऊन तुकारामांच्या विरुद्ध निवाडा मिळविला आणि त्यांना आपल्या अभंगांच्या वह्या स्वहस्ते इंद्रायणीत बुडवायला भाग पाडले. वह्या बुडविल्यानंतर तुकारामांनी तेरा दिवसांपर्यंत उपवासपूर्वक देवाजवळ धरणे धरले आणि अखेर देवाने प्रसन्न होऊन त्यांच्या वह्या कोरड्या स्थितीत नदीतून वर काढल्या अशी कथा प्रचलित आहे. ही कथा खरी असो वा नसो. परंतु तुकारामांची अभंगवाणी त्यांच्या हयातीत संपूर्ण महाराष्ट्रभर पसरली होती आणि शेकडो कोस अंतरावर असलेले मराठी लोक ते अभंग मिळवून मुखोद्गत करीत होते. ही वस्तुस्थिती ध्यानी घेता केवळ अभंगांच्या वह्या बुडवून ती अभंगवाणी नष्ट करणे सर्वस्वी अशक्य होते व हास्यास्पदही होते असे म्हटले पाहिजे. या घटनेनंतर विरोधकांचा विरोध शमला. रामेश्वरभट्टांनी तर तुकारामांचे शिष्यत्वच पत्करले. तुकारामांच्या कवित्वाचा डंका सर्वत्र वाजू लागला. त्यांचे सर्व जीवित आनंदमय झाले. *'आनंदाचे डोही आनंद तरंग । आनंदचि अंग आनंदाचे'* असे त्या आनंदाचे वर्णन त्यांनी केलेले आहे. आता त्यांना स्वतःकरिता काहीही प्राप्त करावयाचे नव्हते *'तुका म्हणे आता । उरलो उपकारापुरता ।'* अशी त्यांची अवस्था झाली होती. अशा स्थितीत त्यांच्या वयाची ४१ वर्षे उलटली. आपले जीवित आता सफळ आणि कृतार्थ झाले आहे, असा त्यांना प्रत्यय आला. आता देहत्याग करायला हरकत नाही, असे त्यांच्या मनाने घेतले. एके दिवशी सर्व लोक कीर्तनात रंगलेले असताना प्रसन्न मनःस्थितीत त्यांनी जगाचा अभावितपणे निरोप घेतला. *'अंतकाळी विठो आम्हासी पावला । कुडीसहित जाला गुप्त तुका।'* असे उद्गार प्रत्यक्ष तुकारामांनीच आपल्या निर्वाणाविषयी काढले आहेत. ही घटना शके १५७१, फाल्गुन वद्य द्वितीया (इ.स. १६४९) या दिवशी घडली. हा दिवस भाविक, सश्रद्ध लोक 'तुकाराम बीज' म्हणून साजरा करतात. तुकारामांचे निर्याण घडले, त्या वेळी शिवाजीचे स्वराज्य प्रयत्न नुकतेच सुरु झाले होते. साधुसंताविषयी स्वभावतःच प्रीती बाळगणाऱ्या शिवाजीने तुकारामांचे दर्शन घेतले व मागाहून भेटीदाखल बरेच द्रव्य त्यांच्या घरी पाठविले. परंतु निरीच्छ व निर्लोभ अशा तुकारामांनी ते द्रव्य जसेच्या तसे परत पाठविले, अशी कथा सांगतात.

तुकारामांची सर्व रचना अभंग छंदात आहे. त्यांचे सुमारे पाच हजार अभंग उपलब्ध आहेत. ही गाथा म्हणजे त्यांची 'वाङ्मयी श्रीमूर्ती'च आहे. त्यांची अभंगवाणी म्हणजे रसरसलेल्या अनुभवांची खाणच आहे. एका साध्या संसारी माणसाचा आत्मसाक्षात्कारी संत कसा झाला, याचा सविस्तर चित्रपट तुकारामांच्या काव्यात पाहायला मिळतो. या काव्यात तीव्र अंतःक्षोभ आहे. त्यांचे मन आणि अंतर्बाह्य जग यात रात्रंदिवस जे युद्ध सुरु होते, त्यातूनच हा क्षोभ उसळला आहे. तुकारामांची अभंगवाणीही गेल्या तीनशे वर्षांच्या काळात महाराष्ट्रवाणीचा एक अविभाज्य घटक बनलेली आहे. तुकारामांबद्दल मराठी मनाला परकेपणाची भावना स्पर्शही करीत नाही. ते मन तुकारामांबरोबर हसायला आणि रडायला सदैव तयार असते. तुकाराम हा आपल्यापैकीच एक आहे, तो पुष्कळदा आपलेच विचार - विकार बोलून दाखवीत आहे, आपल्याचसारखा वैतागत आहे, संतापत आहे, मधूनच प्रसन्न होत आहे, जे आपल्याला काही केल्या साधत नाही ते त्याने साधलेले असले तरी ते साधताना त्यालाही आपल्यासारखेच अतोनात कष्ट पडलेले आहेत, हे सामान्यांच्याही मनाला जाणवते व तुकाराम हा त्याला अगदी जवळचा वाटतो. त्यांच्या अभंगांतील किती तरी चरण, अर्धचरण, शब्दप्रयोग, कल्पना व भाषाप्रयोग मराठी माणसाच्या हरघडीच्या बोलीभाषेत अवतरले आहेत. मोजक्या शब्दात केवळ खूप अर्थ, नव्हे, विश्वव्यापक अनुभव व्यक्त करण्याची शक्ती तर त्या वाणीमध्ये आहेच. शिवाय छंदोबद्ध असल्यामुळे तिला सुभाषितासारखी तालबद्धताही प्राप्त झाली आहे. याशिवाय मंत्रगीता नावाचा एक ग्रंथ तुकारामांच्या नावावर उपलब्ध आहे. परंतु तो विवाद्य असून याच तुकारामांचा तो आहे याविषयी अजून निर्णय झालेला नाही.

'ज्ञानाचा एका आणि नाम्याचा तुका' या वारकरी वचनात तुकाराम हे नामदेवाचे पारमार्थिक वारसदार असल्याचे सूचित केलेले आहे. मराठी भक्तिपरंपरेत आणि कविमंडळातही तुकारामांचे स्थान अनन्यसाधारण आहे. तुकाराम विवेकबळाने आकाशाएवढे बनले आणि ज्ञानेश्वरांनी ज्याचा पाया रचला, त्या भागवतधर्ममंदिरावरचे कळस होऊन शोभत राहिले, ही घटना तुकारामांना चिरंजीवपद देणारी आहे.

|| ठळक संदर्भ ग्रंथ ||


१) ल. रा. पांगारकर, 'श्रीतुकाराम चरित्र' १९२०

२) न. र. फाटक, 'तुकोबांचे जीवनकार्य' १९५०

३) गं. बा. सरदार, 'महाराष्ट्रीय संत : वाङ्मय व जीवन' १९५२

४) भा. पं. बहिरट, 'संतवाणीचा अमृतकलश १९५५

५) श्री. म. माटे, 'संत, पंत व तंत' १९५७

६) पु. मं. लाड, 'तुकाराम चरित्र' १९५७

७) वा. सी बेंद्रे, 'संत तुकाराम : चरित्र, कवित्व व तत्त्वज्ञान १९६३

८) रा. ग. हर्षे, 'तुकाराम' १९६३

९) रा. वि. माडगावकर, 'तुकारामांचे चरित्र' १९६४

१०) डॉ. शंकर चतुरकर, 'धन्य तुकोबा समर्थ' १९९३



डॉ. गो. श्री दत्तोपासक,
संशोधन - सहाय्यक
संत नामदेव अध्यासन पुणे विद्यापीठ

# तुकाराम - एक थोर द्रष्टा

सौ. पुष्पा अरुण जोशी.

चौकोनी बंदिस्त पेटी सारखीच आपली सध्याची चौकोनी अशी 'फ्लॅट संस्कृती'! आपले रोजचे जीवन म्हणजे टिचभर पोटाची कणीगभर खळगी भरण्यासाठी चाललेला उपद्व्याप! भल्या पहाटे देवाची आळवणी करण्याच्या वेळी आपण आपल्या इवल्याशा घराची फट किलकिली करतो नि कागदावरले जग आत घेतो - अहो रोजचे वर्तमानपत्र ते!

त्यात आलटून पालटून बातम्या असतात, एक हुंडा बळी - सासू, नवरा, दिर यांनी मिळून एका नववधूस जाळून मारले. चोरट्या सोन्याचा व्यापार करणारी टोळी पकडली. तरुणींवर सामुहिक बलात्कार! दोन छोट्या मुलांना पैशासाठी पळविले. कोट्याधीश साखर - सम्राट यांचा दानशूरपणा - एका छोट्या देवळाचा जीर्णोद्धार! भर दिवसा घरात शिरून वृद्ध जोडप्याचा व मोलकरणीचा खून! गर्दचा प्रचंड साठा सापडला. शेअर बाजारात प्रचंड गोंधळ! बँकेवर दरोडा! रेल रोको आंदोनास उत्तम प्रतिसाद! रेल्वे स्थानक आगीच्या भक्ष्यस्थानी! अतिरेक्यांचा बॉंबस्फोट - १० ठार, २२ घायाळ! संप, टाळेबंदी! सर्वच बातम्या मन सुन्न करणाऱ्या विषण्ण करणाऱ्या! गंमत म्हणजे काही घटना तर आपल्या हाकेच्या अंतरावर घडलेल्या असतात; पण आपल्याला पत्ता लागतो ते रामप्रहरीच्या कोणत्या तरी वृत्तपत्रातून!

हे अराजक जसे आज आहे तसेच ११व्या १२व्या शतकातही होते. तेव्हा यवनांच्या वारंवार होणाऱ्या आक्रमणाची, अत्याचारांची झळ आपल्याला सोसावी लागली होती. परकीय आक्रमण, त्यांचा अत्याचार, दुष्काळ, दुर्जनांचा दुष्टपणा अशी बजबजपुरी माजलेली होती. समाजात सर्वत्र द्वेष, मत्सर, स्वार्थ, अप्रामाणिकपणा वाढलेला होता. सत्त्वशील, सात्त्विक वृत्तीच्या सज्जन लोकांचा छोटासा गट होता, असे असतेच. वाईटांचेच प्रमाण अधिक. तामसी वृत्तीच्या दुष्ट, दुर्जनांची वाढ नेहमीच अधिक होते. कारण तो समाजाला लागलेला असाध्य रोगच. रोगाचा प्रसार जलद होतो, निराकरण मात्र अगदी सावकाश. म्हणतातच ना! आजारपण येते हत्तीच्या पावलांनी पण जाते मात्र मुंगीच्या पावलांनी!

पृथ्वीतलावरचे नंदनवन असा आपला भारत देश. अति सत्वशील, अति नीतिमान. सद्गुणांचा अन् विद्वानांचा चाहता. समृद्ध तर इतका की आपल्या देशात निघणारा सोन्याचा धूर दूरच्या यवनांना दिसला आणि सत्ता नि संपत्तीच्या लोभाने ते येथवर आले. आपल्या देशाची स्थितीच त्यांनी पालटून टाकली. आपला समाज अंतर्बाह्य ढवळून निघाला. दुष्ट दुर्जनांचा अतिरेक झाला. जवळ जवळ ५०० -६०० वर्षे सामान्य जनता पुरती होरपळून जात होती. अशा वेळी ज्ञानेशांची ओवी, एकनाथांची भारुडे, नामया - तुकयाचे अभंग, रामदासांचे मनाचे श्लोक, म्हणजे जणू श्रावणमासी बहरणारा नि जलबिंदूनी ओथंबलेला सुगंधी पण नाजूक, टपोऱ्या, हळूवार अशा प्राजक्ताचा बहरच! संतांचे हे अंगावर आनंदाचे - सुखाचे रोमांच उठविणारे चिर-वाङ्मय म्हणजे आस्मानी - सुलतानी जाचाला कंटाळलेल्या, त्रासलेल्या मराठी मनाला मिळालेले जीवन - संजीवनच

अशा वेळी विश्वात्मक परमेश्वराला

*दुरितांचे तिमिर जावो । जो जे वांछिल तो ते लाहो ॥*

असे भव्य दिव्य पसायदान मागून सगुण भक्तीचा पाया श्री ज्ञानदेवांनी घातला. होरपळलेल्या मराठी मनावर हळूवार फुंकर घातली. आणि पहिल्या पावसाने जशी धरती सुगंधित नि टवटवीत व्हावी तसे मराठी मनाचे झाले. ज्ञानेशांच्या 'एकाने' पुढे मजल मारली. "दार उघड बया दार उघड" म्हणत आदिशक्तीला साकडे तर घातलेच पण बहुजन समाजाला भारुडाद्वारे जागे केले. शक्तिची उपासना करणाऱ्या रामदास स्वामींनी तर उघड उघड व्यवहार वादच आपल्या 'दासबोधां'तून मांडला. कीर्तनाद्वारे नाम महिमा गात भक्तिचा प्रसार साऱ्या देशभर करणारे नामदेव आणि भक्तिरसात तुडुंब डुंबणाऱ्या या नामाचा तो तुका.

*बोलावा विठ्ठल । पहावा विठ्ठल । करावा विठ्ठल जीवभाव ।*

असे अंतर्बाह्य भक्ति रसाने ओथंबलेले तुकोबारायांचे जीवन. 'राम कृष्ण हरि' या 'तीन अक्षरी' मंत्राचा जप करणारे

*आनंदाचे डोही आनंद तरंग । आनंदचि अंग आनंदाचे ।*

असे म्हणत 'आनंद'मय झाले. परमेश्वराचा त्यांना साक्षात्कार घडला. जीव-शिवाचे ऐक्य त्यांना साधले नि त्यांची वृत्तीच पालटली. "अणुरेणीया थोकडा" तुका "आकाशा एवढा" झाला. *"तुका म्हणे आता उरलो उपकारापुरता ।"* असे म्हणत समाजाचा उद्धार करण्यास सुरुवात झाली. समाजाचा उद्धार म्हणजे समाजातील 'कंटक' दूर करणे आवश्यक. कंटक म्हणजे दुष्ट प्रवृत्ती. ती नाहीशी करण्याचे काम उत्स्फूर्तपणे पार पाडत होते तुकाराम महाराज. "देह कष्टविती उपकारे" असेच त्यांचे वर्तन होते.

समाजामध्ये दुसऱ्यांना त्रास देण्याची किंवा 'बळी तो कान पिळी' या न्यायाने दुर्बलांना छळण्याची प्रवृत्ती मोठ्या प्रमाणात असते. असे दुष्ट, दुर्जन लोक तुकाराम महाराजांना आपले कट्टर शत्रू वाटतात. अशा वेळी तुकाराम महाराज म्हणतात की, *"माझे संतापले मन । पर पीडा आयकोन"* म्हणूनच ते या दुष्ट दुर्जनांच्या दोषांवर, ढोंगांवर, अवगुणांवर कडाडून हल्ला चढवितात. वेळ प्रसंगी सत्ताधीशांचा रोषही पत्करतात कारण,

*मऊ मेणाहुनि आम्ही विष्णुदास । कठीण वज्रास भेदू ऐसे।*
*मेले जीत असो निजोनिया जागे । जो जो जे जे मागे ते ते देऊ।*
*भले तरी देऊ कासेची लंगोटी । नाठाळाचे काठी देऊ माथा ।*
*मायबापाहुनि बहु मायावंत । करू घातपात शत्रुहुनि ।*

केवळ 'उपकारा'पुरते उरलेले, विष्णूचे दास असे तुकाराम आत्मज्ञानाचा साक्षात्कार झाल्याने केवळ स्थितप्रज्ञाची अवस्था प्राप्त झालेले. पण हे विष्णूदास एकाच वेळी दोन परस्पर विरोधी भूमिका सहज बजावतात. ते 'मेणाहूनि मऊ' आहेत. आई वडिलांहून अधिक प्रेमळ आहेत. आपल्या कमरेचे नेसूही सोडून देण्याची त्यांची तयारी आहे. त्यांचे बोलणे, वागणे सारे अगदी 'अमृताहुनि गोड' आहे. पण हे सारे कुणासाठी? तर फक्त संत सज्जनांसाठी. पण या उलट दुर्जनांसाठी दृष्टांसाठी, पर पीडकांसाठी ते वज्राहुनि कठीण आहेत. कडू तर किती? त्यांचे कटुत्व विषालाही फिके पाडेल. एखादा शत्रू जितका घातपात करणार नाही, इतकी घातपाती वृत्ती यांची दुर्जनांसाठी असेल. या 'नाठाळांच्या माथा काठी हाणायला' ही ते मागे पुढे पाहणार नाहीत. कारण तुकाराम महाराजांच्या मते *"पर पीडक ते दावेदार"* ।

समाजात हा दुष्ट, परपीडक हरघडी आहे; पावलापावलावर आहे. तो 'लाचांचे पर्वत' घेण्यात समाधान मानणारा आहे. व्यसनाधीन आहे. व्यभिचारी आहे; परस्त्री, परधन यावर डोळा ठेवणारा आहे. आई वडिलांची सेवा न करणारा आहे. पोटच्या पोरासाठीही कर्तव्य - चुकार आहे. सोयरिक करताना मुलीच्या बापाला नाडणारा आहे. दीन दुबळ्यांवर अन्याय करणारा आहे. सभासमारंभातील, समाजातील साधे साधे नीतिनियम, रीतिरिवाज न पाळणारा आहे.

*पाने जो खाईल बैसोनि कथेसी । घडेल तयासी गोहत्याने ।*
*तमाखू ओढोनि काढील जो धूर । बुडेल ते घर तेणे पापे।।*

रीतिरिवाज न पाळणारा हा अगदी गोहत्या करणाऱ्या इतका पापी असल्याने घरादारासुद्धा तो नाशच पावेल, असे तुकारामांचे स्पष्ट मत आहे. अशा या समाज कंटकाची प्रत्येक कृती म्हणजे जणू निरपराध प्राण्यास मारणाऱ्या पारध्यासारखी आहे. या दुर्जनांना सहाय्य करणारा देखील तितकाच महापापी आहे. कारण

*फुकासाठी भोगे दुःखाचा तो वाटा । उभारुनी काटा वाटेवरी ।।*

म्हणून प्रत्यक्ष कृती करणारा व त्याला मदत करणारा या दोघांनाही अत्यंत कडक शिक्षा हवी. यासाठी तुकाराम सुंदर विवेचन करतात,

*तुका म्हणे यासी न करिता दंडन । पुढिल्या खंडण नव्हे दोषा ।*

कडक शिक्षेच्या भयाने तरी अत्याचारास आळा बसेल म्हणूनच अशा दुष्ट प्रवृत्तीचे खंडण करणे आवश्यक आहे.

*बहुता पीडी खळ । त्याचा धरावा विटाळ ।।*

त्याला लाथेने तुडवावे नि हाकलून द्यावे आणि समाजाची वाट शुद्ध, पवित्र करावी, त्याची नखे कादुनी टाकावीत. म्हणजे त्याची दुष्ट शक्ति नष्ट करावी. कारण असा दुष्ट म्हणजे समाजाला झालेला 'नारू' आहे. तो कापरा सारख्या सौम्य औषधाने जाणार नाही.

"देव्हाऱ्यावरि विंचू आला । देवपुजा नावडे त्याला ।
तेथे पैजाराचे काम । अधमासि तो अधम ।।"

महादेवाच्या पिंडीवर विंचू आहे म्हणून त्याला सोडता कामा नये. त्याला जोड्यानेच हाणले पाहिजे. दुष्टांशी गोड बोलण्यात, चांगले वागण्यात काय मतलब? त्यांच्याशी गोड बोलणे नि चांगले वागणे म्हणजे सापाला दूध पाजण्याइतकेच 'महापाप' आहे. असे विचार जेव्हा तुकाराम व्यक्त करतात, तेव्हा दुष्टांवर कोरडे हाणताना, हल्ला चढविताना तुकाराम खरोखरच "पंचानन" झाले आहेत, हे दिसून येते. म्हणून अशा या स्वार्थी लोकांसाठी,

*"एकांगी भांडे तुका । नाही धोका जीवित्वे ।"* इतके तुकाराम स्वतःच्या जीवाचीही पर्वा न करता या समाज कंटकाविरूद्ध लढताना परखड नि ताठर भूमिका ठेवतात.

सरळसरळ शत्रुत्व करणाऱ्याहूनही वाईट असा समाज कंटकांचा गट म्हणजे ढोंगी लोकांचा, दांभिकांचा, बुवाबाजी करणाऱ्यांचा, कर्मठपणे धार्मिक कृत्ये करणाऱ्या धर्म ठकांचा! हे लोक मोठ मोठे दानधर्म करतात, तीर्थयात्रा करतात, देवाल्यांचा जीर्णोद्धार करतात, पण त्यांची वृत्ती म्हणजे, *"विषयांचे चर्वणी । केली आयुष्याची गाळणी ।"* अशी असते. हे केवळ विषया सक्त असतात, अतिशय लबाड असतात. त्यांना देव आणि दगड यातील फरक समजत नाही.

*"कथा करितो देवाची । अंतरी आशा लोभाची ।।"*

वरवर देव देव करतात, पण अपेक्षा ठेवूनच. यांना दया दाखविण्याचे काहीच कारण नाही. कारण.

*"काम क्रोध मद अंगी । रंगला रंगी अवगुणी । करिता पाप न धरी शंका ।"*

असेच त्यांचे वागणे आहे.

*"भांग-भुर्का, हे साधन । पची पडे मद्यपान ।"* असे 'कली'युगातले 'संत' असल्याने झाले काय की तुकाराम म्हणतात,

*"रात्रंदिन आम्हा युद्धाचा प्रसंग । अंतर्बाह्य जग आणि मन ।"*

आत - बाहेर, मनात - समाजात सगळी कडेच संघर्ष आहे. मनात सत् प्रवृत्ती आहे, विवेक आहे तर समाजात माजलीय दुर्वृत्ती. त्यांचे मन तळमळते आहे सर्वांच्या कल्याणासाठी. जीवाची नुसती तगमग होते आहे, पण! भोवतालचा समाज असा रसातळाला गेलेला की कुठे कुठे पुरे पडावे? या दांभिक, दुष्ट, अत्याचारी समाजाला कितीही शिकवा, समज द्या उपयोग नाही. जसे कडू कार्ले तुपात घोळा नाही तर साखरेत, कडूच राहणार, तसेच दुष्टांची अपप्रवृत्ती नष्ट होणार आहे का? नाहीच.

कारण, *"नाही निर्मळ जीवन । काय करील साबण ।*
*जैसे चित्त शुद्ध नाही । तेथे बोध करील काई ।।"*

मुळातच चारित्र्य शुद्ध नसेल तर साबणाने केवळ वरची कातडी धुतली जाणार.मनाची पाटी जर कोरी नसेल, शुद्ध नसेल तर सदुपदेश काय उपयोगी? वृक्षच वठलेला असेल तर वसंत ऋतू आला म्हणून तो थोडाच बहरणार, फुलणार? पाऊस नाहीच पडला तर पीक तरी कसे

येणार? म्हणूनच तुकाराम पुढे हेही सांगतात,

*रासभ धुतला महातीर्था माजी । नव्हे तैसा तेजी शामकर्ण ।*

*तेवी खळा काय केला उपदेश । नव्हे चि मानस शुद्ध त्याचे ।*

महान अशा पवित्र तीर्थाने गाढवाला धुतल्याने का त्याचे तेजस्वी अशा 'श्यामकर्ण' वारूमध्ये रूपांतर होणार? परीसाच्या स्पर्शाने खापराचे थोडेच सुवर्णात रूपांतर होणार? समाजातील हे दोष कधीही न संपणारे आहेत. त्यावरही तुकाराम परखडपणे उपाय सुचवितात.

*"दुर्जनांचा मान सुखे करावा खंडन"* आणि एकवेळ 'विजनवास' पत्करावा, पण अशांचा संग करू नये असे सांगतात.

एके काळी ज्ञान सोपान वेगाने चढणारा भारतीय समाज आज विज्ञानाच्या वाटेनेही प्रचंड वेगाने धावत आहे. तरीही ४०० - ४५० वर्षांपूर्वी तुकारामांनी समाजातील ज्या ज्या अपप्रवृत्तींवर हल्ला चढविला त्या दुष्ट प्रवृत्ती, अपप्रवृत्ती आजही समाजात आहेत. 'राम कृष्ण हरि' हा तुकोबांनी आपला आवडता मंत्र जपत 'आधी केले, मग सांगितले', या न्यायाने आपली जीवनाची वाट चोखाळली. वैयक्तिक प्रपंचात न रमता.

*जे का रंजले गांजले । त्यासि म्हणे जो आपुले ।*

*तोचि साधु ओळखावा । देव तेथेची जाणावा ।।*

पीडितांमध्ये तुकारामांनी देव पाहिला. रंजल्या - गांजलेल्यांची सेवा केली ती परमेश्वर सेवा म्हणूनच.

*'भूतांची दया भांडवल संता । आपुली ममता नाही ।'* या न्यायाने 'पराविया सुखे' आपले सुख मानले. म्हणूनच तुकाराम पाय गरम पाण्याने शेकत, अंग रगडीत, कोणाचे? तर दमून भागून आलेल्या यात्रेकरूंचे! पथ्यपाणी करायचे पण कुणाचे? तर शेजारी आजारी असणाऱ्या आजारी व्यक्तीचे! बाजारहाट करीत, पण कोणासाठी? जवळपासच्या वृद्धांसाठी, गाई वासरांचे चारा पाणी पहात, कोणत्या? दुष्काळामुळे अनाथ झालेल्या गाई - वासरांचे! असे होते त्यांचे जीवन. सदैव दयेने भरलेले, सेवेने भारलेले. परोपकार करण्यात गुंतलेले!

भविष्य जाणून घेण्याची माणसाची सहज प्रवृत्ती असते, त्यामुळे फलज्योतिषाचे फावते. पण खेळात जसे ओली सुकी आपण करतो, कधी आपल्या बाजूने कौल लागतो, कधी नाही. तसेच फल ज्योतिषी भविष्य सांगतो, म्हणून तुकाराम म्हणतात, काया वाचा मने तुम्ही शुद्ध असाल तर, "शुभ काळ अवघ्या दिशा" अशुभाची सावलीही पडणार नाही.

उच्च नीच असा भेदाभेद जो समाजात आहे, त्यासाठी तुकाराम म्हणतात, *"शांती, क्षमा, दया अलंकार अंगा । अभंग प्रसंगी धैर्यवान । तुका म्हणे गेल्या षड्उर्मी अंग सांडुनिया । मग ब्राम्हण तोची ।।*

श्रेष्ठ कोण? उच्च कोण? ब्राह्मण कोण? काम, क्रोध आदि विकार ज्याला सोडून गेले आहेत नि केवळ दया क्षमा, शांती या सद्गुणांचाच जिथे वास आहे अशी व्यक्ती! श्रेष्ठत्वाची व्याख्या तुकाराम सहज करून जातात. आजही मूल न झाले तर नवस सायास, गंडे दोरे करणारे लोक आहेत, त्या काळीही होते. त्यावरही तुकारामांच्या मते बोकड वा बालक बळी देणे, नवस करणे हे उपाय नव्हेत, हे ठाम मत होते. एवढेच नव्हे तर 'भ्रतारा' व 'बाईले' मध्ये दोष असल्यास काय करणार? हा त्याचा रोकडा सवाल म्हणजे त्यांची पुरोगामी वैज्ञानिक दृष्टीच होय.

'बाईलेचे दास' होऊन 'पित्रास उदास' असणाऱ्या विषयासक्त लोकांचे जिणे म्हणजे 'मेंग्या गाढवाचे आहे', तर घरच्या स्त्रीस सोडून वेश्येकडे जाणारा पुरूष म्हणजे चंदन सोडून दुर्गंधीवर बसणारी माशीच जणू! किती सडेतोड बोलतात तुकाराम!

धन लोभाने वा कोणत्याही कारणास्तव मुलीची विक्री करणारे म्हणजे तुकारामांच्या मते 'अघोरा नरकापत्ता' असे आहेत.

*उच्चारिता मज ते पाप । जिव्हे काप सुटतसे ।*

इतके ते पाप भयंकर आहे असे तुकारामांना वाटते. लग्नात सुद्धा मुलीचा जणू बाजार मांडला जातो. तिची किंमत ठरविली जाते. अशा वेळी,

*तुका म्हणे देवा । काय निद्रा केली धावा ।*

म्हणत देवाला 'धावा' म्हणून विनवणीही करीत आहेत. पण, "देवा झोपी तर गेला नाहीस ना?" असा रोकडा सवालही करतात.

पूर्ण ज्ञानी जो असेल तो विनम्र असणारच. पण अर्ध्या हळकुंडाने पिवळे होणारे पांडित्य, विद्वता, म्हणजे केवळ ताठा असतो, वृथाभिमान असतो. 'मजहुनि ज्ञानी कोण आहे'? अशी तो विचारणा करीत राहतो. पण तुकारामांच्या मते असा विद्वान केवळ 'मावेचा माइंद' आहे.

अशा प्रकारे समाजातील कोणतीही विसंगती, अपप्रवृत्ती त्यांच्या नजरेतून सुटली नाही. आणि सगळ्या कठीण प्रश्नांची उत्तरे ही ते सुलभतेने मांडतात.

*जोडोनिया धन उत्तम वेव्हारे । उदास विचारे वेच करी ।*

*उत्तमची गती तो एक पावेल । उत्तम भोगील तो जीव खाणी ।*

*परउपकारी नेणे परनिंदा । परस्त्रिया सदा बहिणी माया ।।*

या संपूर्ण अभंगामध्ये तुकाराम आदर्श गृहस्थाश्रम वर्णन करतात. तुकारामांनी काय नाही सांगितले इथे? सामान्य जीवाच्या जीवन मार्गाचे सारच जणू आहे इथे. उत्तम मार्गाने धन जोडून त्याचा व्ययही विवेकाने करा. दुसऱ्यांवर उपकार करा. दुसऱ्यांची निंदा करू नका. परस्त्री ही आई, बहीण माना. सर्व प्राणी मात्रांवर दया करा. गुरा वासरांचे पालन करा. मन शांत, समाधानी ठेवा. अशा प्रकारे सर्व वागणूक उत्तम ठेवून वाडवडिलांचा, घराण्याचा लौकिक वाढवा. एवढा एकच अभंग आपण खऱ्या अर्थाने पचविला, अंगी बाणवला तर? ...... इथे साऱ्या जीवनाचा नीतिपाठ आहे.

अशा प्रकारे जो साधू आहे, संत आहे, सज्जन आहे, तो आपल्या स्वतःच्याच वर्तणुकीने नीतिपाठ घालून देतो. सामाजिक नि कौटुंबिक नीतिमत्तेचा पुरस्कार करीत राहतो. तुकारामांनी तेच केले. साधे, सोपे आदर्श नीतिपाठ त्यांनी घालून दिले. खरे बोला, चांगले वागा, पर दुःख शीतल न मानता त्यांच्या दुःखाने दुःखी व्हा. गरजवंतास मदत करा. स्वधर्म सोडू नका. राग लोभ सोडून द्या. हे साधे सोपे आदर्श कालही

उपयोगी होते, आजही उपयोगी आहेत, नि उद्याही उपयोगी पडणार आहेत. जणू या आदर्शांना, नीतिपाठांना, निकषांना त्रिकालाबाधित सत्यत्व प्राप्त झाले आहे. समाजातील सर्वच स्तरावरील विविध समस्यांना या तुकारामांनी घालून दिलेल्या आदर्शामधून, नीतिपाठांमधून अचूक उत्तर मिळते. म्हणून तुकाराम आपल्याला एक जवळचा जिवलग वाटतात; उत्तम सल्लागार वाटतात. एक थोर द्रष्टा ठरतात.

**सौ. पुष्पा अरुण जोशी.**
आय / १०२, रम्यनगरी,
स्वामी विवेकानंद पथ,
बिबवेवाडी. पुणे ४११ ०३७.

आशाबद्ध वक्ता । धाक श्रोतियांच्या चित्ता ॥१॥
वाया गेले ते भजन । उभयतां लोभी मन ॥२॥
बहिरे मुके एके ठायीं । तैसें जालें तया दोहीं ॥३॥
माप तैसी गोणी । तुका म्हणे रितीं दोन्ही ॥४॥

# तुकोबांची प्रभावळ

प्रा. अजित कुलकर्णी

तुकाराम महाराजांचे जीवनचरित्र त्यांच्या अभंगातूनच व्यक्त होत असते. ते स्वतः स्वानंदात रममाण झालेले दिसतात. तुकाराम महाराजांचे अभंग स्वसंवेद्य आहेत, ही एक त्यांची स्वानुभूति आहे. तसेच, त्यांच्या अभंगातून विविध विषयांचे दर्शन होत असते. तुकारामांची अभंगवाणी, समाजधर्म, स्वधर्म, राजधर्म, भक्तियोग, वेदाचा अर्थ, अशा विविध प्रबोधनात्मक विषयांना स्पर्श करीत असते.

या लेखातून आपण प्रभावळ म्हणजे काय हे पाहाणार आहोत. तसेच, तुकोबांची प्रभावळ कोणती याचे चिंतन करणार आहोत.

व्यक्तीचे जीवन, ज्याच्या प्रभावाने प्रभावित झालेले असते, व त्याच्या जीवनाची जी जडणघडण झालेली असते ती व्यक्ती. म्हणजे, ज्या व्यक्तीचा प्रभाव असतो, त्याची ती प्रभावळ असते. तुकोबांची प्रभावळ कोणती तर, तुकाराम महाराजांशी ज्यांचा प्रत्यक्ष संबंध आला ती शिष्यांची प्रभावळ - परंपरा. तुकारामांच्या दिव्य चरित्राचा व उज्ज्वल बोधाचा संस्कार ज्यांच्यावर घडला ते समशील व समप्रेमी भगवत्भक्त ही 'प्रभावळीतील रत्ने' असे म्हणता येईल.

तुकाराम महाराजांना बाबाजी चैतन्य, केशव चैतन्य यांचा अनुग्रह स्वप्नात झाला हे त्यांच्या अभंगातून समजते. त्यानंतर नामदेव व पांडुरंगाचा स्वप्नात अनुग्रह झाला व कवित्वाची स्फूर्ती प्राप्त झाली. वारकरी संप्रदयात गुरुपरंपरेचे जे अभंग आहेत, त्याच्यात याचे वर्णन आले आहे.

'रामकृष्ण हरी' या मंत्राचा अनुग्रह तुकोबांना माघ शुद्ध दशमीला झाला होता. त्यानंतर तुकारामांना तत्त्वबोधाची व विलक्षण अनुभवाची अनुभूती प्राप्त झाली. ज्ञानदेव, तुकाराम यांच्या ठिकाणी भौतिक सर्व परिस्थिती अनुकूल नसतानाही जे भाव काव्यातून, साहित्यातून प्रकट झाले आहेत, त्याची तुलना होऊ शकत नाही.

असं आहे की, गुरूपदेश मनुष्याला कधी होऊ शकतो तर, **'विद्यादानाला काळवेळेचे बंधन न ठेवता, निर्मळ मन, चित्तशुद्धी, होताक्षणी गुरूपदेश प्राप्त होत असतो. यासाठी स्त्री - पुरुष, वर्ण, जात-पात, धर्म यांचे काहीही बंधन त्यावेळी नसते.'** तसेच मन, बुद्धीची शुद्धी व सात्त्विक सामर्थ्य ही अध्यात्मविद्येतील शक्ती असते. ही शक्ती, ज्ञानदानास, विधिसंस्कार आचाराने साधणाऱ्यास, चित्तशुद्धीपेक्षाही श्रेष्ठ ठरू शकते. कारण विद्यादानात वैयक्तिक पात्रता हा विशेष गुण असतो.

**तुकारामांच्या प्रभावळीतील रत्ने :**

तुकारामांच्या प्रभावळीतील रत्ने म्हणजे, त्यांचा शिष्यवर्ग. संत बहिणाबाई पाठक, महिपती, कचेश्वर, व निळोबा यांना तुकाराम महाराजांनी अनुग्रह केला आहे. तसेच, त्यांचे चौदा टाळकरी व आज तुकारामांच्या प्रभावळीच्या प्रभेतील सर्व वारकरी संप्रदाय याचा समावेश करता येईल. याची अनुभूती आजही वारकऱ्यांना येत असते.

तुकारामांच्या प्रभावळीतील रत्नांची प्रभा याचे महत्त्व काही वेगळे आहे. आज वारकरी ज्ञानोबा तुकाराम करीत मैलोन् मैल देहभान विसरून, चालत असतात अशी थोर परंपरा आहे. आज वारकरी असो, अभ्यासक असो, ज्ञानदेव, तुकाराम, नामदेव, एकनाथ, यांच्या अभंगावर, ओवीवर प्रवचन, कीर्तन अथवा पी. एचडी. करीत असतात. हे एक वैभव आहे. ज्याप्रमाणे तुकाराम महाराजांना अनुग्रह झाला तसा अनुग्रह महाराजांनी बहिणाबाई पाठक यांना केला व महाराजांचे वैकुंठास गमन झाल्यावर तिघांना स्वप्नात अनुग्रह केला होता.

**संत बहिणाबाई पाठक :**

तुकाराम महाराजांनी संत बहिणाबाईना अनुग्रह दिला. गुरुकृपा प्राप्त होणाऱ्या या एकमेव महिला होत. वेरुळ जवळ देवगाव या गावच्या श्री. आऊजी कुलकर्णी यांची ही कन्या होती. आईचे नाव जानकी. घरातील वातावरण ईश्वरभक्तीचे असल्याने, बहिणाबाईचा ओढाही ईश्वरभक्तीकडे होता.

त्यावेळची समाजरचना विचित्र होती. बहिणाबाई तीन वर्षाच्या व पती गंगाधर पाठक हे तीस वर्षाचे बिजवर होते. पुढे त्यांचे हाल खूप झाले. काही कारणपरत्वे श्री आऊजी कुलकर्णी व श्री. पाठक यांना घर व गाव सोडावे लागले, व बहिणाबाईची भ्रमंती सुरू झाली. पंढरपूर, शिखरशिंगणापूर, अशा गावातून शेवटी ते कोल्हापुरी येऊन बहिरंभट यांच्या घरी बिऱ्हाड करून राहू लागले. आता बहिणाबाई रोज प्रवचन, कीर्तन, यांच्या श्रवणानी ईश्वरभक्तीत रमू लागल्या.

कोल्हापुरात जयरामबुवा रामदासी यांची कीर्तने होत असत. त्यावेळी जयरामबुवा तुकारामांच्या अभंगावर निरूपण करीत असत. त्याचा परिणाम बहिणाबाईच्या मनावर झाला व आता बहिणाबाईना तुकारामाच्या भेटीची ओढ लागली होती. बहिरंभट हेही कुटुंब अत्यंत सात्त्विक होते. गीता, भागवत याचे सदैव चिंतन घरात घडत होते. त्याचाही संस्कार बहिणाबाईवर होत होता.

एकदा बहिरंभटाना एक सवत्स धेनु कोणी दान दिली होती. तिचे चारा-पाणी ही बहिणाबाई पाहत होती. गाय, वासरू व बहिणाबाईचे प्रेमाचे नाते पाहून व स्वप्नात दृष्टांन्त झाल्याप्रमाणे, ही गाय, वासरू, बहिणाबाई व गंगाधरपंताना, बहिरंभटानी दान केली. आता बहिणेला अतिशय आनंद वाटू लागला. बहिणा गाय-वासराच्या सेवेत रमली होती.

बहिणाबाई कीर्तनाला गेल्या तरी, हे वासरू त्यांच्या बरोबर जात असे. गाय, वासरू व बहिणाबाई यांचा ऋणानुबंध हा जयरामबुवानी ओळखला होता. ते तिघेही गेल्या जन्मी थोर साधक होते. गाय व वासरू गेल्या जन्मी योगभ्रष्ट जीवात्मे होते. बहिणाबाई स्त्री जन्मात आल्या होत्या. जयरामबुवा हे जाणत होते. एकदा कीर्तन झाल्यावर, त्या वासरावर व बहिणेच्या मस्तकावर जयरामबुवानी हस्तस्पर्श केल्यावर भावसमाधीची अनुभूती प्राप्त झाली होती. त्यावेळी समाजकंटकांनी गंगाधरपंताना भडकविल व बहिणेबद्दल विपरीत गैरसमज गंगाधरपंतानी केला. त्यानंतर बहिणाबाई व ते वासरू घरी आले, तेव्हा गंगाधरपंतानी बहिणेला खूप मारले. त्याचा परिणाम फार विचित्र घडला. बहिणाबाई आजारी पडली. वासरू व गाय यांनी हाय खाल्ली व अन्नत्याग करून वासरू गेले. आता बहिणा अधिकच अस्वस्थ झाली. तिनेही अन्नत्याग केला. आता बहिणेलाही उठवत नव्हते. त्या गायीला बहिणेचे व वासराचे दर्शन नसल्याने गाय अधिक दुःखी झाली. असे चार दिवस झाले व पाचव्या दिवशी कोणी एक ब्राह्मण बहिणेच्या स्वप्नात आले व त्यांनी जे सांगितले तो बहिणाबाईचा अभंग असा कीः-

*उघडोनिया नेत्र पाहे जवं पुढे । तव दृष्टीपुढे पांडुरंग ।।*
*देखिली पंढरी ध्याना तेचि येत । जयराम दिसत दृष्टीपुढे ।।...*
*ब्राह्मण स्वप्नात देखिला तो जाण । नामाचे स्मरण मनी राहे ।।*
*न दिसे आणिक नेत्रापुढे जाण । नामाचे स्मरण मनी राहे ।।*
*पूर्वील हरिकथा आयकिल्या । त्या मनी मागुल्या आठवणी ।।*
*तुकोबांची पदे अद्वैत प्रसिद्ध । तयांच्या अनुवादे चित्तझुरे ।।*

आता बहिणाबाईना तुकारामांच्या भेटीची ओढ लागली. हा परिणाम म्हणजे तुकारामांच्या अभंगाच्या श्रवणाचा होता. आता बहिणाबाई सावरल्या होत्या. कोल्हापूरवासिनी लक्ष्मीने त्यांना शक्तिरुपाने साहाय्य केले होते. आता तुकारामाचे दर्शन घ्यावे असे वाटू लागले होते.

*मत्स्य जैसा जळावाचोनि चरफडी । तैसी ते आवडी तुकोबांची ।*
*अंतरीचा साक्ष असेल जो प्राणी । अनुभवे मनी जाणले हो ।।*

असा पूर्वसुकृतांचा अध्यात्म विद्येचा हा अभ्यास होता व या जन्माची सेवा, त्यामुळे तुकारामांचे दर्शन घ्यावे असे मनापासून वाटत होते. रामदासी मंडळीही तुकारामांचे अभंगाचे गायन करीत असत. त्यामुळे तुकारामांची महती सर्वत्र पसरत होती.

वत्स गेल्याच्या सातव्या दिवशी, तीव्र ध्यासाने, रविवारी, कार्तिक वद्य पंचमीला बहिणाबाईना तुकाराम महाराजांनी स्वप्नांत अनुग्रह दिलाः-

*नको करु चिंता आहे मी तुजपाशी । घेई अमृतासी हातीचिया।।*
*ठेवुनिया कर मस्तकी बोलिला । मंत्र सांगितला कर्णरंध्री ।।*
*म्यांही पायावरी ठेविले मस्तक । दिधले पुस्तक मंत्रगीता ।। ....*

असा हा अनुग्रह झाल्यावर बहिणाबाईचे भाव काव्यरूपात स्फुरू लागले होते. हे त्यांच्या अभंगातून समजते.

*जयाचिया पदे होतसे विश्रांती । त्याची देहाकृति विठ्ठलाची ।।*
*विठ्ठलासी तया नाही भेदभाव । ऐसे मनी मन-साक्ष आहे ।।*
*पांडुरंग तुका पांडुरंग तुका । वेगळीक देवा केवी होय ।।*
*कलियुगी बौद्धरूप धरी हरी । तुकोबाशरीरीं प्रवेशला ।।*

ही बहिणेची स्थिती जयरामबुवांना समजली होती. ध्यानी, मनी, प्रत्यक्षात बहिणाबाई कवित्वरूपात बोलू लागल्या होत्या. आता तुकारामांच्या देहू गावात जाऊन भेटावे असे वाटू लागले.

गंगाधरपंत आता अधिकच बहिणेचा राग करू लागले होते. बहिणा आता वयात आली होती तर गंगाधरपंत उतारवयाकडे झुकू लागलेले होते. त्यामुळे गंगाधरपंताच्या मनात फारच विकल्प येत होते. शेवटी गंगाधरपंत बहिणेला सोडून मी निघून जातो म्हणाले. ज्या दिवशी गंगाधरपंत घर सोडून जाणार होते, त्यादिवशीच त्यांना अतिशय ताप आला. अंगाचा दाह झाला. औषधांनी फरक पडेना. सर्वांनी गंगाधरपंताना समजावले की, बहिणाबाई पवित्र आहेत, मनात शंका आणू नका. तसेच, आजारपणाच्या काळात, बहिणाबाई गंगाधरपंतांची सतत सेवा करीत होत्या. परंतु एक दिवस एक वृद्ध गृहस्थ थेट गंगाधरपंत जेथे होते, तेथे आले व त्यांना ते म्हणाले (हे बहिणाबाईनी दारा आडून ऐकले होते) "धर्मपत्नीचा त्याग करणे बरे नाही. तुला काय मृत्यूची इच्छा झाली आहे काय? तुला जर जगावयाचे असेल तर, बहिणेचा स्वीकार कर व हरिभक्तीत रहा". त्या गृहस्थाच्या गंगाधरपंत पाया पडले व म्हणाले की, 'जीवदान द्या' आणि मग ते गृहस्थ गेले. पुढे गंगाधरपंताच्या प्रकृतीत फरक पडला.

पुढे गंगाधरपंतही म्हणू लागले, "की आपण देहूला तुकारामबुवांच्या भेटीला जाऊ". त्याप्रमाणे पुढे सर्व कुटुंबिय देहूला आले. तुकारामाचे दर्शन बहिणाबाईना झाले. देहू गावात बहिणाबाई राहू लागल्या. एक दिवस विठ्ठलाच्या मंदीरातील ओवरीत बहिणाबाईना भावसमाधी स्थिती प्राप्त झाली. 'उन्मनी स्थितीची अनुभूती बहिणाबाईना आली होती'. मग तुकाराम महाराजानी स्वगृही जाण्याचा उपदेश केला. पुढे सर्व कुटुंब - श्री. आऊजी कुलकर्णी देवगावाला गेले व , बहिणाबाई व गंगाधरपंत हे त्यांच्या गावी निघून गेले. देहू गावातच बहिणाबाईना एक कन्या झाली होती, पुढे मुलगाही झाला होता. दोन संतान होते. वयाच्या ७२ व्या वर्षी या थोर बहिणाबाईनी देहत्याग केला होता.

त्यांच्या जीवनात आणखी दोन प्रसंग अत्यंत विलक्षण असे घडले होते. तुकाराम महाराज सदेह वैकुंठाला गेले तेव्हा जाताना बहिणाबाईला सांगून पुढे गेले. व पतीचे निधन झाले तेव्हा त्या शांत होत्या व एकच म्हणाल्या की, "हे परम मृत्यूदेवता! मी प्रार्थना करीते की, माझा यांचा शरीर ऋणानुबंध संपला आहे. आता या आत्म्याला पुढे उत्तम देहप्राप्ती होऊ दे. मी या जन्माची पत्नी म्हणून सांगत आहे."

पुढे आपल्या मुलालाच बहिणाबाईनी अनुग्रहसमर्थसंपन्न केले होते व अश्विन शुद्ध प्रतिपदेस शके १६२२ (सन १७००) मध्ये सूर्योदयाचे वेळी देह विसर्जन केला.

अशा प्रकारे तुकाराम महाराजांनी दिव्य ज्ञान बहिणाबाईना दिले. त्या म्हणत, *'बहिणा म्हणे, सर्व हरपली मुळी । ते रूप न्याहाळी ज्ञानदृष्टी।।'*

अशा समर्थ प्रभावळीतील बहिणाबाईचे व्यक्तिमत्त्व व चरित्र आगळे-वेगळे आहे. बहिणाबाईचे हे अलौकिक 'स्त्रीत्व' प्रगल्भ व उत्तुंग आहे. आध्यात्मिक शक्तीने मनुष्याच्या ठिकाणी तत्त्वबोध व जीवनमुक्तीची विलक्षण अनुभूती प्राप्त होत असते. बहिणाबाईची उत्कट भक्ती, काव्यरचना, रसिकता, सौंदर्यग्रहणाची शक्ती विलक्षण प्रभावी आहे. बहिणाबाई दैववादी, प्रारब्धवादी वाटल्या, तरी नेभळट वृत्तीच्या नाहीत. त्या प्रतिकूल परिस्थितलाही सामोरे जाताना शांतवृत्ती, समचित्तवृत्ती, तितिक्षा हे प्रभावीपणे दिसत होते. बहिणाबाईचे जीवनचरित्र म्हणजे स्त्रीमधील स्वयंप्रज्ञेची एक ताकदीची प्रचीति आहे. पुढे ही परंपरा बहिणाबाईनी मुलाला अनुग्रह देऊन पुढे चालू ठेवली.

**(२) निळोबा पिंपळनेरकर -**

निळोबा देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण होते. त्यांचे कुटुंब अत्यंत विरागी वृत्तीचे व शिवभक्त, परंतु पंढरीची वारी करणारे होते. पंढरीच्या वारीत तुकारामांच्या वृत्तीने व अभंगवाणीने अत्यंत प्रभावित झाले होते. पंढरपूरला तुकाराम व निळोबा यांची भेट झाली होती. तुकाराम महाराजांनी आपल्याला अनुग्रह द्यावा ही प्रार्थना निळोबांनी तुकारामांना केली होती. तुकाराम महाराज म्हणाले - 'देहूला या, तेथे पाहू.' निळोबा पारनेरला जाऊन देहूला जाऊ असे म्हणून कार्तिकीवारीहून परतले. परंतु, पारनेरची आवरा आवर करून परत देहूला आले त्यावेळी त्यांना समजले कीं तुकाराम महाराज सदेह वैकुंठाला गेले. त्यांना वाईट वाटले. परंतु संतांच्या शद्बावर दृढ विश्वास होता, श्रद्धाही होती. शेवटी इंद्रायणी तीरावर निळोबांनी अन्नपाणी वर्ज्य करून ४२ दिवस उपोषण केले. त्यावेळी पांडुरंग स्वतः आले व निळोबांना म्हणाले की, "तुकाराम येऊ शकणार नाहीत... मी आलो आहे. हवे ते माग..." त्यावेळी पांडुरंगाला निळोबा म्हणाले की,

*येथ तुजलागी बोलविले कोणी*
*प्रार्थिल्या वाचुनि आलासी कां? ...*

असे भक्त असतात. शेवटी तुकारामाना पांडुरंगाने अनुग्रहासाठी पाठविले व निळोबांना स्पर्श-अनुग्रह झाला आणि कवित्वस्फूर्ति प्राप्त झाली. त्यात निळोबा म्हणतात -

*येवोनिया कृपावंते । तुकयास्वामी सद्गुरुनाथे ।।*
*हात ठेविला मस्तकी । देऊनि प्रसाद केले सुखी ।।*
*माझी वाढविली मती । गुण वर्णावया स्फूर्ति ।।*
*निळा म्हणे मी बोलतो । दिसे परी त्याची सत्ता ।।*

पुढे वारकरी परंपरेचे सर्व अधिकार निळोबांकडे आले होते. अनेक कविता, अभंग रचना त्यांनी केल्या होत्या. निळोबांची काव्यरचना साधी, सोपी व प्रासादिक आहे.

**(३) महीपती -**

देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण कुटुंबात महीपती ताहराबादकर यांचा जन्म झालेला होता. कुटुंब ईश्वरनिष्ठ होते. महिपतीचे हस्ताक्षर सुंदर होते. यवन दरबारात नोकरी करीत होते. यांना तुकारामांनीं स्वप्नात अनुग्रह दिला होता व तुकारामांनी महिपतींना संतचरित्र काव्यात लिहिण्याची आज्ञा केली होती.

महीपती लिहितात -

जो भक्तीज्ञान वैराग्य पुतळा । ज्याचे अंगी अनंत कळा ।।
तो सद्गुरू तुकाराम । आम्हांसी जोडला । स्वप्नी उपदेश दिधला उपदेश।।

असे महिपती अत्यंत प्रेमळ, नम्र, बहुश्रुत होते. भक्तिविजय, भक्तलीलामृत, संतविजय, संतलीलामृत हे ग्रंथ महिपतींनी लिहिले आहेत. वासकर, आजरेकर, शिरुरकर यांचेकडे संप्रदायाची धुरा पोहचविली व महीपती इ.सन १७९० मध्ये वयाच्या सुमारे ७५ व्या वर्षी समाधिस्थ झाले.

**(४) कचेश्वर -**

पुणे जिल्ह्यातील चाकण गावचे रहिवासी, देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण. ते मोठे तपस्वी व संपन्न, अयाचित वृत्तीचे ब्राह्मण होते. कचेश्वरांनाही तुकारामांनी स्वप्नात अनुग्रह केला होता.

*ठेवियला माझ्या माथ्यावरी हात । स्वये झाला गुप्त स्वप्नामाजी।।*
*तेथुनिया स्फूर्ति तुकोबांनी दिली । येर दिवशी केली कथा दोन।।*

संस्थानिक व राजघराण्याशी यांचा संबंध होता. सन १७३१ मध्ये साताऱ्याजवळ कचेश्वरांनी समाधी घेतली.

**(५) हैबतबाबा -**

हैबतबाबा हे इंदौर कडील. परंतु यांनाही तुकारामांचा व ज्ञानदेवांचा अनुग्रह झाला व आज जे आषाढीला पालखीचे वैभव दिसते ते या हैबतबाबामुळे दिसत आहे. यांनाही स्वप्नात अनुग्रह झाला असून "कीर्तनाद्वारे भक्तिमार्गाचा प्रसार करावा" हा उपदेश झाला, व त्यानुसार हैबतबाबांनी कार्य केले होते.

**(६) तुकारामांचे चौदा टाळकरी :**

१) रामेश्वर भट्ट वाघोलीकर :- तुकाराम महाराजांची आज प्रसिद्ध असलेली आरती यांनी केलेली आहे.

२) गंगाधर मवाळ (कडूसकर) :- तळेगाव दाभाड्याचे रहिवासी.

३) कोंडभट लोहोकरे :- काशीयात्रेला गेले तेव्हा तुकारामांनी तीन अभंग विश्वनाथाला समर्पण केले होते, ते यांचे बरोबर दिले होते.

*तुम्ही विश्वनाथ । दीन रंक मी अनाथ ।।...*

४) संताजी तेली जगनाडे :- चाकणचे रहिवासी.

५) नावाजी माळी :- तुकाराम महाराजांना कीर्तनात हार घालीत असे.

६) शिवाजी कासार :- लोहोगावचा रहिवासी - तुकाराम महाराजांच्या सांगण्यावरून गावात विहीर बांधून लोकोपकारक कार्य केले.

७) आबाजी जोशी लोहोगावकर :- लोहोगावचे रहिवासी.

८) कोंडपाटील लोहोगावकर :-कीर्तन साथ करीत असत.

९) महादजीपंत जोशी देहूकर :- तुकारामांचे जेवण झाल्याशिवाय स्वतः जेवत नसत.

१०) गवरशेट सुदुंब्रेकर :- मृत्युसमयी तुकाराम महाराजांचे दर्शन झाले.

११) कान्होबा मोरे :- तुकाराम महाराजांचे कनिष्ठ बंधू. तुकयाबंधू नावाने काव्य रचना केल्या होत्या.

१२) मालजी गोड येलवाडीकर :- तुकाराम महाराजांचे जावई.

१३) मल्हारपंत कुलकर्णी :- कीर्तनात साथ करीत असत.

१४) महादेव देहूकर :- कीर्तनात साथ करीत असत.

असे हे चौदा टाळकरी होत.

**प्रभावळीचे आध्यात्मिक क्षेत्रातील कार्य :**

सृष्टीत सातत्याने बदल घडत असतात. जीवन सुखरूप व्हावे. समाधानी व्हावे असे मनुष्याला सतत वाटत असते. मनुष्यजीवनाला दोन अंग आहेत (१) बहिरंग (२) अंतरंग.

बहिरंगात जे बदल घडत असतात, ते भौतिक विज्ञानाने दिसून येतात. हे बदल स्थूल स्वरूपाचे असतात. हे प्रवाहित असतात. परंतु, नवनवीन रूपाने दृश्यमानही होत असतात.

अंतरंगात जे बदल होतात ते, संत, महात्मे यांचा सहवास व त्यांचे साहित्य यांच्याद्वारा असतात. हे बदल मनुष्याच्या मानवी व्यवहारातून आचरणाद्वारा प्रकट होत असतात. खरे म्हणजे हाच प्रवाह समाजाची प्रगती व विकास घडवू शकत असतो. त्याने मनुष्य जीवनाला सुंदर वळण लागत असते.

तुकाराम महाराजांनी अभंगद्वारा जीवनाचे तत्त्वज्ञान सांगितले हा 'सामाजिक धर्म' साधला आहे. निरंतर समाधानाची जोड पराविद्येशी केली आहे. अध्यात्म शक्तीने - विद्येने -, आत्मबोधाबरोबर सामाजिक तत्त्वबोधाची प्रेरणाही प्राप्त होऊ शकते. या आत्मबोधाबरोबर समाजप्रबोधन घडत असते. तेव्हाच राष्ट्र उभारणीच्या कार्यात या विचारांचे स्थान प्रगमनशील राहते. अशा प्रेरणेनेच ज्ञानदेव, रामकृष्ण परमहंस, विवेकानंद, दयानंद सरस्वती, तुकाराम, रामदास इ. संतांनी कार्य केले आहे. समाजातील अनिष्ट चालीरीती, रूढी, परंपरा याबद्दल बंड पुकारले व लोकांना आत्मोन्नतीसाठी मार्गदर्शक झाले आहे. अशा प्रकारे संतपरंपरा, परमार्थमार्गातील अध्यात्मविद्येच्या परिपोषाने, कैवल्यवृक्षावरील ही उमललेली नित्य ताजी टवटवीत अशी फुले आहेत असे म्हणावेसे वाटते.


**प्रा. अजित कुलकर्णी**
६२५, नारायण पेठ,
फ्लॅट नं. १३, संपदा अपार्टमेंट,
लोखंडे तालीम शेजारील बोळात
पुणे - ४११ ०३०.

# थोरामोठ्यांचे विचार आणि आपण

प्रा. वि. न. धारपुरे.

- सुभाषित -

*पठतो नास्ति मूर्खत्वम् । जपतो नास्ति पातकम् ।।*

*मौनिनः कलहो नास्ति । न भयं चाऽस्ति जाग्रतः ।।*

अर्थ : अभ्यास केल्यामुळे मूर्खपणा लोप पावतो. जप करणाऱ्याच्या हातून पाप होत नाही. मौन पाळणाऱ्याचे कोणाशी भांडण होण्याचा संभवच उरत नाही आणि जागरूक असणाऱ्याला कशाची भीति शिल्लक राहात नाही.

**खरा ज्ञानवंत कोण?**

संत तुकाराम महाराज म्हणतात –

*उपकारासाठी बोले हे उपाय । येणेविण काय आम्हा चाड ।।*

*बुडतां हे जन न देखवे डोळा । येतो कळवळा म्हणउनि ।।*

*तुका म्हणे माझे देखतिल डोळे ।। भोग देते वेळे येईल कळो ।।*

*मार्गाधारे वर्तावे । विश्व हे मोहरे लावावे ।।*

*अलौकिका नोहावे । लोकांप्रति ।।*

अर्थ : अज्ञानाच्या प्रवाहाबरोबर वाहत चाललेले लोक जर एखादा सिद्ध ज्ञानी निर्विकार तटस्थतेने पाहात असेल तर त्याच्या ज्ञानाचा समाजाला काय उपयोग? निष्काम झालेल्या ज्ञानी पुरुषानेही आपले कर्तव्यकर्म आणि समाजकार्य अखंड केले पाहिजे. आदर्श भक्त, स्थितप्रज्ञ यांचा धर्म लोकजीवनाला उन्नत करण्यासाठी प्रयत्न करीत राहणे हाच असतो.

संत ज्ञानेश्वर महाराज म्हणतात –

*की प्राप्तकर्म सांडिजे । येतुलेनि नैष्कर्म्य होईजे ।*

*हे अर्जुना वाया बोलिजे । मूर्खपणे ।।*

*देखी प्राप्तार्थ जाले । जे निष्कामता पावले ।*

*तेयांही कर्तव्य असे उरले । लोकांलागी ।।*

अर्थ : निष्क्रियता किंवा नैष्कर्म्य ही अनैसर्गिक गोष्ट आहे. (निवृत्ति म्हणजे निष्क्रियता नव्हे.) ज्ञानी पुरुष कर्मसंन्यास घेऊन निष्क्रिय झाला, तर समाजाचे नियमन करणारी ज्ञानशक्तिच क्षीण झाली असा अर्थ होईल. कारण ज्ञानवंत जेव्हा कर्मप्रवृत्त असतात, तेव्हा ते लोकजीवनाला प्रकाश देऊ शकतात. खरा ज्ञानवंत उदासीन, निष्क्रिय राहूच शकत नाही. जगातले अन्याय, अत्याचार पाहून तो अस्वस्थ होतो आणि अन्यायाविरूद्धच्या संघर्षात स्वतःला झोकून देतो, कर्म करण्यातला आनंद घेतो. फलाची आसक्ति कधीच धरीत नाही. यालाच 'निष्काम कर्मयोग' म्हटले आहे.

*'ठेविले अनंते तैसेचि रहावे'* याचा अर्थ 'काहीही न करता नुसते बसून राहावे' असा नाही हे सदैव लक्षात ठेवून जगावे.

आजच्या जगात पदोपदी अत्याचार चालले आहेत. निरपराध लोकांची नाहक हत्या घडत आहे. मानवाचा पशू बनतो आहे. दाही दिशांना दुर्बल जनतेच्या किंकाळ्या, तर सबल दुर्जनांच्या गर्जना यांनी वातावरण भरून राहिले आहे. मनुष्यातले मनुष्यपण म्हणजेच देवपण लयाला चालले आहे. तुझा तूच देव आहेस असे म्हणण्याऐवजी तुझा तूच दैत्य आहेस असे म्हणावे लागत आहे. अशा वेळी ज्ञानवंताला आपल्याच ध्यानात निमग्न राहून समाजाकडे दुर्लक्ष करण्याचा अधिकारच नाही. उच्च जीवनमूल्यांची लक्तरे होऊ नयेत म्हणून ज्ञानयोग आणि कर्मयोग यांचा संगम झाला पाहिजे. नाहीतर दुर्जन 'क्रियाशील' व सज्जन ज्ञानी मात्र 'निष्क्रिय' अशी दुरवस्था निर्माण होईल. आजचे राजकारण गुन्हेगारी, गुंडगिरी आणि भ्रष्टाचार या त्रयींनी बरबरटलेले अनुभवास येते आहे. *'यथा राजा तथा प्रजा'* या उक्तीप्रमाणे जसे राज्यकर्ते तसा समाज असे वातावरण झाले आहे. स्वामी विवेकानंदांचे कार्य व उपदेश जनता विसरत चालली आहे. 'विश्वबंधुत्व' कोठे आहे? स्त्रियांना मातेसमान मान दिला जातो आहे का? दीनदुबळ्यांच्या मुखात सुखाचे चार घास पडताहेत कां? प्राणिमात्रांना दया दाखविली जाते आहे का? जगातला कोणता मानव निर्भय जीवन जगतो आहे? अशा कित्येक प्रश्नांची उत्तरे आज नकारार्थीच मिळत आहेत आणि म्हणूनच कोणत्याही राष्ट्रातील प्रजेला उद्याची खात्री देता येत नाही ही वस्तुस्थिती आहे. या जगात सध्या एकाच गोष्टीला फार मोठी प्रतिष्ठा लाभली आहे आणि ती गोष्ट म्हणजे 'पैसा'. पैशाने विकत घेता येईल १) बिछाना, परंतु झोप नव्हे, २) पुस्तके, परंतु बुद्धिमत्ता नव्हे, ३) अन्न, परंतु आस्वाद नव्हे, ४) औषधे, परंतु आरोग्य नव्हे, ५) चारभिंतीवर छप्पर, परंतु घर नव्हे, ६) समृद्धी, परंतु संस्कृती नव्हे, ७) मनोरंजन, परंतु सुख नव्हे, ८) प्रेम, परंतु आत्मीयता नव्हे, ९) अपत्य, परंतु मातृत्व नव्हे, १०) देव, परंतु देवत्व नव्हे. जेथे प्रसिद्धी, पैसा आणि प्रतिष्ठा तेथे घमेंड उत्पन्न होणारच, उलट यशाकरिता हवेत कष्ट, काटकसर, आणि चिकाटी. पैसा म्हणजे सर्वस्व नव्हे. पैसा म्हणजे फक्त सोय होय. गैरसोयीऐवजी सोयी मिळविण्यासाठी पैसा मिळविणे गैर नाही. पण पैसा हे 'साध्य' नसून 'साधन' आहे याची जाण आयुष्यभर ठेवली पाहिजे.

राजकारणाबद्दल सॉक्रेटीस म्हणतात, 'राजकारण हे आध्यात्मिक झाले पाहिजे.' (Politics must be spiritualised)

जगाचा सर्व कारभार दोनच शक्तींवर चालतो. एक तर दुसऱ्यावर जबरदस्त उपकार करता येतील अशी ताकद पाहिजे, ती नसेल तर दुसरी

शक्ती म्हणजे तितकाच जबरदस्त उपद्रव देता येईल अशी एखादी गोष्ट हवी, तरच तुमची कामे होतील. आज अमेरिका आणि पाकिस्तान ही दोन राष्ट्रे याची उदाहरणे होऊ शकतील.

माओ-त्से-तुंग म्हणत, 'स्वातंत्र्य आणि शिस्त या दोन परस्पर विरोधी गोष्टी असल्या तरी त्या एकाच वस्तूच्या दोन बाजू आहेत. यांपैकी कोणत्याही एका गोष्टीवर जास्त भर देता कामा नये. कारण प्रत्येक समाजाला ह्या दोन्ही गोष्टींची आत्यंतिक गरज आहे. तसेच सतत दक्ष राहून व जरूर ते फेरबदल करून स्वातंत्र्य आणि शिस्त, निष्ठा आणि व्यक्तित्व यांच्यातला तोल सांभाळणे जरुरीचे असते.'

स्वामी विवेकानंदांचे समकालीन, जाज्वल्य राष्ट्राभिमान असणारे, 'स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे, आणि तो मी मिळविणारच' असे ठणकावून सांगणारे थोर देशभक्त, लोकमान्य बाळ गंगाधर टिळक म्हणतात –

१) मनुष्य स्वभावच असा आहे की, हातात आलेली सत्ता कोणी सुखाने सोडू इच्छित नाही.

२) सत्तेची आणि शहाणपणाची फारकत झाल्यानंतर निव्वळ सत्तेने केलेल्या गोष्टी लोकांना असह्य होऊन लोकांचे सत्तेबद्दल असलेले समजही पालटत जातात.

३) मनुष्य कितीही शहाणा असला तरी जोपर्यंत देशातील बहुमत त्याच्या बाजूचे नाही तोपर्यंत त्याचे मत म्हणजे देशाचे मत नव्हे.

४) देशाच्या भरभराटीचा व सुस्थितीचा पाया म्हटला म्हणजे, देशात संपत्तीच्या, उत्पत्तीच्या, बुद्धीच्या साधनांची समृद्धी ही होय.

५) कालाची गती ओळखून जर देशातील पुढाऱ्यांनी आपला कार्यक्रम बदलला नाही तर काल पुढे जाईल व पुढारी मागे पडतील. पुढाऱ्यांकरिता काल थांबणार नाही.

६) समाजाचा व्यवहार, समाजाचे विचार, समाजाचा व्याप आणि समाजाची भाषा यांच्यामधील संबंध इतका निकट आणि नित्य आहे की, एकाचे प्रतिबिंब दुसऱ्यात उमटल्याखेरीज कधीही राहात नाही.

७) हिंदुस्थानात शेतकरी हा राष्ट्राचा आत्मा आहे. त्याच्यावरील मालिन्याचा पगडा जर दूर करता आला तरच हिंदुस्थानचा उद्धार करता येईल. याकरिता शेतकरी आपला व आपण शेतकऱ्याचे असे आपणास वाटावयास हवे.

**- तुम्ही कसे वागाल -**

तुमच्या स्वतःच्या आयुष्यात क्रांती घडवून आणायची असेल तर,

१) लोक असे का वागतात हे समजून घ्या, २) चेहरा हसरा ठेवा, ३) कुणाची कधी ओळख झाली तर त्याचे नावगाव कधी विसरू नका, ४) अधिक तर दुसऱ्याला बोलू द्या, ५) तुम्ही त्याला काय सांगायचंय, हे ऐकून घ्या, ६) त्याच्या आवडीचा विषय काढून बोला, ७) त्याचं महत्व काय हे आधी लक्षात ठेवा. तुम्ही रोजच्या व्यवहारात ह्या सात गोष्टी आचरणात आणल्यात तर तुमचा फायदा झाला नाही, तरी यात नुकसान नक्कीच नाही.

जे जे उत्तम आहे ते ते आपण वाचतो आणि लक्षात ठेवण्याचा प्रयत्न करतो, चांगले असेल ते बोलतो, पण प्रत्यक्षात आपण स्वतः तसे वागतो का याचे आत्मनिरीक्षण करा. संतांच्या शिकवणीनुसार मानवाने प्रत्यक्षात जगायचे असते हे अभिप्रेत आहे. संत रामदास म्हणतात *'बोले तैसा चाले त्याची वंदावी पाऊले.'* मी स्वतः अशा पावलांच्या शोधात आहे. आपणही या शोधात सहभागी व्हाल ना!

ॐ शुभं भवतु ॥

**प्रा. विनायक न. घारपुरे**
९ वसंतबाग सह. गृह. संस्था (म),
स्वामी विवेकानंद मार्ग,
बिबवेवाडी परिसर,
पुणे - ४११ ०३७.
दूरध्वनी : ४१०६४६.

---

ठाकलासे द्वारीं । उभे याचक भिकारी ॥१॥
मज भीक घाली देवा । प्रेमभातुकें पाठवा ॥२॥
याचकाचा भार । नये घेऊं येरझार ॥३॥
तुका म्हणे दान । सेवा घेतल्यांवाचून ॥४॥

---

# संत तुकारामांच्या अभंगांमधील वनश्रीतील पर्यावरण

श्री. गजानन शं. खोले

पर्यावरण या शद्बाला आजकाल फार महत्त्व प्राप्त झाले आहे, आणि केवळ भारताच्याच दृष्टीने नव्हे तर जगातील पश्चिमी राष्ट्रांच्या दृष्टीनेही पर्यावरण हा विषय महत्त्वाचा आणि गांभीर्याचा झालेला आहे. जागतिक पातळीवरती शास्त्रज्ञ त्याचा विचार करीत आहेत. विद्यापीठे, विद्यालये यामधून त्याच्या अध्यापनाचे खास विभाग सुरु झालेले आहेत. आजच्या काळाची ही निकडीची गरज, या दृष्टीने पाहता हे सगळे ठीक घडत आहे.

पण यामध्ये जी तत्त्वे शोधून काढली गेली आहेत, अन् जात आहेत त्यांचे श्रेय मात्र संपूर्णतः जर्मनी, इंग्लंड, फ्रान्स, अमेरिका वगैरे राष्ट्रांमधील शास्त्रज्ञांना दिले जात आहे. त्यांची सरकारे आणि प्रसार माध्यमे याबाबतीत अतिशय तरबेज आणि जागृत आहेत. तौलनिकदृष्ट्या बघतां आपल्या भारतामध्ये नेमकी उलट स्थिती आहे. गंगा आपली खरी, परंतु तिचे जल परकीयांच्या ओंजळीतून आपण प्राशन करीत आहोत, याची जाणच आम्हाला नसल्याकारणाने त्या गंगाजल-प्राशनात आम्हाला खेदही वाटत नाही. ही तर यामधील मोठी शोकांतिका होय. आणि याला कारण आपले जे ऋग्वेद, यजुर्वेद, सामदेव, अथर्ववेद, उपनिषदें, पुराणे, महाभारत, ब्रह्मसूत्रे, भगवद्‌गीता, शांकरभाष्य, ज्ञानेश्वरी आणि संत तुकाराम महाराज यांची गाथा, समर्थ रामदास यांचा दासबोध आदी वाङ्मयाकडे काहीजण, जुनाट, बुरसटलेले, कालबाह्य झालेले अशा, ते न वाचताच विचारसरणीने बघणारे आहेत. अन् कांहीजण हे सगळे ग्रंथ परतत्त्व विशद करणारे आहेत, अशा विचारसरणीने त्याकडे बघणारे आहेत. ते फक्त या ग्रंथांची पारायणेच करीत राहिले. या दोन्ही प्रकारच्या लोकांमुळे, या ग्रंथांमध्ये पर्यावरण, प्रदूषण या व अशा निरनिराळ्या शास्त्रांचा जो उहापोह करण्यात आलेला आहे त्याचा अभ्यास होणे, त्यावर चिंतन, मनन, संशोधन करणे, हा भाग वंचितच राहिला गेला.

पर्यावरण (इन्व्हायरमेंन्ट) या शास्त्राचे प्रामुख्याने प्रकाश, हवा, पाणी, प्राणी व स्थावरे हे पाच प्रमुख घटक पाश्च्यात्त्य शास्त्रज्ञ मानतात. याशिवाय या प्रत्येक घटकामध्ये बरेच उपघटकही त्यांनी गृहीत धरलेले आहेत, ते सर्व वेदकालापासून आपल्याकडे मानण्यात आलेल्या पृथ्वी - आप - तेज - वायू आणि आकाश या पंचमहाभूतांवर आधारित आहेत. उपलब्ध झालेल्या ग्रंथांमध्ये ऋग्वेद हा जगातील सर्वात पहिला ग्रंथ (मौखिक स्वरूपातील) हे संशोधनांती सिद्ध झालेले आहे. ऋग्वेदादी वेदांमधील यज्ञयाग, कर्मकांड हे भाग बाजूला ठेऊनसुद्धा पंचमहाभूतांच्या संदर्भात त्यामध्ये असलेली असंख्य सूक्ते, पर्यावरण - प्रदूषण या दृष्टीकोनातून अभ्यासली कां गेली नाहीत? त्यावर संशोधनात्मक ग्रंथ फारसे कां लिहिले गेले नाहीत? हें जर झाले असतें, तर रोग झाल्यावर तो बरा करीत बसण्याची वेळच आज आली नसती, कारण प्रदूषणासारखे रोग झालेच नसते!

परंतु जे झाले नाही, त्याबाबत आता कितीही ओरडत राहिले तरी त्याचा कांही उपयोग नाही, असे कांही जण म्हणतील. पण त्यांच्याशी मी सहमत नाही. उशिरा का होईना पण अजूनही आम्ही जागे होऊन ऋग्वेदापासून ते संत तुकाराम महाराज, समर्थ रामदास यांच्या वाङ्मयापर्यन्तच्या ग्रंथांचा पर्यावरणाच्या दृष्टिकोनातून अभ्यास आणि त्यावर संशोधन करणे जरूर आहे. त्यासाठी आपले हात कुणी बांधून ठेवलेले नाहीत. नाहीतर पाश्चिमात्य शास्त्रज्ञांनी संशोधन करून काही तत्त्वे प्रसिद्ध केली, की मग फक्त 'हे ज्ञान तर आमच्या वेदांमध्येही सांगितलेले आहे' अशा कोरड्या फुशारक्या मारीत रहाणे, याला व्यावहारिकदृष्ट्या शून्य किंमत आहे, आणि पारमार्थिक दृष्ट्याही बोलावयाचे झाल्यास ते एक प्रकारे पापच ठरेल!

पण स्वतः कांही न करतां इतरांना दोष देत राहाणे हेही चूकच असते. नैतिकदृष्ट्या तो गुन्हा आहे. हा विचार मनात आला आणि गेली सात-आठ वर्षे मी 'ज्ञानदेवांच्या वनश्रीतील पर्यावरण' या विषयावर संशोधनपर अभ्यास करू लागलो. 'सकाळ' वृत्तपत्रांतील संपादकीय विभागात मी होतो. तेथील नोकरी संभाळून घरी हे काम करू लागलो आणि २० नोव्हेंबर १९९० रोजी नियमाप्रमाणे तेथून निवृत्त झाल्यावर ज्ञानेश्वरीतील पर्यावरण या विषयाला संपूर्ण वाहून घेतले. आणि त्याचा ग्रंथ (पानें ११९६ आकार डेमी) सिद्ध झाला. कार्तिक वद्य १३, शके १९१७, ज्ञानेश्वर माऊलीच्या ७०० व्या संजीवन समाधि-सोहळ्याचा शुभारंभाचा पुण्यदिन. या दिवशी आळंदीला माऊलीच्या समाधीला पहिली प्रत बाल अंध आणि ब्रेल लिपीत ज्ञानेश्वरीकर्ते हरिभक्तिपरायण गणपतमहाराज जगताप यांच्या शुभहस्ते अर्पण करून 'ज्ञानदेवांच्या वनश्रीतील पर्यावरण', या माझ्या ग्रंथाचे प्रकाशन भावपूर्ण पूजेने केले.

पर्यावरण शास्त्रामध्ये वनश्री (स्थावरे) याव्यतिरिक्त प्रकाश, आकाश, पृथ्वी, पाणी हे चार घटक येतात. उपमा, दृष्टांत स्वरूपात पर्यावरणाला उपयुक्त असणारा त्यांचाही विचार माऊलीने आपल्या समग्र वाङ्मयात सूक्ष्मतेने केलेला आहे. परंतु हे चारी घटक घेऊन त्यावर संशोधन करणे हे कदाचित माझ्या आवाक्याबाहेर (माझे वय ६६ वर्षाचे आहे) जाईल असे वाटल्यावरून मी फक्त त्यातील वनश्री व तिच्या अनुषंगिक विषयापुरतीच मर्यादा ठरवून घेतली. तरी हे काम सात-आठ वर्षे दैनंदिन आठ ते दहा तास करावे लागले. त्यातून आर्थिक प्राप्ति शून्य

झाली. मानसिक आनंद प्राप्ती मात्र अनमोल ठरली!

ज्ञानेश्वरी, अमृतानुभव व माऊलीचे अभंग यांचा हा अभ्यास, चिंतन मनन करीत असताना किंचित् रुचीपालट म्हणून मी संत तुकाराम महाराज आणि संत नामदेव महाराज यांचे अभंग, दासबोध व समर्थांचे समग्र वाङ्मय, संत एकनाथ यांचे समग्र वाङ्मय यांचेही वाचन करीत होतो. तेव्हा ज्ञानदेवांच्या वाङ्मयाप्रमाणे संत तुकाराम आदी वरील तीन संताच्या लिखाणातही पर्यावरणशास्त्र विशद करणारे बरेच काही आहे हे लक्षात आले. आणि आता या दृष्टीकोनातून संत तुकाराम महाराज यांच्या अभंगांचा अभ्यास करीत आहे. अजून तो पूर्ण झालेला नाही. माझे बंधू श्री. शाम शंकर खोले (निवृत्त दंडाधिकारी) हे मला या कामांत लेखनाचे सहकार्य करीत असून तुकाराम महाराज यांचे वनश्री-वाचक असलेले सुमारे पाचशें अभंग लिहून झालेले आहेत. आणखी सुमारे एक हजार अभंग तरी निघतील असा अंदाज आहे.

हा ऊहापोह येथे करण्याचे कारण असे की, आतापर्यन्त संत तुकाराम महाराज यांच्या, अभ्यास झालेल्या सुमारे पाचशे अभंगावरच माझा 'संत तुकारामांच्या अभंगातील वनश्रीमधील पर्यावरण' हा लेख आधारित आहे, हे चिकित्सक, जाणकार, तज्ञ वाचकांना मी आधींच सांगू इच्छितो.

ऋग्वेदादी वेदांमधील वनस्पतींची छाया उपनिषदांवर, उपनिषदांमधील वनश्रींची छाया पुराणांवर, पुराणांमधील वनश्रींची छाया महाभारत, रामायण, ब्रह्मसूत्रें, भगवद्‌गीता, योगवासिष्ठ, शांकरभाष्य यावर पडली असून या व त्या आनुषंगिक ग्रंथांमधील वनश्री व अन्य विषयांची छाया ज्ञानेश्वरी, अमृतानुभव व माउलीचे अकराशें अभंग यावर पडलेली आहे. व ज्ञानेश्रीतील वनश्रीची छाया संत तुकाराम महाराज यांच्या अभंगांवरही पडलेली आहे. असा वरील ग्रंथांमधील वनश्रींचा तौलनिक अभ्यास करताना स्पष्टपणे जाणवते. ही तौलनिकता (गाथा सोडून) मी 'ज्ञानदेवांच्या वनश्रीतील पर्यावरण' या माझ्या ग्रंथामध्ये विस्तृतपणाने दिलेली आहे. याला साहित्यशास्त्रामध्ये बिंब - प्रतिबिंब भाव म्हणतात. यामध्ये वावगे काही नाही. वडिलोपार्जित वाङ्मयीन ठेव्याचा वारसाहक्काने उपभोग घेण्याचे हे स्वातंत्र्यच असते.

संत तुकाराम महाराजांनी तर असे म्हणूनंच ठेवलेले आहे की, *'ज्ञानियांचा राजा गुरू महाराव'* (अभंग क्रमांक ३३७२, जोग महाराज गाथा) आणखी एका अभंगातील चरणामध्ये ते म्हणतात ...

*तुका म्हणे माझा उच्छिष्ट प्रसाद । निवडी भेदाभेद वृष्टिन्याय ॥*

(अभंग ४३२)

(तुकाराम महाराज म्हणतात, व्यासादिक संतांनी मेघवृष्टिप्रमाणे केलेल्या सहज उपदेशाचा उच्छिष्टप्रसाद मला प्राप्त झाला आहे. त्या आधारानेच मी गुण व अवगुण यांची निवड करून बोलत आहे.)

या अभंगातील 'वृष्टिन्याय' हा शब्द पर्यावरण वाचक असून मेघवृष्टी होऊ लागली की ती, सुपीक-नापीक जमीन, गरीब - श्रीमंत, जातपात असा भेदभाव करीत नाही. यामध्ये महाराजांनी 'वृष्टिन्याय' हा शब्द मोठ्या प्रज्ञेने आणि बहारीने उपयोगात आणलेला आहे.

'पयस्' या संस्कृत भाषेतील शब्दापासून 'पय' शब्द मराठी भाषेत निर्माण झाला. 'पाणी' असा या दोन्ही शब्दांचा अर्थ आहे. पर्यावरण आणि पाऊस-पाणी यांचे अतिशय जवळचे नाते आहे.

पर्यावरण शास्त्रामध्ये स्थावरे हा जो घटक आहे त्यामध्ये वनस्पती - प्राणी - पर्वत - नद्या या नैसर्गिक गोष्टी येतात, त्याचप्रमाणे मानवनिर्मित अभयअरण्यें, उद्याने, उपवने याही गोष्टी येतात. यामधील वनश्री-जीवनाचा आपण विचार करणार आहोत.

भारतीय संस्कृतीची जोपासना 'अरण्य' संस्कृतीवरच प्रामुख्याने झालेली आहे. येथे सर्वत्र जंगले होती. तेथील झाडांची बेसुमार तोड गेली हजारो वर्षे होत आहे. त्या तुलनेने नवीन झाडे मात्र लावली गेली नाहीत. परिणाम काय झाला, पाऊसमान कमी पडले, नद्या, नाले आटू लागले, कोरडे दुष्काळ पडू लागले, रोगराई वाढू लागली, अशा प्रकारची शिक्षा आपण आजही भोगत आहोत. वृक्षारोपण, त्यांचे संगोपन आणि संवर्धन ही गोष्ट किती महत्त्वाची आहे हे तत्त्व विशद करणारी तुकाराम महाराज यांची ही उक्ति ....

*परिमळ म्हूण चोळू नये फुल । खाऊं नये मूल आवडते ॥*

(अभंग ३९)

(फूल सुगंधी आहे. म्हणून त्याला हातानें चोळू नये. आपले मूल फार आवडते म्हणून ते खाऊ नये.)

*जयाचिये द्वारी तुळशीवृंदावन । नाहीं ते स्मशान गृह जाण ॥*

(अभंग ३४)

(ज्याच्या दारांत तुळशीचे वृंदावन नाही, ते घर स्मशानवत् आहे असे समजा)

तुळशीला आपल्या धर्मामध्ये देवतेचे माहात्म्य आहे. ती येथे प्रतीकात्मक समजून घराघरातून झाडे लावली पाहिजेत, त्यांचे संवर्धन आणि संगोपन झाले पाहिजे, हाच मथितार्थ ध्वनित होत नाही कां?

सदृशता –

*झाडासि साजणे । चालावें गा ॥* (ज्ञा. १२ = ६४)

(अरे झाडांशी मैत्री करून बोलावे लागते)

*वृक्षवल्ली आम्हां सोयरीं वनचरें । पक्षीही सुस्वरें आळविती ॥*
*तेणे सुखें रुचे एकांताचा वास । नाहीं गुणदोष अंगा येत ॥*
*आकाश मंडप पृथिवी आसन । रमे तेथे मन क्रीडा करी ॥*
*कथा कमंडलु देहउपचारा । जाणवितो वारा अवसरु ॥*
*हरिकथा भोजन परवडी विस्तार । करोनि प्रकार सेवू रुची ।*
*तुका म्हणें होय मनासी संवाद । आपुलाची वाद आपणांसी ॥*

(अभंग १७२०)

स्वरसम्राज्ञी लता मंगेशकर यांच्या या अभंगाच्या ध्वनिमुद्रिकेमुळे संत तुकाराम महाराज यांची ही रचना महाराष्ट्रातील प्रत्येक घराघरात जाऊन पोहोचली आहे. मंजुल आवाज-स्वर यामुळे कानांना होणारे सुख एवढ्यापुरताच हा आनंद मर्यादित मानता कामा नये. या अभंगात

पर्यावरणाशी निगडित असलेले वृक्षवल्ली, वनचरें, पक्षी, आकाश, पृथ्वी, वारा हे घटक फारच बहारीने आणलेले आहेत. सोयऱ्याधायऱ्यांशी आपण अतिशय प्रेमाने वागत असतो, वृक्षवल्ली बाबत ती अपेक्षा मनात ठेवावी अशी तुकाराम महाराजांनी तुम्हा आम्हांस हांक देऊन ठेवलेली आहे.

आणि हीच अपेक्षा वाघ, सिंह, हरिणे, वगैरे हिंस्र पशू तसेच पक्षी यांच्या बाबतीतही त्यांनी आपणाकडून केलेली आहे. वाघ-सिंह, हरणे यांची हत्या करणे महाराजांना मान्य नव्हते. आणि या गोष्टींसाठी आता कायदे करणे प्राप्त झाले. पर्यावरण हा शब्द जरी या अभंगात नसला तरी त्यातील मूळ तत्त्वेंच महाराजांनी व्यक्त केलेली नाही का?

पहाटेच्या वेळी वारा सुखदकारक, मन उत्साहवर्धक आणि आरोग्याला पोषक, सकाळी तजेलदारपणा आणणारा, दुपारी गरम, सायंकाळी आल्हाददायक, रात्री थंडगार असा असतो. पर्यावरणाशी निगडित असलेले हे वायुशास्त्रातील तत्त्व आहे. 'जाणवितो वारा अवसरू' (वेळ किती झाला हे समजाविणारा वारा आहे) ते या पंक्तीतून लक्षात येते की नाही?

साप, नाग हे प्राणी मानवाला उपकारक आहेत, त्यांना मारू नका असा कृतिशील प्रयत्न सध्या होत आहे. माझ्या मित्रांचे चिरंजीव निलीमकुमार खैरे यांनी या सर्पमित्र प्रसारासाठी स्वतःला वाहून घेतले आहे. सर्प, नाग विषारी असले तरी त्यांना मारू नका हे तत्त्व लोकांच्या मनामनात रुजविण्यासाठी तुकाराम महाराजांनी त्याबाबत पुराणोक्त नारायणाचे अधिष्ठान बहाल करून त्यांना वंदनीय माना हेच सांगून ठेवले आहे ....

*तुका म्हणें विंचू सर्प नारायण । वंदावे दुरोन शिवो नये ॥*

(अभंग ६३७)

*पक्षी पिलयां पातले आशा । देखौनिया फांसा गुंते बळे*
*मरण नेणें सायासें धांवोनि वोरसें । जीवित्वा नाश झाली बाळे ॥*

(अभंग ६३९)

(पक्षाचा नर-मादीचा जोडा आपल्या पिलांस झाडावरील घरट्यामध्यें सोडून चारा आणावयास वनामध्ये गेला. तेवढ्यात पारध्यानें त्या पिलांच्या घरट्यावर जाळे टाकून त्यांना पकडले. काही वेळाने रानातून ते पक्षी-पक्षिणीचे जोडपे आले. घरट्यापाशी येतात, तो त्यांना आपली पिले जाळ्यांत अडकून सुटण्यासाठी फडफड करीत आहेत असे दिसले. ते पाहात त्या नरमादीने स्वतःच्या मरणाची मुळीच भिती न बाळगता पिल्लांच्या प्रेमापोटी त्या जाळ्यामध्यें उडी घेतली आणि ते आपल्या जीवास व पिल्लांसही अंतरले.)

महाराजांच्या या अभंगातून पक्षांचे स्वभाव - जीवनप्रणाली यांचेच दर्शन घडत आहे.

पक्षांच्या मार्फत कांही वृक्षांचे रोपण होत असते. यामुळेच रानावनात, घाटात, डोंगरांवर कोणीही न लावता मोठमोठे वृक्ष दिसतात. वड - पिंपळाच्या झाडाला जी बारीक बोंडे येतात ती कावळ्यांना फार आवडतात. परंतु त्यातील बियांचे त्यांच्या पोटात चूर्ण होत नसल्याने त्या बिया कावळ्यांच्या विष्ठेतून परत बाहेर पडतात. व त्यातून हे वृक्ष उगवतात. ही पर्यावरणाशी संलग्न वास्तवता *'कागाचिये विष्ठे जन्म पिंपळासी'* (अभंग १२२) यामधून स्पष्ट दिसते.

*कुमुदिनी काय जाणे परिमळ । भ्रमर सकळ भोगितसें ॥*

(अभंग २३३)

महाराजांच्या या दोन चरणांमध्ये वनस्पतिशास्त्रातील परागीभवनाचे तत्त्व सांगितलेले आहे. मधुप्राशनाकरिता भुंगा हा वेगवेगळ्या फुलांवर बसतो. त्यामुळे त्या फुलांमधील स्त्री-केसर आणि पुंकेसर यांची देवाणघेवाण होऊन त्यांचा संयोग होतो व त्यातून नंतर फलधारणा होते. यालाच परागीभवन म्हणतात.

*'हरिकथा भोजन'* (अभंग १७२०) या दोन शब्दांमधून महाराजांनी भोजन या शब्दाचे रूपक केले आहे. आणि ते रुचीने सेवन करा असे म्हटले आहे. वास्तविक भोजन हे प्रामुख्याने अन्नाचे असते. आणि शाकाहार हा संपूर्णपणे वनश्री, वनस्पती यावरच आधारित आहे. तेव्हा हे भोजन कसे असावे हे सांगताना महाराज म्हणतात ...

*युक्त आहार वेव्हार । नेम इंन्द्रियांसी सार ॥* (अभंग ५८५)

नियमित आहार असावा, नियमित विश्रांती असावी, इंन्द्रियांचा नियमितपणा हेच सार आहे.

*वीट नेये ऐसे रांधा । जेणे बाधा उपजेना ।*
*तरीच ते गोड राहे । नरे पाहे स्वयंभे ॥* (अभंग १९४)

(जो सेवन करण्यात वीट येणार नाही, व बाधा होणार नाही असा स्वयंपाक करा. तरच तो स्वयंभू स्थितीने शुद्ध आणि गोड असा राहील.)

पण एवढ्यावरच महाराज थांबले नाहीत, तर एका अभंगात त्यांनी असा इशारा देऊन ठेवलेला आहे....

*रसना अनावरी । तुका म्हणें ढुंग वाहे ॥* (अभंग ६८१)

(जिव्हां रससेवनाविषयी अनावर झाली, तर त्याचा परिणाम अपचन होऊन हगवण लागते.)

वृक्षवल्ली आम्हा ... या एका अभंगातून महाराजांनी पर्यावरणाशी, तसेच मानवी जीवन कसे जगावे अन् कसे जगूं नये, हे सांगणारी किती तत्त्वे सांगितलेली आहेत याचे दर्शन घडविण्यासाठी हा ऊहापोह मी केला. आणि हाच संशोधन या शब्दाचा अर्थ येथे मला अभिप्रेत आहे.

वृक्षवल्ली आम्हां .... या अभंगाच्या, मथितार्थाच्या ज्ञानेश्वरीतील कांही ओव्या आता पाहू या ...

*वायू आणि तया पडे । गगनेसी बोलो आवडे ।*
*जीवें प्राणे झाडें । पढियंती जया ॥*

(ज्ञा. १३ = १९९ दांडेकर प्रत)

(वायूचे आणि त्याचे पटते. आकाशाशी बोलणे त्याला आवडते आणि ज्याला झाडे ही जीवाप्रमाणे आवडतात)

*हा सात्त्विकु होय भाग्यु । तैं भोगावया आरोग्यु ।*
*शरीरासी भाग्यु । उदयलें जाणें ॥* (ज्ञा. १७ = १३५)
*आणि सुखाचें घेणें देणें । निकें उवाया ये येणें ।*

*हें असो वाढे साजणें । आनंदेसी ॥* (ज्ञा. १७ = १३६)

*कां रसनेचिया वाटा । निघोनि गा सुभटा ।*

*रसाचा दरकुटा । भरोंचि लागें ॥* (ज्ञा. १५ = ३५८)

(अर्जुना, जिभेद्वारें उत्पन्न होऊन, रसाची दरी (उदर) भरावयास लावतो.)

*कां जो साविया अन्नरसु सेवी । तो व्यापिजे वातश्लेष्मस्वभावी॥* (ज्ञा. १७ = ११४)

(अथवा जो आपल्या मनास येईल त्या अन्नाचें सेवन करतो, तो त्या अन्नपाण्याच्या वातकारक आणि कफकारक स्वभावानें व्यापला जातो.)

*जैसें भ्रमर परागु नेतीं । परी कमळदळें नेणतीं ।* (ज्ञा. ९ = ५९)

*विकासें रवीतें उपजवी । द्रुती अलीकरवीं भोगवी ॥* (ज्ञा. १८ = २७६)

*पै पारिवा जैसा किरीटी । चडला नभाचिये पोटीं ।*

*पारिवी देखौनि लोटी । आंग सगळें ॥* (ज्ञा. १८ = ४८३)

*श्वापदांआतु शार्दुलु । तो मी जाण ।* (ज्ञा. १० = २४८)

*हा मी मार्गी चालतां । पुढां सिंह जाहला अवचितां ।*

*तो तंव चुकवितां । लाभु आथी ॥* (ज्ञा. ९ = २३८)

*सर्पकुळाआंतु अधिष्ठाता । वासुकी गा मी कुंतीसुता ।*

*नागांमाजी समस्तां । अनंतु तो मी* (ज्ञा. १० = २४२)

झाडे लावावींत हे खरे, पण ती एकाच प्रकारची असतां कामा नयेत. एक तर मानवाची गरज, निरनिराळी झाडे फळाफुलांदींनी भागवीत असतात. शिवाय रोगाला प्रतिकार करण्याची क्षमता, ही वेगवेगळ्या झाडांमधील निरनिराळी असते. तशी वेळ आलीच तर सगळीच झाडे रोगमुखी पडू नयेत हाही यामध्ये खबरदारीचा उपाय असतो.

*ऊंस कांदा एक आळा । स्वाद गोडीचा निराळा ॥* (अभंग २६७)

*नाना बीजधर्मानुरूप । झाडीं उपजवी आप ॥* (ज्ञा. १५ = ४१८)

*निंब जिभे कडवटु । हिरडा पाहिले तुरटु ॥* (ज्ञा. १८ = १८६)

रानामध्यें असंख्य प्रकारच्या वनस्पती उगवत असतात. दैनंदिन स्वरूपांत माणसांना जरी त्यांचा उपयोग होत नसला तरी पर्यावरणाच्या दृष्टीने त्या रानझाडांनाही महत्त्व असते, हे तत्त्व विशद होत असलेले हे तुकाराम महाराजांचे चरण पहा ....

*रानी वसती औषधी । तरी कां म्हणाव्या निपराधी ॥* (अभंग ३०७)

(रानात अनेक प्रकारच्या वनस्पती असतात, म्हणून त्या काय निरूपयोगी झाल्या)

या अभंगामध्ये तुकाराम महाराजांनी वनस्पतींना औषधी हा शद्ब वापरला आहे. औषध म्हणजे उत्तम आयुष्याची वाढ. अन्नामुळे ती मूलतः होत असते. आणि अन्नाची प्राप्ती वनस्पतिपासून होत असते. असा गर्भितार्थ औषधी या वनस्पतीवाचक शद्बामध्ये दडलेला आहे. बहीण भावाला, पत्नी - पतीला दिवाळीचे वेळी औक्षण करते. औक्षण म्हणजे उत्तम क्षण (जीवनातले) त्याची वाढ होणे हाच त्यातील अर्थ आहे. पर्यावरणाचे संतुलन राखण्यास रानातील झाडेही उपयुक्त ठरत असतात. ते संतुलन राखले जाणे यावर मानव, प्राणीमात्रांच्या उत्तम आयुष्याची वाढ अवलंबून नसते कां? जंगलतोड किती घातक ठरणारी असते हे यावरून लक्षात यावयास हवे.

सादृशता –

*तेथूनि फांकती राईमकर । ते पाट पेलुनि अपार*

*सर्वौषधींचे आगर । भरितु असे मी ॥* (ज्ञा. १५ = ४०४)

*संकल्पेवीण स्वप्न । न लाविंता दांगीचे वन ॥* (ज्ञा. १८ = ४२९)

निसर्गदत्त अरण्यें - वनें यांना जसे पर्यावरण शास्त्रामध्ये महत्त्व आहे, तसेच महत्त्व मानवनिर्मित बागा, तेथील कारंजी यांनाही आहे.

*जैशी कारंज्याची कला । तो जिव्हाळा स्वहितांचा ॥* (अभंग ८०१)

(ज्याप्रमाणे कारंजाच्या धारा एकापेक्षां एक उंच उडत असतात, त्याप्रमाणें स्वहित साधण्यास अंतःकरणांत प्रेमाचा जिव्हाळा पाहिजे)

सादृशता....

*नगरेंचि रचावीं । जलाशये निर्मावी*

*महावनें लावावीं । नानाविधे ।* (ज्ञा. १४ = २३३)

आंबा, पेरू वगैरे झाडांना फळे येतात, पण त्यामध्ये कांही झाडांना फुले-फळधारणा होतच नाही. त्यांना वृक्षविज्ञानामध्ये 'वांझ' म्हणतात. ते तुकाराम महाराजांच्या एका अभंगात त्यांनी आणलेले आहे.

*....वृक्ष न धरी पुष्पफळ ।*

*काय करील वसंत काळ ॥* (अभंग ३८१)

(वृक्षाला जर फूल फळ येत नाहीं, तर वसंतऋतु काय करील?)

या उक्तीमधून वसंत आणि वनश्री यांचे नाते कसे असते, तेही महाराजांनी दर्शविले आहे.

मथितार्थाच्या दृष्टीने सादृशता :-

*....कां वांझ फुलीं फुललें । झाड जैसे ॥* (ज्ञा. ९ = ४३४)

झाड लावले, ते मोठे झाले की त्याला आपसुक फुले - फळे येतात अशी कल्पना करून त्याकडे लक्ष न देणे बरोबर नाही. घरातील माणसांप्रमाणेच झाडांचे आजार, त्यांच्यातील उणीवा याकडे लक्ष देऊन त्यावर औषधपाण्याची उपाययोजना करावी लागते. झाडावर फळ आले. पुढे ते पिकेल हेही बरोबर. पण ते पक्व अवस्थेस येईपर्यन्त झाडावर टिकून राहिले पाहिजे नां? - गळून गेले तर काय उपयोग? झाडाची फळे अशा प्रकारे जर गळून पडत असतील तर तज्ज्ञाला ते दाखवून उपाय करणे जरूर आहे ....

*आले फळ तेव्हां राहिले पिकोन ।*

*जरी तें जतन होय देठीं ॥* (अभंग ६९५)

(जे फळ आलेले आहे, ते जर देठास जतन होईल तर ते पिकेल).

चांगले पोषण होण्यापूर्वीच झाडावरील फळे गळून पडणे वेगळे अन् फळ पिकायला आले की ते देठापासून अलग होणे वेगळे. दोन्हींचे

गळणे हे भिन्न स्वरूपाचे आहे. तरी फळ पिकावयास येईपर्यन्त ते देठाला धरून असणे महत्त्वाचे आहे....

*पै परिपाकाचिये वेळे । फळ देठें ना देठु फळें ।।*

(ज्ञा. १८ = ९५७)

**वनश्री - वनस्पती यांचे जीवनच मुळी, प्राणिमात्रांच्या पोषणाकरिता,** उपयुक्ततेकरिता आहे. परोपकार हा त्यांचा स्थायी भाव आहे.

*जळ न खाती जळा । वृक्ष आपुलिया फळा ।*
*भोक्ता तो निराळा । तेणे गोडी निवडिली ।।* (अभंग ५९५)

(पाणी पाण्याला पीत नाही, वृक्ष आपणच आपली फळे खात नाही, त्याहून वेगळा जो भोक्ता असतो तोच त्याची गोडी अनुभवतो.)

*देखोनियां छाया सुख न पावी जे । जंव न बैसीजे तया तळी ।।*

(अभंग १९६)

(एखाद्या वृक्षाची छाया पाहून, जोपर्यन्त त्याच्या आश्रयाखाली बसले नाहीं तोपर्यन्त सुख होत नाही)

सदृशता :-

*पत्र पुष्प छाया । फळे मुळें धनंजया*
*वाटेचा न चुके आलिया । वृक्षु जैसा ।।* (ज्ञा. १६ = ८६)
*वृक्ष का वेली । लोटती फळें आली ।।* (ज्ञा. १२ = १२९)

असा हा संत तुकाराम महाराज यांच्या अभंगामधील वनश्रीतील पर्यावरणाचा विषय आहे. यामध्ये पाने, फुले, फळे, साली, डिंक तसेच बीज, मुळे, जमीन, शेती वगैरे अनेक विषयही तुकाराम महाराजांनी वनस्पतिशास्त्राला धरून आणलेले आहेत. तेही पर्यावरणाला धरूनच आहेत. पर्यावरणाचा अंतिम हेतू म्हणजे मानव, प्राणिमात्रांचे कल्याण! हाच हेतू मूळ स्वरूपात तुकाराम महाराजांच्या वनस्पतिवाचक अभंगांमधून पानापानांवर बहरलेला आहे. फक्त त्याचा, मी अगदी अल्पप्रमाणांत हा वानवळा दाखविला आहे एवढंच!

**श्री. गजानन शं. खोले**
१९८३ सदाशिव पेठ, माडीवाले कॉलनी,
पुणे ३०. दूरभाष ४७५१४५.





## विठ्ठलाच्या पदस्पर्शाने....

वारी चालली चालली भाविकांची पंढरीला
मुखी विठ्ठल नामाचा चाले गजर सर्वांचा
देहभान विसरले वाट अखंड चालता
ध्यानी मनी विठुरायाची आस लागलीसे चित्ता
दाहि दिशातुनी येती विठ्ठल नामाचे पडसाद
आसमंत सारे सारे दंग झाले भजनात
सारे काही विसरूनी ध्यास विठ्ठल रखुमाई
पुकारती मायबापा धाव धाव गे विठाई
तुकयांच्या अभंगाला टाळ मृदुंग वाजती
ज्ञानेशांच्या विराणीचे आर्त भाव हेलावीती
आस लागलीसे अेक विठुरायांच्या चरणांची
पाय पाऊले चालती थेट वाट पंढरीची
गजर अैकुनी नामाचा आसमंत भारावले
पंचमहाभूतें आदि सारे विश्व नादावले
मुखी अखंड भजन वारी मार्ग आक्रमीते
देहभान हरवीत वारी पंढरीला येते
पाहुनिया चक्रपाणी सारे भान विसरले
वारी पूर्ण झाली आज धन्य कृतार्थ भासले
माझा देव भक्तांसाठी आहे उभा वीटेवरी
सदा कल्याण असावे दिसे भाव त्या अंतरी
गळां मिठी घालायला मन आतुर जाहालें
विठ्ठलाच्या पदस्पर्शाने आज सर्वस्व लाभले.

**सौ. कमला ना. दातार.**

# मनाच्या तळमळे । चंदनेही अंग पोळे ॥

**श्याम भुरके**

आपण सुखी असावं असं कोणाला नाही वाटत? प्रत्येकाला वाटतं. मग प्रत्येकजण सुखी आहे का? नाही. कांहीजण सुखी आहेत पण बाकीचे दुःखीच आहेत. कोणत्या ना कोणत्या कारणाने मनात अस्वस्थता आहे. तेच दुःखाचे कारण आहे. ही अस्वस्थता कशी कमी करायची? त्यासाठी माझ्यामध्येही विशेष कांही आहे हे जाणून घ्यायला हवे. मला माझ्याबद्दल बढाया मारायला आवडतं. मी यांव केलं अन् त्यांव केलं असं सांगण्यात तर मजा येत असते. पण खरच माझ्याजवळही काही आहे हे प्रथम मनावर बिंबवले पाहिजे.

माझा सर्वात मोठा गुण कोणता? मी मनुष्य म्हणून जन्माला आलो हे तर मला भूषणावह आहे.

*देव रंगारी रंगारी । त्रिभूवनाचा रंग करी ।*

*लक्ष चौऱ्याऐंशीचे ठसे । वेगळाले केले कसे?*

या चौऱ्याऐंशी लक्ष योनीतून मला दुर्मिळ असा मनुष्यजन्म प्राप्त झाला हे माझे भाग्यच.

माणसाच्या व्याख्या वेगवेगळ्या आहेत. कोणी म्हटले आहे 'मानव हा बोलू शकणारा प्राणी आहे'. दुसऱ्या तत्त्ववेत्याने म्हटलंय 'मानव हा विचार करू शकणारा प्राणी आहे' पण प्रत्येक व्याख्येत प्राणी हा शद्ब आहेच. म्हणजेच मनुष्य हा प्राणीच आहे हे त्याच्या वागण्यावरून सर्व विद्वानांना पटले आहे. त्यात मनुष्यपण कमी आहे हे तर त्याना सुचवायचे नसेल?

माझ्यातील गुण, मला उपलब्ध असलेल्या सेवा, याचा सातत्याने आढावा घ्यायला हवा. मला ऐकता येते ही केव्हढी मोठी सोय आहे. पूर्ण बहिऱ्या माणसाच्या संगतीत काही काळ घालविला तर आपण ऐकू शकतो हा आपला मोठा गुण असल्याचे जाणवते. पण ऐकायला येतं तर काय ऐकायचं हे फार महत्त्वाचं. कानावर चांगले शद्ब पडू दे असं वाटत असेल तर चांगल्याचा शोध घ्यायची सवय हवी. दूरदर्शनवर सिनेगीतांचा कार्यक्रम आहे आणि गावात चांगले व्याख्यान आहे तर गाणी पुन्हा ऐकता येतील ही मनाची समजून घालून व्याख्यान ऐकायला जायला हवं. एखादा चांगला विचार कानावर पडला तर आपल्या आयुष्यात तो बराच काळ मार्गदर्शक म्हणून उपयोगी पडू शकतो. ही शिकवणूक आपल्या समाजात फार प्राचीन काळापासून आहे. संत तुकारामांच्या कीर्तनाला छत्रपती शिवाजी महाराज गेले. त्यांना पकडायला बादशहाने सैन्य पाठविले. त्या सैन्याला अनेक शिवाजी महाराज दिसू लागले. अटक कोणास करायची हाच संभ्रम झाला. शिवाजी महाराजांवरील संकट टळले. चांगलं ऐकायला सद्यस्थितीत कोणा शत्रूची तरी भीती नाही. पण मी त्यासाठी वेळ काढतो ना हे महत्त्वाचं.

गेल्या वर्षी सोलापूरला ज्ञानप्रबोधिनीतर्फे सत्संग - शिबीर भरवलं होतं. तिथे एका व्याख्यात्यांनी सांगितलेलं उदाहरण कायमचं लक्षात राहिलय. सातारा जिल्ह्यातील गोंदवले येथे उत्सव होता. श्री. गोंदवलेकर महाराज यांची प्रवचनं होती. गावोगावचे अनेक भक्तगण जमलेले होते. त्यात एक सधन शेतकरीही आलेला होता. भक्तिभावाने त्याने बरोबर आणलेले धान्य उत्सवासाठी दिले. प्रसादाचे भोजन झाले. तो गोंदवलेकर महाराजांना म्हणाला "आता मी निघतो'. तेव्हा महाराज म्हणाले एक प्रवचन आहे ते ऐकून जा. तो ज्या ज्या वेळी 'मी जातो' म्हणायचा तेव्हा महाराज त्याला पुढचा कार्यक्रम सांगून जरा ते ऐकून जा म्हणायचे. हा आपला, उत्सवाला आपल्याकडून काही धान्य द्यावं म्हणून आलेला. प्रवचन, कीर्तन यामध्ये कांही त्याला फारसा रस नव्हता. तेव्हा त्याने ठरविलं की आता जातो असं महाराजांना सांगायचंच नाही. रात्री त्याने बैल गाडीला जुंपले अन स्वतःच्या गावी जायला निघाला. गाडीत त्याला मस्त झोप लागली. बैल स्वतःहून चाललेले. पहाटेची वेळ. याला जाग आली. बैलांच्या गळ्यातील घुंगरांचे मंजुळ नाद कानी पडले. थोडंस तांबडं फुटायला लागलं होतं. याने डोळे उघडून पाहिले तर पुन्हा तो गोंदवल्यातच पोहोचला होता. त्याला कांही कळेना. तो तडक गोंदवलेकर महाराजांकडे आला व घडलेली घटना सांगितली. त्याने विचारले, हे असं कसं झालं?

"जे बैलाना कळतय ते तुला कळत नाही!" - महाराज म्हणाले सत्संगाचा लाभ सोडता कामा नये. चार चांगले शद्ब कानावर पडले तर आयुष्याला दिशा मिळू शकते. काहीच ऐकायचं नाही असं ठरविलं तर दशा होऊ शकते.

समाजामध्ये भक्तिभावाच्या मार्गाने सुखशांती निर्माण व्हावी म्हणून संत तुकारामांनी अभंग रचना केल्या. पण कांही दुर्जनांनी गावातील पाटलाकरवी तुकोबांना गावाबाहेर घालविले. त्यांचे अभंग इंद्रायणीच्या डोहात दगड बांधून बुडविले. या दुर्जनांचे म्होरके होते वाघोली येथील श्री रामेश्वर भट्ट. तुकारामानी इंद्रायणीकाठी बसून विठ्ठलाचा धावा केला. तेरा दिवसांनी पोथ्या पाण्यावर आल्या. अभंग तरले.

*उदकी राखिले कागद । चुकविला जनवाद ।*

*तुका म्हणे ब्रीद । साच केले आपुले ।*

*तेरा दिवस वह्या । रक्षुनिया उदकी ।*

*कोरड्याची काढुनिया । दाखविल्या शेखी ।*

*जळी दगडासहित वह्या । तारियेल्या जैशा लाह्या ॥*

रामेश्वर भट्ट जेव्हा वह्या बुडवून आले तेव्हा त्यांच्या अंगाची लाही

लाही होत होती. त्याने अनगडशहाच्या विहीरीत अंघोळ केली होती. तेथील पाण्याने असो किंवा दुष्कृत्य केल्याच्या भावनेने असो तो तळमळत होता. कोणत्याही कामात त्याचे चित्त लागेना. त्याने आळंदीस ज्ञानरायांच्या समाधीपुढे प्रार्थना केली. त्याला दृष्टांत झाला. तुकारामांकडे जाऊन उपदेश घेण्यास सांगितले. आळंदीमधील सुविचार कानी पडल्याने रामेश्वर भट्टासारख्या दुर्जनामध्येही बदल झाला. त्याने तुकारामांची शरणागती स्वीकारली. तुकोबांनी उपदेश केला.

*चित्तशुद्ध तरी शत्रु मित्र होती.*

रामेश्वरभट्टांचे मन शांत झाले. देहाचा दाह कमी झाला. रामेश्वर भट्ट म्हणतात,

*म्हणे रामेश्वर त्याच्या समागमे । झाले हे आराम देह माझे ।*

ही सारी श्रवणाचीच किमया, उशीरा का होईना पण ऐकून बदल झाला.

जनता जनार्दनाला चांगले ऐकायला मिळेल यासाठी साधुसंतांनी विविध मार्गानी प्रयत्न केले. चाफळला समर्थ रामदासांच्या मार्गदर्शनाखाली रामाचा उत्सव दरवर्षी उत्साहाने होत असे. छत्रपती शिवाजी महाराजांकडून उत्सवासाठी धान्य येई. एक वर्ष महाराजांकडून कांहीच आले नाही. उत्सव तर जवळ येत चाललेला. सारे शिष्य काळजीत होते. ते रामदास स्वामीना सुचवीत होते की कोणीतरी महाराजांकडे जावे व आठवण द्यावी. परंतु समर्थ रामदासांनी ते अमान्य केले. त्यांनी कल्याणस्वामींना बोलावून घेतले व श्लोक सांगायला सुरुवात केली. कल्याणस्वामी लिहून घेऊ लागले. -

*गणाधीश तो ईश सर्वा गुणांचा । मूलारंभ आरंभ तो निर्गुणांचा ।*
*नमो शारदा मूळ चत्वारीवाचा । गमू पंथ अनंत या राघवाचा ॥*

मनाच्या श्लोकांची निर्मिती झाली. मनाला सज्जन बनवून भक्तीपंथाला लावण्याचे सामर्थ्य असलेले साहित्य निर्माण झाले. सारे शिष्यगण दारोदारी जाऊन हे श्लोक ऐकवू लागले. मिळेल ती भिक्षा गोळा करू लागले. त्या जमलेल्या धान्यातून उत्सव उत्साहाने साजरा झाला. मनाचे श्लोक त्यानंतर आजपर्यंत आपण ऐकत आहोत. ते ऐकण्याने आपलं व्यक्तिमत्व घडत आहे. ऐकण्याचे केवढे हे सामर्थ्य. पण ऐकणं म्हणजे केवळ शारिरीक क्रिया नव्हे. ते मनापर्यंत पोहोचून आचरणात आणणे व्हायला हवे. इंग्रजीमध्ये यासाठी हिअरींग व लिसनिंग असे शब्द आहेत. केवळ ऐकणे म्हणजे हिअरींग. 'नळी फुंकली सोनारे इकडून तिकडे गेले वारे' अशातला तो प्रकार. लिसनिंग म्हणजे ऐकून ते मनावर बिंबविणे. कार्यतत्पर बनणे. ऐकलेले विचार मनामध्ये खोलवर झिरपले की कृतीचा मार्ग सापडायला लागतो. मनाची तळमळ कमी होते. अस्वस्थता नाहीशी होते. जीवनामध्ये राम वाटायला लागतो.

*आनंदाचे डोही आनंद तरंग*

अशी आनंदमयी अवस्था निर्माण होते. या उलट दुसऱ्या कोणाचेही काहीही ऐकायचेच नाही असे ठरवलं तर विचारांची आवकच नाहीशी होईल. अज्ञानात भर पडेल. केवळ सुखाच्या ओढीने वाटेल ते मार्ग अनुसरायला माणूस प्रवृत्त होईल. त्याची तळमळ वाढेल. जे मिळाले त्याचा आनंद न मिळता अधिक कसे मिळेल याची तळमळ वाढेल.

*मनाच्या तळमळे । चंदनेंही अंग पोळे ॥*

या संत तुकारामांच्या अभंगाची प्रचीति येईल.

आपल्याला ऐकायला येते याचेच कितीतरी फायदे. आपल्यात कितीतरी प्रकारच्या शक्ती आहेत. आपल्याला वाचता येते, गाता येते, विचार करता येतो. या प्रत्येक कृतीतून जीवन समृद्ध करणे हे शक्य आहे. स्वतःचे सामर्थ्य ओळखणे एवढंच हवय. परिणामतः मनुष्य म्हणून जीवन जगण्याचे जे सद्भाग्य आहे, त्याची प्रचीति घेता येईल.

**श्री. श्याम भुर्के**
४ महालक्ष्मी, ३२/२ अ एरंडवणे,
पुणे ४११ ००४.
फोन ३४३३५१.

घातले दुकान । देती आलियासी दान ॥१॥
संत उदार उदार । भरलें अनंत भांडार ॥२॥
मागत्याची पुरे । धणी आणिकांसी उरे ॥३॥
तुका म्हणे पोतें । देवें भरिलें नव्हें रितें ॥४॥

# ओळख पाहा पटवून

(प्रा. लीना केळकर)

आम्ही जेवायला बसणार इतक्यांत दरवाजावरील घंटा वाजली. दार उघडतांच एक व्यक्ति हातांत पावतीपुस्तकासारखे काहीतरी घेऊन उभी होती. ते होते एक सरकारी आवेदन – निवडणुकीसाठी फोटो काढण्याची वेळ आणि तारीख दाखविणारे. साहाजिकच जेवतांना मुख्य निवडणूक आयुक्त श्री. शेषन यांच्या 'फोटोसकट ओळखपत्र' या आदेशाची चर्चा सुरु झाली.

सामान्यतः आपला चेहरा, देह हे आपली ओळख पटविण्यास पुरेसे पुरावे ठरतात. हे खरेच. पण कांही कांही वेळां असे प्रसंग उद्‌भवतात की ओळख पटणे व पटवणे हे महाकठीण काम होते. आतां हेच पाहा ना – एका माणसासारखे दुसरे मनुष्य असूं शकते. भाऊ म्हणाला, 'Identical twins' म्हणजे हुबेहुब एकदुसऱ्यासारखी दिसणारी, जणूं काही झेरॉक्स कॉपी वाटावी अशी जुळी भावंडे असतात व त्यामुळे मोठे विनोदी प्रसंग उद्‌भवतात. एकदा असेच झाले. दोन जुळे भाऊ होते, म्हणजे आहेत. अगदी एकासारखा दुसरा. शारीरिक व मानसिक ठेवणही सारखीच. दोघांची लग्ने झाली. एकत्र कुटुंबपध्दतीमुळें एकाच घरांत राहात असत. १०–१५ दिवस गेले. त्यातला एक भाऊ सकाळी दाढी करीत असताना नवी–नवेली वधू त्याच्याजवळ उभी राहून काही सांगू लागली. तिचे बोलणे संपल्यावर, गालांतल्या गालात हसत तो म्हणाला, "वहिनी , रॅांग नंबर." नववधूला काय वाटले असेल ते तिचे तीच जाणे !

बहीण म्हणाली, ही झाली जुळ्या भावांची गोष्ट. पण काही वेळां, कुठलाही संबंध नसताना माणसे एकमेकांसारखी दिसतात व त्यामुळे भल्याभल्यांची पंचाईत होते. पेशवाईत घडलेली घटना आठवते ना ? सदाशिवरावभाऊ यांच्यासारखा दिसणारा दुसरा माणूस तोतया बनून आला व सगळेच फसले. अपवाद फक्त पार्वतीबाईचा – ऐकायला अजबच वाटते. पण पार्वतीबाईना आपल्या पतीच्या देहाचा कण न कण माहीत असावा. केवळ त्याच्या पावलांकडे पाहून ती व्यक्ति सदाशिवराव नाहीत अशी ग्वाही त्यांना पार्वतीबाईनी दिली.

जेवणं आवरली, सर्वजण पांगले पण माझ्या मनांत तो विषय घोटाळतच राहिला. पेशवाईतल्या तोतयाच्या घटनेवरून आठवली 'रत्नदीप' ही प्रख्यात कादंबरी. एक साधा स्टेशन मास्तर पण दिसायचा हुबेहूब परागंदा झालेल्या जमीनदारासारखा. मृत जमीनदाराची डायरी मिळते व संपत्तीच्या मोहाने तो जमीनदाराच्या घरी येतो. पण जमीनदाराची पत्नी साध्वी पतिव्रता. तिच्या तेजाने तोतया प्रभावित होतो व आपली खरी ओळख सांगतो आणि निघून जातो.

तेवढ्यांत मनश्चक्षूंसमोर 'अभिज्ञान शाकुंतलम्' मधील शकुंतला उभी राहिली. कॉलेजमध्ये इंटरच्या वर्गात असताना कविवर्य व प्राध्यापक वसंत बापट यांनी आमच्या डोळ्यांसमोर, आपल्या प्रभावी वाणीने साक्षात् उभी केलेली शकुंतला. कोणाला माहीत नाही हे अमर काव्य? धीरगंभीर पण शापग्रस्त राजा दुष्यन्त, जिच्यावर बघतांक्षणीच प्रेम बसले त्या शकुंतलेला पार विसरलेला. कारण खुणेची अंगठी माशानें गिळल्यामुळें तो तिला ओळखू शकत नव्हता तर ती बिचारी आश्रमकन्या अनेक प्रसंगांची आठवण देऊन ओळख पटवायचा प्रयत्न करीत होती. तिची केविलवाणी अवस्था ऐकून व वाचून आम्ही विद्यार्थिनी हळव्या झालो होतो. अन् मनाशीच - शेवटी हे एक नाटक आहे, तेव्हा एवढे मनाला लावून घ्यायचे नाही - अशी आपलीच समजूत काढीत होतो.

पण कधी कधी व्यवहारी आयुष्यात असे पेचप्रसंग उभे राहातात. लातूर, उस्मानाबाद, किल्लारी या भागांत भूकंप झाला. अशा घटना घडतात तेव्हां मानवी स्वभावाचे विविधरंगी रूप बघायला मिळते. भूकंपामुळे एका स्त्रीचा बळी गेला होता. अनेक मृत देहांत तिचाही देह ठेवलेला होता. मृत व्यक्तींची ओळख पटवून त्यांचा ताबा योग्य व्यक्तींकडे देण्याचे काम चालू होते. एवढ्यात एक विचित्र प्रसंग उद्‌भवला. ज्या स्त्रीचा वर उल्लेख आला आहे तिच्या मृत देहावर दोन पुरुष पति या नात्याने हक्क सांगू लागले. मदत कार्य करणारे लोक संभ्रमात पडले. खरा पति ओळखायचा कसा हा मोठा अवघड प्रश्न होता. पोलीसही बुचकळ्यांत पडले. चेहरा पार छिन्न भिन्न झालेला पण देहावर अनेक अलंकार असलेल्या या स्त्रीचा पति कोण असावा? निर्णय अवघडच होता. अशी कांहीतरी खूण हवी की हक्क सिद्ध करता येईल. शेवटी, खऱ्या पतीने कदाचित नाखुषीनेच एक खूण सांगितली की त्या स्त्रीच्या गळ्याखाली छातीवर गोंदलेले आहे. मग स्त्री पोलीसांकडून याची शहानिशा करून झाल्यावर खऱ्या पतीलाच मृतदेहाचा ताबा मिळाला व केवळ दागिन्यांच्या मोहाने मृत स्त्रीला पत्नी म्हणणाऱ्या तोतयाला पोलिस कोठडी दाखवली गेली!

माणूस खूण सांगू शकला आणि प्रश्न सुटला. पण दक्षिण भारतात घडलेली घटना म्हणजे एक नवलकथाच वाटेल. पोस्ट ऑफिसांत अधिकारी असलेल्या एका स्त्रीच्या घरी एक पाळीव पोपट होता. तिच्या मुलांना तिचा फार लळा होता. एक दिवस हा पोपट चोरीला गेला. मुले बेचैन झाली, दुःखी झाली व जेवीनातशी झाली. त्या स्त्रीने पोलिसांत तक्रार केली आणि आश्चर्य म्हणजे या तक्रारीची दखल घेऊन पोलिसांनी तपास सुरू केला. तेव्हा तो पोपट दुसऱ्या एका

गावात एका गृहस्थाकडे मिळाला. पण तो गृहस्थ पोपटाचा ताबा देईना. तो म्हणे, 'मी हा पैसे देऊन विकत घेतला आहे. तेव्हां तो माझा आहे.'

मग पहिल्या मालकिणीने न्यायालयांत दाद मागितली. सुनावणीच्या दिवशी कोर्टात गर्दी. फिर्यादी स्त्री, तिची मुले, पोपटाचा नवीन मालक व पिंजऱ्यासह पोपट सगळे न्यायालयात हजर. हा प्रश्न कसा सोडवला जाणार याकडे सगळ्यांचे लक्ष. प्रश्न बिकटच होता पण तो खुद्द पोपटानेच सोडवला. त्याचे असे झाले की न्यायमूर्तींच्या समोर केस आली तेव्हां पिंजऱ्यातल्या पोपटालाही आणले गेले. त्याने (ह्या पोपटाने) त्या स्त्रीच्या मुलांना बघितले मात्र आणि त्याने त्यांची नावे घडाघड घेण्याचा सपाटा लावला. (Order, Order चा पोपटावर काहीं परिणाम झाला नसेल!) पोपटाच्या पोपटपंचीने अवघड काम सहजपणे केले व त्या स्त्रीच्या मालकीहक्काच्या दाव्यावर शिक्कामोर्तब झाले.

पण यापेक्षांही भावनेच्या एका नाजूक व उदात्त पातळीवर नेणारी व न्यायमूर्तींचे चातुर्य दाखवणारी कथा ऐकली होती. आतां मनांत आली आहे तर सांगतेच. एका घरांतून एक बालक चोरीला गेले. माता सैरभैर झाली. जारीने तपासकार्य सुरू झाले. शेवटी ते बालक एका घरी मिळाले. ज्या घरी मिळाले त्या घरची स्त्री म्हणे 'बालक माझे आहे.' खरी माता म्हणे 'बालक तिचे आहे व ते या दुसऱ्या स्त्रीने चोरले आहे.'

आतां प्रश्न असा की खरी आई कोण? मोठी नाजूक व गुंतागुंतीची परिस्थिती होती. न्यायालयासमोर प्रश्न नेला. न्यायाधीश मोठा चतुर असावा. त्याने एक युक्ति सुचविली - 'बाळाचे दोन तुकडे करा, एक या स्त्रीला द्या व दुसरा दुसऱ्या स्त्रीला.' त्या क्षणी पहिली स्त्री उद्गारली, "नको, नको, असं करू नका. त्या बाईला मूल द्या. माझे बाळ कुठेही सुखरूप राहो." मुखांतून शब्द येत होते व डोळ्यांतून अश्रू पाझरत होते. दुसऱ्या स्त्रीच्या चेहऱ्यावर विजयाचे हास्य चमकत होते. न्यायाधीशांनी निर्णय दिला, 'जी स्त्री कळवळली तीच बाळाची खरी आई.' काय, पटला ना निर्णय?

या विषयावरच एक लेख लिहावा असे मी विचार करीत होते तोच एक आर्त आवाज उमटला - रवीन्द्रनाथांच्या कादम्बिनी नांवाच्या कथानायिकेचा. ती जणूं मला विचारीत होती, 'वरील सगळ्या घटनांत योग्य माणसाची ओळख पटली पण मी कुठें स्वतःची ओळख पटवू शकले?' कादंबिनी या कथेची नायिका कादंबिनी मृत होते पण अल्पकालच. स्मशानांत नेल्यावर तिला चेतना येते व ती जिवंत होते. पण हे कोणीही कबूल करीत नाही. जिवंत कादंबिनीला भूत समजतात. ती आपला जिवंतपणा शाबीत करूं शकत नाही. शेवटी तिच्यापुढे आत्महत्या हा एकच मार्ग उरतो. कथेचा शेवट या वाक्याने झाला आहे, "ती जिवंत होती हे कादंबिनीला मरून सिद्ध करावे लागले."

तर असे आहे. सर्वसाधारणपणे लोक आपल्याला व आपण लोकांना देहरूपानेच ओळखतो - पण तेही कांही प्रसंगी अशक्य होते आणि नको असलेले प्रसंग उद्भवतात.

एवढे मात्र खरे की लोकांना पटो न पटो, हा देह माझाच आहे आणि मीच ती विशिष्ट व्यक्ति आहे याबद्दल आपल्याला संदेह वाटत नाही. पण इथे एक नवीनच प्रश्न उभा राहतो कीं आपल्याला म्हणजे कुणाला? माझा देह म्हणजे कुणाचा देह? कुणाचे मन? माझी बुद्धी म्हणजे कुणाची बुद्धी? कोण हा 'मी' या सर्वांवर वर्चस्व गाजवणारा? मी कोण?

'मी कोण' हा प्रश्न व्यावहारिक पातळीवरून आध्यात्मिक पातळीवर जातो आणि त्याचे उत्तर सहजासहजी सापडत नाही. भगवान रमणमहर्षींची सर्व साधना या दोन शब्दांच्या प्रश्नांत सामावलेली आहे. मी कोण याचा सतत शोध आणि तसे पाहिले तर मार्ग वेगवेगळे असले तरी अंतिम साध्य एकच म्हणजे आपल्या आत्मस्वरुपाची ओळख करून घेणे. श्रीज्ञानेश्वर महाराज, श्रीतुकाराम महाराज, भगवान श्रीरमणमहर्षि यांनी त्याचा साक्षात् अनुभव घेतला व ते आत्मस्वरुपानेच जगले व अमर झाले. पाश्चात्य तत्त्वज्ञ - संत सॉक्रेटिस म्हणतो - "Know thyself" - म्हणजे स्वतःला जाणून घ्या, ओळखा आणि अनुभवा. तत्त्वज्ञही तर्काची कसोटी लावून हेच म्हणतात आणि माझ्यासारखी सामान्य माणसे, महान संत आणि तत्त्वज्ञांचा शब्द प्रमाण मानून हेच मानतात कीं खरा 'मी' हा देह नसून आत्मस्वरूप आहे पण आम्ही त्याला ओळखत मात्र नाही. कारण या 'मी' ची ओळख पटणे म्हणजे ज्ञानाच्या अतिउच्च (उच्चतम) शिखरावर पोचण्यासारखे आहे. संतांना ते जमले पण सामान्य लोकांना ते बिकटच आहे म्हणून म्हणायचे की, "लग्न पाहावे करून, घर पाहावे बांधून आणि ओळख पाहावी पटवून - देहाची नव्हे, आत्मस्वरूपाची!"

प्रा. लीना केळकर
२०, २१, योगायोग सोसायटी, पी. अेम. रोड
विलेपार्ले (पू) मुंबई-५७.
फोन : ६१२४२६६



जेणें सांडिला संसार । तयावरी माया फार ॥१॥
धांवे चाले मागें मागें । सुख दुःख सोशी अंगे ॥२॥
ज्याचें घ्यावें नाम । त्याचे करावें तें काम ॥३॥
तुका म्हणे भोळी । विठ्ठल कृपेची साऊळी ॥४॥

# श्री. संत तुकाराम - एक सर्वस्पर्शी संत

श्री. शांताराम गोविंद जोशी

ह्या पवित्र महाराष्ट्र देशांत गतकाळात अनेक संतमहात्मे होऊन गेले. त्यामध्ये श्री संत ज्ञानेश्वरांनी पाया घातलेल्या भागवत धर्माचे एक अध्वर्यु संत म्हणून संत तुकाराम ह्यांना महाराष्ट्र ओळखतो. "ज्ञानोबा माऊली तुकाराम" हा अभिमंत्रच वारकरी सांप्रदायिकांचा आहे. जेथे जेथे म्हणून पवित्र मराठी भाषा बोलली जाते, तेथे तेथे समाजाच्या सर्व थरांमधून तुकाराम महाराज लीलया वावरत असतात.

सुमारे ३५० वर्षापूर्वी हा महात्मा ह्या पवित्र पुण्यभूवर अवतरला. वाणी (कुणबी)हे जन्मकूळ. परंपरागत वाणसौद्याचा व्यापार. मध्यम स्थितीत राहणारे हे कुटुंब खाऊन पिऊन सुखी होते. परंतु दैववशात् भयंकर दुष्काळात सर्व समाज होरपळून निघत होता. राज्यव्यवस्था यवनांची असल्याने त्यांना प्रजेच्या हालअपेष्टांशी कांही कर्तव्य नव्हते. एक तर अस्मानी सुलतानीशी दोन हात करणे, अगर त्या भयानकतेच्या दाहकपणाने नष्ट होणे एवढेच दोन पर्याय सर्वसामान्यांच्या पुढे होते. तुकाराम तरूणपणीच ह्या तडाख्यात सापडले. दुर्दैवाने त्यांची पाठ सोडली नाही. भयानक दुष्काळात प्रथम पत्नी व मुले प्राणास मुकली. धंदा व्यापार बसला. गुरे ढोरे सर्व सोडून गेली. पाहता पाहता संथ जीवन जगणारे तुकाराम अगदी थोड्या काळात पूर्णपणे कफल्लक झाले. त्यामुळे आलेल्या उद्विग्नतेमुळे ते अबोल झाले; आणि हीच त्यांची अवस्था, खूप विचार चिंतनामुळे, कुटुंबात परंपरेने चालत आलेल्या श्रीपांडुरंग सेवेमध्ये पूर्णपणे गढून जाण्यास कारणीभूत ठरली.

त्यांच्या भोवती वावरणाऱ्या लोकजीवनाचे दुष्काळामुळे होणारे हाल, लोकप्रवृत्ति, सर्वसामान्यांच्या जीवनात येणारे कटु प्रसंग, प्रसंगातून बाहेर कसे पडावे हे ज्ञान व शिक्षण नसल्याने हतबल होऊन अगतिकपणे लोकजीवन नष्ट होत होते. कोणाही सहृदय माणसास पाझर फुटावा अशा परिस्थितीमध्ये तुकाराम महाराजांनी स्वतःस व त्याबरोबर भोवतालच्या सर्व समाजघटकांस उपदेश करून ईश्वरप्राप्तीचा मार्ग दाखविला. ईशप्राप्ति होऊन परतत्त्वाचा स्पर्श झाल्यावर तुम्ही पूर्णपणे सुखी व्हाल, असे स्वतःच्या प्रत्यक्ष अनुभवावरून ठामपणे सांगितले.

त्यासाठी 'अभंग' हे माध्यम वापरण्यास सुरुवात केली. त्यांच्यापूर्वी होऊन गेलेल्या नामदेवादी संतांनी ह्या माध्यमाचा वापर केला होता. परंतु तुकारामांचे वैशिष्ट्य असे की, त्यांच्या अभंगचरणांतून त्यांनी सर्वसामान्य माणसांच्या उद्धाराची बीजें मुक्तहस्ताने पेरली. त्यांनी अभंग हे माध्यम अशा उत्स्फूर्त लीलेने वापरले की, "अभंग वाणी तुकयाची" हे श्रेष्ठ पद प्राप्त केले.

यासाठी त्यांना कठोर तपस्या, सखोल चिंतन मनन, निदिध्यासन करावे लागले. हे करत असतांना भोवतालच्या लोकजीवनाचे भान सातत्याने राखले. सर्वमान्य मधुरभाषा काम करत नाही, असे दिसतांच *"नाठाळाचे काठी हाणू माथा"* असे रोखठोक तडाखे दिले. त्यांच्या अभंगचरणातून वाङ्मयातील सर्व रस मुक्तपणे वावरत आहेत. त्यात भक्तिरसाचा परिपोष होऊन त्याने अति उच्च शिखर गाठले आहे. त्याकडे नुसते पाहिले तरी आपली दृष्टि विस्फारते. मन पुलकित होऊन त्यांच्या व्यक्तिमत्त्वापुढे नम्र होते.

त्यांच्या अभंगरचनेच्या समुच्चयास 'गाथा' असे म्हणतात. त्यामध्ये वैयक्तिक व सामाजिक जाणीवांचा उत्कट परिपोष आहे. 'गा' - म्हणजे गायन, गाणे, *'था'* म्हणजे स्थिर, शाश्वत. जे गाणे (अभंग) स्थिर किंवा शाश्वत आहे; त्याचा समुच्चय म्हणजे 'गाथा.' ह्यांची रचना ४ किंवा ३ चरणांपासून १०/१२ चरणांपर्यंत एक अभंग अशी आहे. ह्या गाथेमध्ये काय नाही? *"पवित्र तो देह । वाणी पुण्यवंत ।। जो वदे अच्युत । सर्व काळ"* असे जन्माला येण्याऱ्या देहापासून *"देह जावो अथवा राहो । पांडुरंगी दृढभावो ।।"* असे दृढनिश्चयाचे उद्गार आहेत. पांडुरंगाच्या चरणी असलेल्या असीम श्रद्धेतून समाजप्रबोधन व मार्गदर्शन ठायी ठायी दिसून येते. *"अवा चालली पंढरपुरा । वेशीपासून येई माघारा ।।" "माझ्या हातीचा कलवडू । माझे वाचून नको फोडू ।।" "कन्या सासुराशी जाये । मागे परतोनी पाहे ।।"* असे स्त्रीजीवनाचे पडदे हलुवारपणे दाखविले आहेत. मुलांच्या करता *"हमामा रे पोरा हमामा।"* योगी, तत्त्वचिंतकांच्यासाठी *"वृक्षवल्ली आम्हा सोयरी वनचरे"* असा उत्कृष्ट अभंग आहे. सर्वसामान्य व्यवहारी लोकांसाठी *"जोडोनिया धन उत्तम व्यवहारे । उदास विचारे वेंच करी ।।"* असा चोख उपदेश आहे. *"सुंदर ते ध्यान । उभे विटेवरी"* हा अजरामर अभंग मूर्तीमंत ईश्वराचे दर्शन देणारा आहे. ह्या अभंगाशिवाय कीर्तनकार आपल्या कीर्तनास (वारकरी सांप्रदायामध्ये) सुरुवात करीत नाही एवढे महत्त्वाचे स्थान ह्या अभंगाचे आहे. तुकाराम महाराजांनी एवढे प्रचंड व प्रासादिक वाङ्मय लिहून ते तत्कालीन समाजकंटकांच्या तडाख्यातून सोडवून निर्वेधपणे सुखरूप परत आणून समाजाधिष्ठित केले. हे करताना आपला पत्ता आणि कार्य सांगण्यास ते विसरले नाहीत. *"आम्ही वैकुंठवासी । आलो याच कारणासी । बोलिले जे ऋषी । साचभावे वर्ताया ।।" "वेदांचा तो अर्थ । आम्हासीच ठावा"* असे सांगून ठेवले. त्यांच्या विराहिण्यांतून पांडुरंगाच्या दर्शनाची ओढ, तळमळ, मनाची व्याकुळता, प्रतीत होते. प्रसंगी *"घेशी तेव्हां देशी ऐसा तू उदार"* म्हणून भांडणारे संत ते हेच का? असा प्रश्न पडतो.

जीवनाच्या अखेरी श्रीपांडुरंगाकडे मागणे मागतांना *"ह्या संतांशी निरवी । आणिक कांही न मागो देवा ।।"* असे उत्कृष्ट मागणे मागितले आहे. समाजात संतप्रवृत्ति सतत वाढत राहावी. त्यामध्ये व्यक्तिमत्त्वे पूर्णत्वास जाऊन आदर्श ठरावीत हाच निदिध्यास आहे. *"पैल आले हरि। शंखचक्र शोभा करी ।"* असा प्रत्यक्ष ईश्वरदर्शनाचा अभंग म्हणून *"आम्ही जातो आमुच्या गावा । अमुचा राम राम घ्यावा ।।"* असा भावपूर्ण, अंत:करण हेलावून टाकणारा अभंग लिहून आपला व ऐहिक जगाचा ते निरोप घेतात.

*जयाची वेदे पूर्ण वेदांत वाणी ।*
*म्हणावे कसे हो तयालागी वाणी ।*
*परब्रह्मरूपी ऐसा तुकावा ।*
*जयाचे तुकी कोण ऐसा तुकावा? ।।१।।*

**शांताराम गोविंद जोशी**
"गोविंदभवन" पांचपाखाडी, ठाणे २.
पौष वद्य ११, शके १९१७.





## तुकयाची आवली

आनंदाचे डोही आनंद तरंग
तुकाराम होई हरीभक्ती दंग ।।१।।

वेदाचा तो अर्थ ठावे तुकयाला
जनांसाठी त्याने सुगमही केला ।।२।।

तुका झालासे कळस
परी आवली झेली सायास ।।३।।

तुकयाची सहचरी जिजाई
काय वानू तिची थोरवी ।।४।।

धान्याचा कण नसे घरी
तरी कोंड्याचा मांडा करी ।।५।।

तुकयाची विठूभक्ती न्यारी
जिजाई घेऊनी जाई न्याहारी ।।६।।

डोंगरकपारी शोधीत जाई
अंतरीचा भाव व्याकूळ होई ।।७।।

तुकयावर राग लटका करी
अंतरी भाव नेटका परी ।।८।।

विठूरायाचाही राग करी
परी मंगळाई उरी धरी ।।९।।

सावळा विठूराया जाणून घेई
पायी रुतला काटा काढून देई ।।१०।।

देव भक्त एकरूप होई
परी आवली न जाणे कांही ।।११।।

तुका झाला संत महान
अभंग गाथा येई तरून ।।१२।।

तुकयाला आले जरी विमान
आवलीचे गुंतले संसारी मन ।।१३।।

**सौ. सरोज अनंत करंदीकर**

# विदेहीपणे मुक्ती...

सौ. मंजिरी कुलकर्णी

*"विदेहीपणे मुक्ती भोगीत जावे"*. या ओळीमधे खरोखर फार मौलिक असा गर्भितार्थ भरून राहिला आहे. "भोगीत जावे.... " भोगणे हा शब्द सुख - दुःख, प्रारब्ध सर्वच बाबतीत फार चपखलतेने आणि योग्य तऱ्हेने वापरला जातो. विदेहीपणे म्हणजे 'देह' म्हणजे 'मी' नाहीच या वृत्तीने. देह हा प्रारब्धाचे भोग भोगण्यासाठी मिळालेला असतो. कोणतीही उपाधी मग ती सुख देणारी असो, दुःख देणारी असो किंवा यशापयश ठरवणारी असो. त्यासाठी करावे लागणारे प्रयत्न आणि परिणामी प्राप्त होणारे भोग, दोन्ही देहाशिवाय अशक्य आहे. पण अशा तऱ्हेने देहाच्या माध्यमातून भोगल्या जाणाऱ्या सुख दुःखांचा, स्थितप्रज्ञाच्या 'मी' पणाला कोठेही स्पर्श होत नाही. पारमार्थिक उन्नती आणि अधोगती यांच्यासाठी देहासारखे दुसरे योग्य माध्यम नाही.

.... पण सामान्य जीवाला, खूप जन्मांच्यानंतर, सर्व पापे नष्ट झाल्यावर किंवा झाल्यामुळेच आपल्याला नरदेह मिळाला आहे असे वाटते. आणि नरदेह हे 'साध्य' वाटू लागते. सर्व सुखांच्या, वासनांच्या पूर्ततेसाठीच ह्याचा उपयोग आहे असे वाटू लागते.

खरे सुख कोणते? सुख, सुख म्हणतात ते कशात असते? याचा नक्की तपास न लागल्यामुळे नरदेह मिळून सुद्धा आयुष्याची वाटचाल माणसाला नेमकी चुकीच्या पत्त्यावर नेऊन पोहोचवते.

पारमार्थिक किंवा अध्यात्मिक क्षेत्रातील सुखाची परमावधी किंवा परमोच्च सुखाचा क्षण म्हणजे सायुज्जमुक्ती! ही मुक्ती पायरीपायरीने गाठायची असते. मुक्तीचे जे चार प्रकार सांगितले आहेत ते पायरी पायरीने गाठायचे असतात.

१) सलोकता मुक्ती – म्हणजे स्वर्गात देवलोकात, देवांच्या जवळ रहायला मिळते.

२) समीपता मुक्ती – म्हणजे देवलोकात रहातानाच देवांचे पूर्ण सान्निध्य मिळते आणि त्यांच्या सहवासात रहायला मिळते.

३) सरूपता मुक्ती – म्हणजे देवासारखे रूप मिळते.

४) सायुज्जता मुक्ती – म्हणजे वरील सर्व पायऱ्या चढत जाऊन हळूहळू शेवटी जन्म-मरणाच्या फेऱ्यातून सुटका होऊन मोक्ष मिळतो. अशा तऱ्हेने चारही मुक्तींचा अर्थ पाहिल्यानंतर सर्व पायऱ्यांचा अर्थ लक्षात येतो.

आता असा विचार मनात येतो की आपण दासबोधामधे श्री समर्थांच्या सांगण्यावरून असेही वाचले की "स्वर्ग - नरक" ह्या साऱ्या कविकल्पना आहेत. सामान्य माणसाला जीवन जगताना पाप-पुण्याची जाणीव वाटावी, नरक - यातनेच्या भोगांच्या वर्णनाने त्याने पापाचरण करू नये आणि त्याचप्रमाणे स्वर्ग सुखाच्या भोगाच्या अमिषाने त्याचे मन पुण्याकडे म्हणजे पर्यायाने सत्कृत्य मार्गाकडे ओढले जावे म्हणून हा सर्व "कवि - कल्पनांचा" खटाटोप! खरा परमात्मा, खरा कर्ता जो निर्गुण, निराकार आहे तो सामान्यांच्या आवाक्याच्या बाहेरचा आहे. म्हणून मूर्ती किंवा प्रतिमा यांच्या माध्यमातून प्रत्येकजण आपल्या दैवताची कल्पना करून आराधना करीत असतो. हे देव, स्वर्गात रहातात, जिथे सर्व सुखच सुख आहे अशी सामान्यांची धारणा असते.

मग आता वर वर्णन केलेल्या 'मुक्ती' या भावनेला काय अर्थ राहिला? देवांचे सान्निध्य, त्यांचा सहवास, त्यांचे रूप, या सर्वांची सांगड कशी घालायची?

असा विचार केल्यावर, स्वर्ग - नरकाची काल्पनिकता पटवून घेतल्यावर मला असे वाटते की, "स्वर्ग - नरक" इथेच असतील आणि सर्व प्रकारचे भोग जर याच जन्मात भोगायचे असतील तर या मुक्तींचा वेगळ्या प्रकाराने विचार केला पाहिजे. त्यांचा वेगळा अर्थ घेतला पाहिजे.

आपण पहातो की जगात जे जे जीव नरदेहांत जन्म घेतात त्यांच्या रहाणीमानात, भोग - ऐश्वर्यात आणि सुख - दुःखात खूप तफावत जाणवते. हा फरक का दिसतो? तर पुण्याचा मोठा संचय घेऊन जन्माला येणारा जीव चांगल्या कुळात जन्माला येतो. पारमार्थिक धनाचा संचय आपल्याला जन्म - जन्मांतरी साथ करतो आणि म्हणूनच चांगल्या कुळात जन्माला येणे ही पूर्व पुण्याईची कमाई आहे. अशा विचारांप्रमाणे –

(१) सलोकता – ज्याला केवळ पूर्व - पुण्याईच्या बळावर संपन्न कुटुंब मिळते; सर्व प्रकारची सुखे त्याच्या समोर हात जोडून उभी असतात, कोणत्याही प्रकारची कमतरता नसते आणि तो जणू स्वर्गातच रहात असतो. अशा सामान्य जीवाला सर्व ऐहिक सुखांची पूर्तता करणारी परिस्थिती मिळाली तर स्वर्ग-सुखाचा भास होतो. आताच्या काळाप्रमाणे विचार केला तर रहायला बंगले, गाड्या, भरपूर पैसा, ही कमतरता दूर करणारी साधने असतील तर स्वर्गीय परिस्थितीच निर्माण झाली की! पण ही परिस्थिती भोगताना हे गतजन्मीच्या पुण्याईचे फळ आहे ही जाणीव ठेवली जात नाही. अंगात मातलेपण वाढीला लागते. देहबुद्धीच्या विचाराने गर्व, दंभ आणि "मी" पणा वाढीला लागतो. ही मुक्ती "विदेही" पणे भोगता आली पाहिजे. अहंपणाने, स्वतःशिवाय दुसरीही शक्ती आहे, जिच्यामुळे आपल्याला हे वैभव मिळाले आहे, आणि आताही तीच शक्ती आपल्या आयुष्याच्या बेरीज - वजाबाकीची नोंद ठेवीत आहे याची जाणीव जीव विसरून जातो. अध्यात्मिक बैठक असेल आणि अनुसंधानाचा धागा बळकट असेल तरच "ईश्वरी" सत्तेची जाणीव रहाते. पण नश्वरवादाचा पगडा आयुष्याची वाट लावतो. सद्विवेकबुद्धी सोडून जाते आणि चांगल्या संपन्न आयुष्याची हानी होते. या परिस्थितीत

आपण जणू स्वर्ग आणि नरक यांच्या सीमारेषेवर उभे असतो. या पहिल्याच पायरीवर नेट धरून उभे राहिले नाही, तर ती उतरायला कितीसा वेळ लागणार? मग पुढे नरकवास देणारी नीचयोनि आहेच. म्हणून सर्व सुखे भोगताना, प्रारब्ध आणि निर्गुण - निराकार पण सर्वसंपन्न शक्तीची जाणीव ठेवली पाहिजे. ही जाणीव टिकून अध्यात्मिक अनुसंधान बळकट राहिले तर पुढे जन्म घेताना एक पायरी वर चढून जीव उन्नतीकडे जातो. नाहीतर आपल्याला दैवानेच मिळालेले वैभव हे स्वतःचेच कर्तृत्व असे वाटून तो उन्मत्त बनतो आणि त्यामुळे येणारा अहंकार आणि अभिमान या गोष्टी त्याला पायरी चढण्यापेक्षा पायरी उतरायलाच मदत करतात. अशावेळी मन उन्नत आणि वृत्ती सात्विक ठेवली तर अध्यात्मिक पातळी उंचावली जाऊन पुढील जन्मी आणखी वरची स्थिती प्राप्त होईल.

(२) समीपता – पूर्वजन्मीच्या पुण्याईने आणखी वर गेल्याने आत्मोन्नती होत जाते आणि जीव आणखी वरच्या पायरीवर जातो. या ठिकाणी त्याला सर्व सुखे मिळतात, किंबहुना असेही म्हणता येईल की त्याच्या सुखाच्या व्याख्या बदलल्या जातात; आणि त्याच्या सानिध्यात विरक्त, सात्विक आणि आत्मज्ञानी असे जीव येतात. म्हणजेच जिथे पिढ्यान्‌पिढ्या उपासना चालू आहे अशा घराण्यात त्याचा जन्म होतो. आपण पहातो की कोणत्याही संताचा जन्म अशाच घरात होतो; की जिथे कोणत्या ना कोणत्या रूपामध्ये परमेश्वराची उपासना चालू असते. अशा घरामध्ये जन्म घेणाऱ्या पुण्यवान जीवाच्या पूर्वजन्मीच्या अध्यात्मिक वृत्तीला खत-पाणी मिळते. तो आता आत्मोन्नतीच्या प्रेरणेतूनच जन्माला आलेला असतो. कोणत्याही परिस्थितीत तो वैराग्यापासून चळत नाही. इथे आता पायरी उतरण्याचे धोके कमी होतात आणि उद्धाराची दिशा धरली जाते.

(३) सरूपता – इथे शरीरावर अध्यात्माचे तेज दिसू लागते. तो सुलक्षणी असतो. आपण वाचतो की गौतमबुद्ध, महावीर किंवा श्रीकृष्ण हे जन्मतःच सुलक्षणांनी युक्त होते. त्यांच्या शरीरावर, हाता-पायांवर शुभ चिन्हे दिसतात. (हीच उन्नतीचे लक्षण दाखवणारी असतात.) ते उद्धारासाठी आणि उपकारासाठी कांही उद्देशानेच जन्माला आलेले असतात. इथून सायुज्जतेचा मार्ग सुकर आणि सुलभ होत जातो. शेवटी ज्या हेतूने हा जन्म मिळालेला असतो तो पूर्ण होताच हे जीव पुन्हा आत्मतत्वात मिसळून जातात. जन्म - मरणाच्या फेऱ्यातून मुक्त होऊन ते सायुज्ज मुक्तीप्रत पोहोचतात.

अशा तऱ्हेने पहिलीच सलोकतेची मुक्ती विदेहीपणे, निस्पृहपणे भोगता आली पाहिजे. सर्वात असून अलिप्त रहाता आले पाहिजे.

आपण कोण? प्रारब्ध म्हणजे काय? चित्‌शक्तिची जाणीव या सर्व गोष्टीं सारासार विचारशक्तीने जाणून घेता आल्या पाहिजेत. अशा तऱ्हेने सर्वात असून ही नसल्याप्रमाणे म्हणजेच विदेहीपणे मुक्ती भोगून आपल्या जीवाचा उद्धार आपण करून घेतला पाहिजे.

सौ. मंजिरी कुलकर्णी
अटल सोसायटी, बिल्डिंग. नं. १, ब्लॉक नं. ५,
बिबवेवाडी रोड, पुणे ३७.

# ॥ ज्ञानियांचा राजा गुरू महाराव...॥

## (या अभंगाच्या निमित्ताने)

### अजय आपटे

*ज्ञानियांचा राजा गुरू महाराव म्हणती ज्ञानदेव तुम्हा ऐसे ।*
*मज पामरासी काय थोरपण पायीची वहाण पायी बरी ।*
*ब्रह्मादिक जेथे तुम्हा वोळगणे इतर तुळणे काय पुढे ।*
*तुका म्हणे नेणो मुक्तीचिया खोली म्हणौनि ठेविली पायी डोई ।*

ग्रीष्मातल्या टळटळीत उन्हात, डोंगरावरून येणाऱ्या उष्ण वाऱ्याने अंगाची तगमग होत होती. एकदम अंगात संचारल्यासारखे मी सतरंजीवरून उठलो आणि खटकन टी. व्ही. चे बटण सुरू केले आणि टी. व्ही. तून पॉप संगीताचा मसाला स्वर बाहेर आला. त्याचवेळी दुपारी थकून भागून झोपलेल्या आईची झोपमोड झाली आणि ती माझ्या अंगावर खसकन ओरडली आणि यांत्रिकपणे मी टी.व्ही. चे बटण ऑफ केले आणि मुकाट्याने सतरंजीवर धामाने निथळत पहुडलो.

काय वाटले कुणास ठाऊक. जरा वेळाने मी टेप रेकॉर्डर ऑन केला आणि अवचितपणे पं. भीमसेन जोशींची विठ्ठलविऽठ्ठलविऽठ्ठलची भैरवी सुरू झाली. पहाडी आवाजातील कसलेल्या आवाजाने माझी अस्वस्थता कुठल्याकुठे पार पळून गेली. पं. भीमसेन यांची स्वरांची जादू, सामर्थ्य वादातीतच आहे. त्यांचे इतरही अभंग मी ऐकले होते.

पण "त्या" अभंगाने मला अक्षरक्षः खेचून घेतले. त्यातील शब्दही मला धड कळले नाहीत. त्याचे वाईटही वाटले नाही कारण गाण्यातील शब्दांपर्यंत मी जात नसे.

त्यानंतर उन्हाळ्यातील त्या सुट्टीत दुपारी जेवण झाल्यानंतर तो पहाडी स्वरांतील अभंग ऐकत गार वाऱ्याच्या दिशेत पडून राहणे ही नित्याची गोष्ट होऊन गेली. अगदी धुंद होऊन स्वतःमध्येच मशगुल होऊन पडल्यासारखे वाटे. असह्य उकाडा जाणवतही नसे.

हळूहळू 'त्या' अभंगाचे इतके वेड लागले की मी तो अभंग सतत ऐकू लागलो. इतर फिल्मी गाणी बंद! पण त्या अभंगातले शब्द काही कळत नव्हते. अर्थ लागत नव्हता. ते पंडितजींच्या पहाडी स्वरांच्या, आलापांच्या घनगर्द झाडीत लपून गेले होते. माझ्या बुद्धीचा प्रकाश त्या अभंगरूपी गुप्त गुहेपर्यंत पोहोचू शकत नसे. ते नुसते स्वर ऐकून कसेसेच वाटे. आमच्या गावाबाहेरच्या गर्द झाडीतील ग्रामदैवताच्या देवळाच्या पाठीमागे धुनी पेटवून गांजा ओढत धुंद झालेल्या विरक्त नाथपंथीयाकडे पाहून लहानपणी मला आश्चर्य व मत्सर वाटे, तसेच काहीसे वाटे. ते शब्द, तो अर्थ जाणून घेणे मला आव्हान वाटले आणि ते मी स्वीकारले....

दुकानात जाऊन मी 'त्या' कॅसेटमधील अभंगाचे पुस्तक विकत घेतले. तो श्री तुकाराम महाराजांचा विख्यात अभंग..." ज्ञानीयांचा राजा गुरू महाराव..." मग ते शब्द कळले पण ते छापलेले. ती धुंदी काही चढेना...! मग शास्त्रीय संगीतातले ओ का ठो कळत नसतानाही मी भीमसेनांची कॅसेट लावून त्यांच्या आवाजाची नक्कल करून तो अभंग गाणे सुरू केले...

ज्ञानियांचा राजा गुरू महाराव ।... पण त्या सुरांनी आणि अर्थगर्भ शब्दांनी मला एकदम ज्ञानेश्वर महाराजांच्या जिवंत समाधीवरील शिळा भेदून त्यांच्या पायाशी जाऊन बसल्यासारखे वाटले. आतापर्यंत "ज्ञानेश्वर = ज्ञानाचा ईश्वर" एवढीच धारणा असणाऱ्या मला हा एक धक्काच होता. गुरू महाराव... या शब्दांनी तर सर्व देवादिकांच्या इतकेच नव्हे तर ब्रह्माविष्णुमहेश यांच्यापेक्षाही अतिउंच आसनावर विराजमान झालेल्या एखाद्या महाज्ञानी, तेजःपुंज, महातापसी, वैभवशाली महायोग्याच्या सान्निध्यात असल्याचा भास झाला. ते शब्द... माझ्या स्वरयंत्रातून की माझ्या अंतरात्म्यातून येणाऱ्या त्या स्वरांनी मला इतक्या उंचीवर नेले... पुढे काय असेल... काय शब्द असतील... काय त्यांचे सामर्थ्य असेल...

*मज पामरासी काय थोरपण...*

माझे मलाच आश्चर्य वाटले. माझ्या गळ्यातून निघालेल्या स्वरांनी नव्हे तर या भाषाप्रभूच्या शब्दांनी मला इतक्या उंचीवर नेले. असा हा महाकवी स्वतःला पामर म्हणतो, माझी थोरवी ती काय असे म्हणतो. मी अजून तरंगतच होतो. म्हटलं असेल वेडा...

पुढे माझ्या कानात मीच गायलेले शब्द ऐकू आले. *'पायीची वहाण पायी बरी'* मला एकदम शंभर पायताणांच्या ढिगाऱ्यात पडल्यासारखे झाले... परमेश्वरात विलीन होण्यासाठी, विठ्ठलाशी एकरूप होण्यासाठी, सदेह वैकुंठाला जाण्यासाठी लागणारी विनम्रता काय असते याची थोडी कल्पना आली.

*ब्रह्मादिक जेथे तुम्हा वोळगणे इतर तुळणे काय पुढे...*

*ज्ञानदेवे रचिला पाया तुका झालासे कळस...*

या उपाधीला सार्थ करणाऱ्या श्रीसंत तुकाराम महाराजांच्या अपार निष्ठेचा, ज्ञानदेवांसारख्या महागुरूला संपूर्ण ओळखण्याच्या पात्रतेचा साक्षात्कार झाला. त्या कळसाखाली असणाऱ्या त्यांच्या अष्टांग सावधानतेच्या भक्कम पायाचा साक्षात्कार झाला.

*तुका म्हणे नेणे युक्तीचिया खोली...*

या ओळीने ते इतक्या हालअपेष्टांतून सदेह वैकुंठाला का गेले याचा उलगडा झाला.

'म्हणौनि ठेविली पायी डोई' ऐकून पंढरीच्या वारीत लाखो वारकरी 'ग्यानबा तुकाराम'चा जयघोष का करतात याचे प्रत्यंतर आले.

फक्त चार कडव्यांच्या या अभंगातून श्रीसंत तुकाराममहाराज आपल्याला प्रत्यक्ष ज्ञानमाऊलीच्या सान्निध्याचा लाभ करून देतात यातच त्यांच्यासारख्या 'पामराच्या' महाथोरवी चे प्रत्यंतर आले.

मला वाटले मी स्वप्नच बघितले... पण नाही ते सत्य होते. वैज्ञानिक सत्य होते... ते श्रीसंत तुकोबारायांचे सामर्थ्यशाली शब्द होते...।

**कु. अजय आपटे**
३०५, आय, रम्य नगरी, बिबवेवाडी,
पुणे. ४११ ०३७.